# मानवेंद्रनाथ रॉय.

## चरित्र व विचार

भाग १ ला

अनुवादक : भाई बेके

१९३८

१॥ रुपया

प्रकाशक
राम जयवंत देशमुख,

देशमुख आणि कंपनी,
काळी मशीद, सोलापूर.

मुद्रक
श्री. र. राजगुरु,
राजगुरु प्रेस, ४०५ नारायण, पु

ज्यांनीं वयाच्या चौदाव्या वर्षीच क्रांतीची जळती ज्योत हातांत धारण करून, आपल्या स्वार्थत्यागाच्या तेलानें ती अखंड तेवत ठेवली, जीवनाच्या ४५ वर्षांपैकीं ३० वर्षे तुरुंगवास व हद्दपारीच्या यमयातना सहन केल्या, साम्राज्यशाहीचा विध्वंस करून वसाहतींतील दलित जनतेला स्वातंत्र्य मिळवून देण्याचें ध्येय उराशीं बाळगून, तत्प्रीत्यर्थ जगांतील ६-७ राष्ट्रांतील क्रांति-युद्धांत बुद्धिपुरःसर उडी घेतली, व आपल्या अतुल पराक्रमानें आणि अद्वितीय बुद्धिसामर्थ्यानें त्या राष्ट्रांतील स्वातंत्र्यसंग्राम यशस्वी करून त्यांना भारताचें कायमचें ऋणी करून ठेवलें; भांडवलशाही राष्ट्रांनीं हद्दपारी, तुरुंगवास, फांशी यासारख्या भयंकर शिक्षा दिल्या असतानाहि आपल्या अलोट बुद्धिवैभवानें व असामान्य कर्तृत्वानें त्या सर्वांस धैर्यानें तोंड देऊन आपली क्रांतीची ध्वजा अखंड उन्नत ठेवली, आणि असामान्य ग्रंथरचना करून तिच्या जोरावर जगांतील कामगार-चळवळीस व विशेषतः हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याच्या चळवळीस वेळोवेळीं शास्त्रपूत मार्ग दाखविण्याचें कार्य केलें, व ज्यांच्या जीवनांत विद्वत्ता, उदात्तता व अद्भुतरम्यता या तीन गुण-प्रवाहांचा मनोहर त्रिवेणीसंगम झाला आहे ते—

भाई मानवेंद्रनाथ रॉय

# प्रास्ताविक



हिंदी राष्ट्राच्या स्वातंत्र्याच्या लढ्यांत ज्या थोर पुरुषांनीं आतांपर्यंत प्रामुख्यानें भाग घेतला आहे त्यांच्या मालिकेंत आमचे चरित्रनायक कॉ. रॉय यांचें नांव प्रामुख्यानें समाविष्ट केलें जातें. कॉ. रॉय यांनीं १९१५ सालीं म्हणजे वयाच्या बाविसाव्या वर्षी अनेक क्रांतिकारक कटांचें नेतृत्व पतकरून व अनेक हालअपेष्टा सहन करून, हिंदुस्थानचा किनारा सोडला. त्यानंतर १६ वर्षांनीं म्हणजे १९३० सालीं कॉ. रॉय हे परत हिंदुस्थानांत आले. या काला-वधींत त्यांनीं जगांतील निरनिराळ्या देशांत प्रवास केला व कित्येक देशांतील क्रांतीच्या चळवळींत प्रत्यक्ष भाग घेतला. जगांतील कामगारक्रांतीचे प्रणेते म्हणून कॉ. रॉय यांचें नांव आज जगांत सर्वतोमुखीं झालेले आहे. १९२९ सालापासून जरी रॉय यांचीं मतें व कार्यक्रम हे रशियांतील अधिकृत अशा आंतरराष्ट्रीय संस्थेचे कार्यक्रम म्हणून मान्य करण्यांत येत नसले तरी, रॉय यांच्या विचारसरणीला जगांतील क्रांतिकारक फारच मान देतात व त्यांच्या लेखनाकडे एकूण एक राजकारणी पुरुषांचें फार बारीक लक्ष लागून राहिलेलें असतें. तसेंच त्यांचे लेख आज हिंदुस्थानांतच नव्हे, तर जगांतील प्रत्येक भागांत फारच सूक्ष्म दृष्टीनें अभ्यासिले जातात. कॉ. रॉय यांचा जीवनवृत्तांत किती रोमांचकारी व अद्भुतरम्य आहे, याची कल्पना यापुढील कांहीं प्रकरणांवरून वाचकांना येईल. तथापि रॉय यांच्या आयुष्यांतील अद्भुतरम्य कथा वर्णन करून वाचकांचें मनरंजन करण्यापेक्षां कॉ. रॉय यांच्या शास्त्रशुद्ध विचारसरणीचा वाचकांना परिचय करून देण्यासाठींच मुख्यतः हें चरित्र लिहिण्याचें काम हातीं घेतलें व ज्या थोर पुरुषानें वयाच्या १५ व्या वर्षा-पासून क्रांतियुद्धांत उडी घेतली व जो आपल्या शास्त्रशुद्ध विचारसरणीनें मोठमोठ्या राजकारणी मुत्सद्दयांसहि थक्क करून सोडीत आहे, त्याचें चरित्र वाचकांना सादर करणें हें एक कर्तव्य समजून तें या पुस्तकाच्या द्वारें आम्हीं पार पाडिलें आहे.

---

# कृतज्ञता



सुमारें चार महिन्यांपूर्वी भाई मानवेंद्रनाथ रॉय यांचें श्री. ए. के. हिंदी या लेखकानें लिहिलेलें एम्. एन्. रॉय 'दी मॅन हू लुक्ड अहेड' हें इंग्लिश चरित्र आमच्या हातीं पडलें. चरित्र फारच अद्‌भुत, रोमांचकारी व उद्‌बोधक असल्यामुळें या अशा महान् व्यक्तीचा व त्याच्या विचाराचा महाराष्ट्रीयांस परिचय व्हावा म्हणून वरील पुस्तकाचा मराठी अनुवाद करून महाराष्ट्रीय वाचकवर्गास सादर करण्याची इच्छा उत्पन्न झाली व प्रभुकृपेनें आणि अनेक सन्मित्रांच्या साह्यानें अगदीं अल्पावधींत आमचा हेतु सिद्धीस गेल्यामुळें आम्हांस अत्यानंद होत आहे. आरंभीं रॉय यांचें चरित्र देऊन शेवटच्या तीन प्रकरणांत त्यांची वसाहतींविषयीं व विशेषतः हिंदुस्थानविषयक जीं मतें आहेत त्या सर्वांचा संक्षिप्त स्वरूपांत परामर्श घेतला आहे. चरित्र सर्वांग-सुंदर व्हावें म्हणून चरित्रनायकाचा एक फोटोहि दिला आहे. एकूण चरित्र सुबोध, मनोरंजक व सर्वांगसुंदर व्हावें म्हणून शक्य तितका प्रयत्न केला आहे.

श्री. रॉय यांचें वर उल्लेखलेलें इंग्रजी चरित्र फार घाईनें लिहिलें गेलें असल्या-मुळें, त्यांत रॉय यांच्या चरित्रांतील कित्येक महत्त्वाच्या घडामोडींचा समावेश झालेला नाहीं. म्हणून आम्हीं बरीचशी नवीन माहिती मिळवून तिचाहि उपयोग या चरित्रांत केला आहे. तथापि रॉय यांचें जीवनचरित्र अत्यंत रहस्यपूर्ण असल्यामुळें व त्यांना आपल्या चरित्रांतील सर्व घटना जगापुढें मांडणें अप्रशस्त वाटत असल्यामुळें चरित्राची संपूर्ण माहिती मिळणें हें अत्यंत कठीण होऊन बसलें आहे. पूर्ण माहितीच्या अभावीं चरित्रांत कांहीं दोष राहणें अगदीं साहजिक आहे. त्याशिवाय इतर अनेक कारणांनीं पुस्तकांत बऱ्याच उणीवा राहिल्या आहेत यांची आम्हांस जाणीवहि आहे. तरी त्याबद्दल मराठी वाचकवर्ग उदार हृदयानें क्षमा करील अशी आशा आहे. कोणतेंहि कार्य सिद्धीस जाण्यास अनेक शक्तींचें व व्यक्तींचें साह्य लागतें व त्याच नियमास अनुसरून हा ग्रंथ पूर्ण होण्यासहि आम्हांस कित्येक मित्रांचें

अतोनात साह्य झालें आहे. विशेषतः भाई वामनराव कुलकर्णी यांनीं श्री. ए. के. हिंदीकडून इंग्रजी चरित्राचा मराठींत अनुवाद करावयाची परवानगी मिळवून देण्याची खटपट केली व लेखकानेंहि ती आनंदानें दिली याबद्दल त्या दोघांचेहि आम्ही अत्यंत आभारी आहोंत. तसेंच भाई बेके यांनीं रात्रीचा दिवस करून, दोन-तीन महिन्यांतच वरील इंग्रजी चरित्राचा मराठी अनुवाद आपल्या सुबोध व सुंदर भाषेंत करून दिला, याबद्दल कंपनी त्यांचीहि अत्यंत ऋणी आहे.

तसेंच, य. गो. जोशी यांनीं आम्हांला जें कांहीं साह्य केलें आहे त्या साह्याबद्दल संस्था त्यांची ऋणी आहे. त्यानंतर राजगुरु प्रेसचे संचालक श्री. राजगुरु यांनीं अल्पावकाशांत पुस्तक छापवून दिलें व सुंदर टाईप, आकर्षक रचना, मजबूत बांधणी व निर्दोष छपाई इत्यादि गुणांची भर घालून पुस्तकाच्या अंतरंगाप्रमाणें बाह्यांगहि मनोहर करण्यास मदत केली याबद्दल त्यांचे आभार मानावे तितके थोडेच आहेत.

याशिवाय श्री. नामदेवराव हराळकर, तुगांवकर, श्री. देविदास लक्ष्मण नाईक, पंढरपूरकर व श्री. दिगंबरराव कवठेकर या सद्गृहस्थांनीं द्रव्यसाह्य करून आम्हांस उपकृत करून ठेवलें आहे, त्यांचाहि उल्लेख करणें अगत्यांचें आहे. शेवटीं या चरित्रप्रकाशनाच्या कामीं ज्या ज्या मंडळींनीं प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष साह्य केलें, त्या सर्वांना अंतःकरणपूर्वक धन्यवाद देऊन वाचकांची रजा घेतों.

सोलापूर.
१-६-१९३८. प्रकाशक

# अनुक्रमणिका

# मानवेंद्रनाथ रॉय

## ( चरित्र व विचार )

## १ क्रांतिकारक गटांत प्रवेश

**ब्रिटिशांचें हिंदुस्थानांत आगमन**

अठराव्या शतकांत ज्या वेळीं हिंदी लोकांवर राष्ट्रीय दृष्टया आपात्ति ओढवली होती. त्याच वेळीं इंग्लंडला हिंदुस्थान पादाक्रांत करण्याची संधि आली होती. युरोपप्रमाणें हिंदुस्थानांतहि सरंजामदारी पद्धति खिळखिळी झालेली होती. जुनी समाजपद्धति बदलून त्या जागीं नवीन समाजपद्धति येते ती सहजासहजीं येत नसते. नव्या समाजपद्धतीचे अंकुर जुन्या राजवटींतून हळूहळू उत्पन्न होतात, या ऐतिहासिक सिद्धांताप्रमाणें हिंदुस्थानांत नवीन समाजपद्धतीचे अंकुर ठिकठिकाणीं फुटूं लागले होते, परंतु ते जितके टिकाऊ व प्रबल असावयास पाहिजे होते तितके नव्हते. मुसलमानी अंमलामुळें राष्ट्रीय प्रगतीच्या मार्गांत अंतर्गत उलाढाली व दुही यांनीं विघ्न उत्पन्न केलें आणि नवीन समाजपद्धतीचे फुटूं लागलेले अंकुर जोरानें वाढील लागतील असें चिन्ह दिसेना. सरंजामी पद्धतींत हळूहळू व्यापारीवर्गाचा प्रादुर्भाव ऐतिहासिक क्रमानें व्हावयाचा तो हिंदुस्थानांत झालेला होता. मराठे व मोगल यांच्या काळींहि प्रत्यक्ष राजेरजवाड्यांना व्यापारी लोकांचें व सावसावकारांचें लाखों रुपये देणें असे. यावरून हें व्यापारीवर्गाचें वाढतें प्राबल्य उघड दिसून येतें. याच व्यापारीवर्गांतून पुढें भांडवलशाही समाजपद्धतीचा उगम व्हावयाचा असा ऐतिहासिक क्रम; परंतु अगदीं याच वेळीं ब्रिटिश अंमलास हिंदुस्थानांत सुरवात झाली आणि समाजाच्या व राष्ट्राच्या प्रगतींत एक मोठी धोंड आडवी आली. ब्रिटिश अमलाचा श्रीगणेशा हा असा आहे.

अठराव्या शतकांत ब्रिटनमध्यें यंत्राच्या साह्यानें मालाची निपज फार मोठ्या प्रमाणांत होत होती. हिंदुस्थानांतील व इतर वसाहतींतील पैसा खोऱ्यानें ओढणें हाच ब्रिटनचा धंदा होता. हिंदुस्थान ब्रिटनच्या अंकित होण्याच्या मार्गास लागल्या कारणानें राजकीय व आर्थिक दृष्ट्या व्हावयाचे तेच परिणाम येथें झाले 'आणि इंग्लंडची भरभराट व हिंदुस्थानांत खडखडाट' अशी स्थिति आपल्या देशास प्राप्त झाली. सामाजिक प्रगति अगर अधोगति यांचा अंदाज दूरदृष्टि राजकीय पुढाऱ्यांना अचूक काढतां येतो; परंतु समाजांतील निरनिराळ्या घटकांना त्याचें जसें आकलन व्हावें तसें होत नाहीं. ब्रिटिश लोकांनीं आपल्या देशांत व्यापाराच्या निमित्तानें पाय रोवला; त्यानंतर अधिकारातिक्रमण करून पुढें पाऊल टाकलें व शेवटीं राजकीय स्वातंत्र्य हिरावून घेऊन सर्व देश पादाक्रांत केला. या घडामोडी इतक्या सहजासहजीं व तडकाफडकीं झाल्या, कीं हिंदी जनतेला आपल्या भवितव्याचा विचार करण्यासहि अवसर मिळाला नाहीं. थोडक्याच काळांत ब्रिटिश राजसत्तेची पकड हिंदुस्थानवर बसली. १८५७ सालीं हिंदुस्थानांतील सरंजामदारवर्गानें बंड उभारलें. परंतु याच वेळीं सामाजिक, शास्त्रीय व राजकीय दृष्ट्या प्रभावी अशी संस्कृति आपल्या समोर सामन्यास उभी राहिली व त्यामुळें जुन्या मोडकळीस आलेल्या समाज-पद्धतीचा बींमोड झाला यांत आश्चर्य तें कसलें? बहुजन समाज या बंडापासून दूर राहिल्या कारणानें, इंग्लंडनें अनन्वित अत्याचार करून या बंडाचा बींमोड केला व त्यांत त्याला यश आलें. बंडांतील अत्याचाराची, अंगावर शहारे आणणारी हकीकत वाचकांनीं ऐतिहासिक ग्रंथांतून वाचली असेलच. ती येथें फिरून सांगण्याचें कारण नाहीं.

बंडाचा बींमोड झाल्यावर लॉर्ड लिटनसाहेबांनीं १८७७ सालीं व्हिक्टोरिया राणीला कैसर-इ-हिंद हा किताब अर्पण करून दरबारास जमलेल्या राजे-रजवाड्यांना इंग्लंडच्या या सार्वभौमत्वाची जाणीव करून दिली.

बिचारी हिंदी जनता मात्र या घटनेकडे दैवी चमत्कार म्हणून आश्चर्यानें पाहत राहिली!

हिंदुस्थानांतील राज्यकारभार चुटकीसरशीं ब्रिटिश सरकारकडे गेला, १८५७ सालच्या बंडाचा बींमोड झाला, सर्व कांहीं झालें, ब्रिटिश लोक हिंदुस्थानांत

कोणती समाज घटना चालू होती तें जाणून होतें. खरें म्हटलें म्हणजे, वाढत्या व्यापारामुळें हिंदी भांडवलशाहीची महत्त्वाकांक्षा व ब्रिटनची साम्राज्यतृष्णा यांचा झगडा व्हावयाचा; परंतु तसें झालें नाहीं. व्यापारी पेशा असणाऱ्या मध्यम वर्गावर ब्रिटिशांची दृष्टि खिळून राहिली आणि हा वर्ग बलाढ्य होणें म्हणजे आपल्या बाजारपेठेची वाटच बंद करण्यासारखें आहे याची जाणीव ब्रिटिश साम्राज्यवाद्यांना झाली. आपल्या मालाची हिंदुस्थानांत उत्कृष्ट बाजारपेठ बनविणें हा ब्रिटिशांचा पहिला उद्देश होता. अफाट देशाच्या राज्यकारभाराकरितां अनेक साधनें राज्यकर्त्यांना निर्माण करावीं लागतात; त्यांतल्यात्यांत ब्रिटिशांसारख्या सुज्ञ व दूरदृष्टि राज्यकर्त्यांनीं तर आपल्यापुढें असलेल्या संकटाची पूर्ण जाणीव ठेवून एकेक पाऊल टाकण्यास सुरुवात केली होती.

नवीन राजवटींत कोणत्याहि वर्गाला दुखवितां कामा नये हें ओळखून राणीच्या जाहीरनाम्यांतच जात, गोत, धर्म यांचा विचार न करतां राज्यकारभारांत सर्वांना सारखा वाव मिळेल असें ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं जाहीर केलें. येवढ्या अफाट प्रदेशावर तेथील लोकांच्या संमतीशिवाय राज्यकारभार करतां येणें शक्य नाहीं! तेव्हां जनतेची संमति मिळविण्यासाठीं कांहीं तरी नवीन योजना करणें आवश्यक होतें. या सर्व गोष्टींचा विचार करून देशांत निरनिराळ्या ठिकाणीं ब्रिटिशांनीं शिक्षणसंस्था स्थापण्याचा उपक्रम केला. अशा रीतीनें सुयंत्रित राज्यकारभार चालविण्यासाठीं सुशिक्षित व फर्डे कारकून तयार करण्याची सोय करण्यांत आली व मध्यम वर्गाला नौकरीचें साधनहि उपलब्ध झालें; पण बहुजन समाज मात्र आतांपर्यंत होता तसाच बौद्धिक अंधःकारांत राहावा या धोरणांत ब्रिटिशांनीं कोणत्याहि रीतीनें फ[illegible] केला नाहीं.

**बाळपण व अभ्यास**

१९ व्या शतकाच्या शेवटच्या कालखंडांत हिंदुस्थानची अशी स्थिति असतांना सुशिक्षित वर्गांतून राजकीय विचारप्रवाहाचा उगम झाला. याच संधिकालांत आपले चरित्रनायक कॉ. मानवेंद्र रॉय यांचा जन्म इ. स. १८९३ सालीं बंगालमधील मिदनापूर जिल्ह्यांतील एका लहानशा खेड्यांत झाला.

कॉ. रॉय यांचें लहानपणचें नांव नरेंद्रभट्टाचार्य असें ठेविलें गेलें. विधिघटना अपूर्व खरीच ! आजचे हिंदी राष्ट्रीय सभेचे सुविद्य, स्वार्थत्यागी अध्यक्ष दे. भ. सुभाषचंद्र बोस यांचाहि जन्म याच खेड्यांत झालेला आहे.

कॉ. रॉय याचें घराणें कांहीं पिढीजात श्रीमंत नव्हतें व आईबापांजवळहि कांहीं पैसाअडका फारसा नव्हता. हिंदुस्थानांतील असंख्य गरीब व दलित अशा बहुजन समाजाप्रमाणेंच कॉ. रॉय यांचें आयुष्य गरिबींत गेलें. ऐषआरामांत दिवस घालविण्यासारखी त्यांच्या वडिलांची स्थिति नव्हती, कारण धंदा म्हणावा तर शिक्षकाचा. ब्राह्मण शिक्षकाचा असा हा मुलगा पुढें सुप्रसिद्ध जगद्विख्यात क्रांतिकारक निपजेल असें कोणी भविष्य वर्तविलें असतें तर तें त्या वेळीं खरें वाटलें नसतें. कॉ. रॉय यांचें प्राथमिक शिक्षण त्यांच्या वडिलांच्या देखरेखीखालीं झालें. नरेंद्र भट्टाचार्य यांचे वडील एका शाळेंत संस्कृत शिक्षक होते. रॉय यांच्या वडिलांचा ओढा सुधारणेकडे व बुद्धिवादाकडे होता. अर्थातच तें बाळकडू नरेंद्रभट्टाचार्यांना लहानपणापासूनच मिळालें. शाळेंत शिकत असल्यापासूनच नरेंद्रांचा कल सुधारणावादी मताकडे झुकत होता. मूर्तिपूजेवर त्यांचा विश्वास नसे. देव म्हणजे दगड हेंच त्यांना पटत असे. तूं खरा सुधारक असशील तर हें मडकें पायानें देवीच्या डोक्यावर मार असें लहानपणीं एका संवगड्यानें सांगितलें. नरेंद्राच्या पायांत त्या दिवशीं नवा बूट होता. त्याच पायानें नरेंद्रानें मडक्याला लाथ मारून तें देवीवर उडविलें. दुसऱ्या दिवशीं बूट लागल्यामुळें त्याच्या पायाला फोड येऊन कांहीं दिवसांनीं तो पिकला. तूं देवीला लाथेनें मारलेंस म्हणून देवीनें तुला शाप दिला असें आजूबाजूचे लोक त्याला बोलूं लागले. साधी गोष्ट, पण नरेंद्र विचार करूं लागला व देवीनें शाप दिला म्हणून नव्हे, तर नव्या बुटामुळें पायाला जखम झाली हें उत्तर त्याला सुचलें. तेव्हांपासून प्रत्येक गोष्टीकडे नरेंद्र बुद्धिवादाच्या दृष्टीनें पाहूं लागला. आतांच्या कॉ. रॉय यांच्या शास्त्रशुद्ध व चिकित्सक विचारसरणीचें बीज अशा प्रकारें अगदीं लहानपणींच त्यांच्या ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस आलें.

त्यानंतर हायस्कूलच्या शिक्षणाकरितां कॉ. रॉय यांना कलकत्ता येथें जाणें भाग पडलें. सुरुवातीस ज्या कांहीं थोड्या क्रांतिकारकांच्या अचाट कृत्यांनीं

तरुणांचीं मनें थरारून गेलीं होतीं, त्यांपैकीं बॅ. सावरकर हे होत. बॅ. सावरकर यांच्या धाडसी कृत्यांमुळें डॉ. रॉय यांच्या मनावरहि जबरदस्त पकड बसली व यामुळें डॉ. रॉय यांच्या आयुष्यास एकदम निराळें वळण लागलें तें लागलें.

ब्रिटिशांच्या हिंदुस्थानांतील राज्यकारभाराला उपयुक्त अशीं जीं शिक्षण-केंद्रें राज्यकर्त्यांनीं येथें निर्माण केलीं त्यांचा एक मोठा फायदा हिंदी लोकांना अन्य तऱ्हेनें मिळाला. " करायला जावें एक व होतें भलतेंच " या न्यायानें ज्या संस्थांतून 'फर्डे कारकून' यंत्राप्रमाणें बाहेर पडावयाचे त्याच संस्थांतून 'क्रांतिकारक' बाहेर पडूं लागले. कारकुनांचे क्रांतिकारक बनण्याचें स्थान अशी शिक्षण-संस्थांची अवस्था झाली. दे. भ. बॅ. विनायकराव सावरकर, श्री. बारिन-कुमार घोष, श्री. अरविंद घोष हीं त्या वेळचीं नररत्नें याच शिक्षण-संस्थांचीं बालकें आहेत. अशा या ऐतिहासिक घडामोडींत डॉ. रॉय यांचा गुप्त चळवळ करणाऱ्या संस्थांशीं संबंध येऊं लागला व हळूहळू क्रांतिकारक चळवळीशीं समरस होऊन पुढील आयुष्य याच चळवळींत खर्ची घालण्याचा निश्चय त्यांनीं केला. त्या वेळीं डॉ. रॉय यांच्या मनाची काय अवस्था होती याचें वर्णन त्या काळच्या एका बंगाली क्रांतिकारकानें केलें आहे. "ज्याच्या भावना क्रांतिकारक विचारांनीं उचंबळून गेल्या आहेत असा हा अवघा चौदा वर्षांचा बाल नरेंद्र ज्या खोलींत आमची कांहीं औपचारिक प्रश्नांवर चर्चा चालली होती त्या खोलींत धावतच आला; त्या वेळीं आम्ही बंगाल व इतर ठिकाणच्या परिस्थिती-बद्दल विचार करीत होतों. बाल नरेंद्र व आम्ही कांहीं वेळ बोललों मात्र; इतक्यांत माझें सर्वस्व मी देशाच्या स्वातंत्र्याकरितां खर्च करण्यास तयार आहें असें निश्चयी उत्तर त्यानें आम्हांस दिलें; व पुढें तो म्हणाला, " मी शपथ घेऊन सांगतों, कीं कोणतीहि अशक्य गोष्ट मी पार पाडीन याबद्दल तुम्ही खात्री बाळगा. कारण क्रांतिकाराला अशक्य असें काय आहे?"

या निश्चयानंतर लवकरच बाल नरेंद्र हा आमच्या चळवळीस मिळाला. आम्हांला मात्र फारच थोड्या वेळांत असें दिसून आलें कीं, " या मुलाच्या अंगांत अलौकिक कर्तबगारी आहे, इतकेंच नव्हे तर बहुजन समाजाचा पुढारी होण्याचे विशिष्ट गुणहि यांच्या अंगीं उत्कटत्वानें वास करीत आहेत."

---

## २ वंगभंगाविरुद्ध चळवळ

" बंगालची लोकसंख्या वाढत असून व्यापार व देवघेव मोठ्या प्रमाणावर चालू आहे. राज्यकारभाराचें तंत्र अवघड होऊन बसलें आहे, आणि विशेष म्हणजे सुशिक्षित वर्ग राज्यकारभाराकडे अधिक लक्ष देऊं लागला असून दुसरीकडे सरकार मात्र कमकुवत होत चाललें आहे."

बंगालची फाळणी करण्याची दुर्बुद्धि लॉर्ड कर्झनसाहेबांना का झाली याचें स्पष्टीकरण वरील सरकारी उताऱ्यांत उत्तम रीतीनें केलेलें आहे. बंगालचे दोन भाग पाडून राज्यकारभार करण्यास सोइस्कर जावें हा हेतु फाळणीच्या मुळाशीं होता. कर्झनसाहेबांची कारकीर्द कशी गाजली, हें 'कर्झनशाही' या शब्दानें हिंदी जनतेच्या हृत्पटलावर कोरलें गेलेलें आहे. लोकांचे हक्क दिवसेंदिवस कमी करणें, लेखणीच्या फटकाऱ्यासरशीं कलकत्ता कॉर्पोरेशन म्हणजे, नोकरशाहीच्या हातचें खेळणें बनविणें, तसेंच ज्या शिक्षणाचा प्रभाव अन्य रीतीनें राष्ट्रांत दिसूं लागला तें उच्च शिक्षण लोकमतानुवर्ती न करतां युनिव्हर्सिटी सेनेट हें नोकरशाहीचें गुलाम बनविणें अशीं एक ना दोन दुष्कृत्यें, त्या कर्झनसाहेबांच्या हातून झालेलीं आहेत. या बहादुरानें सरकारी गौप्यस्फोटाचा कायदा पास करून सरकारचीं काळींबेरीं चवाट्यावर येण्याचेंहि त्या वेळीं बंद केलें होतें.

कर्झनसाहेबांच्या कारकीर्दींत पोलीसखात्यांत वरिष्ठ जागांवर हिंदी लोकांना नेमण्यास मज्जाव करण्यांत आला. बरें, एवढ्यानें तरी या बहाद्दराचें समाधान व्हावें, तर तेंहि नाहीं ! या सर्व कृत्यांवर कळस चढविण्यासाठींच कीं काय, हिंदी राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या इतिहासांत नांवाजलेला असा बंगालच्या फाळणीचा कायदा १९०५ मध्यें कर्झनसाहेबांनीं पुढें आणला. ही सर्व उठाठेव याच वेळीं ब्रिटिश साम्राज्यशाही कां करीत होती याचें उत्तर अगदीं सोपें आहे.

लोकांच्या वाढत्या आकांक्षांना या वेळीं चांगली वाचा फुटली होती. इतकेंच नव्हे तर हिंदी लोकांत क्रांतिकारक तत्त्वांचा फैलाव झपाट्यानें होऊं लागला होता. याला पायबंद कसा घालावयाचा हा महत्त्वाचा प्रश्न ब्रिटिश राज्यकर्त्यांपुढें दत्त म्हणून उभा होता, व म्हणूनच बंगालची फाळणी करण्यांत आली. लोकांनींहि बंगालच्या फाळणीचें आव्हान स्वीकारलें. वंग-भंग-विरोधी चळवळ झंझावाताप्रमाणें सर्व हिंदुस्थानांत फैलावली. चळवळीचा प्रतिकार म्हणून सरकारी दडपशाहीचा वरवंटा अधिक जोरानें फिरूं लागला व सभा, हरताळ, निषेध यांचा एकच हलकल्लोळ अखिल भारतांत उठला. या चळवळींतून आपले चरित्रनायक कसे चुकून बाजूला राहतील! कॉ. रॉय यांनींहि मिरवणुकींतून व चळवळींतून प्रामुख्यानें भाग घेतला व त्याचा सूड उगविण्याकरितां पोलिसांनीं कॉ. रॉय यांना एकाएकी दरोडा घालण्याच्या आरोपावरून अटकहि केली.

### क्रांतिकारक चळवळीची प्रथमावस्था

१९०७ सालीं रेल्वे स्टेशनवर पडलेल्या दरोड्यांत पोलिसांनीं रॉय यांस पकडलें. या दरोड्याचा उद्देश क्रांतिकारक चळवळीला पैसे पुरविणें असा होता. लोकमान्य टिळकांच्या सुप्रसिद्ध अशा राजद्रोहाच्या खटल्यानंतर राजद्रोहाचा असा हा पहिलाच खटला होता. या सुमारास रॉय यांचें वय अदमासें चौदा वर्षांचें होतें. इतकें कोंवळें पोर एवढा मोठा दरोडा घालतें हें अशक्य आहे असें समजून न्यायाधिशानें रॉय यांस निर्दोषी म्हणून सोडून दिलें. यांतून रॉय सुटले तरी त्यांच्या मागचा पोलिसांचा ससेमिरा कांहीं केल्या थांबला नाहीं.

राजकीय लढ्याचें स्वरूप दिवसेंदिवस भीषण व उग्र होऊं लागलें. "आम्हांला बेकायदेशीर चळवळ दडपून टाकण्यासाठीं रक्तपातहि करणें भाग पडेल." अशी धमकी बंगालचे गव्हर्नर सर बॅम्फील्ड फुल्लर यांनीं जाहीर रीतीनें जनतेला दिली; व त्याप्रमाणें सशस्त्र गुरख्या लोकांची पलटण बंगालमध्यें सज्ज करून ठेवली. १९०६ सालीं बनारस येथें भरलेल्या राष्ट्रीय कॉंग्रेसनें बंगाल-फाळणीचा व सरकारच्या दडपशाहीचा उघड उघड निषेध केला. या चळवळीच्या दिव्यांतून आणखी एक रत्न बाहेर पडलें. राष्ट्रीय शिक्षण देण्याकरितां म्हणून 'वंगजातीय परिषद' नांवाची एक संस्था स्थापन कर-

ण्यांत आली. कै. बिपिनचंद्र पाल हे या चळवळीचे जनक होत. कॉ. रॉय हेहि या चळवळींत स्वतः भाग घेत असत. स्वदेशी, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण या त्रयीवर अखिल हिंदुस्थानांतील राजकीय चळवळीचा पाया रोवला गेला. खरोखर, या तीन गोष्टी म्हणजे राष्ट्रीय स्वातंत्र्य नव्हतें; तथापि प्राथमिक अवस्थेंत तरी या गोष्टींना राष्ट्रीय चळवळीचें स्वरूप प्राप्त झालें. चळवळ करण्याकरितां पंजाब, संयुक्तप्रांत, महाराष्ट्र वगैरे ठिकाणीं निरनिराळ्या संस्था स्थापन करण्यांत आल्या.

आतांपर्यंत बंगाल-फाळणीच्या विरोधाची चळवळ थोडीफार सनदशीर मार्गानें चालूं होती, पण हें फार वेळ टिकणें शक्य नव्हतें. सनदशीर चळवळीचा मार्ग निरुपयोगी आहे असें दिसल्यावर साहजिकच तरुणांचें लक्ष इतर मार्गांकडे लागलें. येथें ता. ३० एप्रिल १९०८ रोजीं मुझफरपूर येथें दोन युरोपियन स्त्रियांवर बॉंब फेकण्यांत आलें. वास्तविक हे बॉंब तेथील डिस्ट्रिक्ट जज्ज मि. किंग्जफर्ड यांच्यावर फेकण्यांत आले होते परंतु ते दोन युरोपियन स्त्रियांना लागले. श्री. खुदिराम बोस यांना बॉंब फेकण्याच्या आरोपावरून अटक करण्यांत येऊन लगेच फांसावर लटकविण्यांत आलें. त्या वेळीं खुदिराम यांचें वय फक्त १८ वर्षांचें होतें. इतक्या अल्पवयी मुलाच्या मनावर असा परिणाम व्हावा इतका चळवळीचा प्रभाव वाढला होता. क्रांतिकारक विचारसरणीचा फैलाव हां-हां म्हणता जनतेंत होऊं लागला. याच वेळीं 'युगांतर' नांवाचें एक बंगाली जहाल पत्र उदयास येऊन जनतेची गरज त्यानें तात्पुरती भागवली. या पत्राचे मूळ उत्पादक श्री. बारिंद्र कुमार घोष हे होते. त्या वेळीं बंगाल-फाळणीबद्दल किती तीव्र असंतोष जनतेंत पसरलेला होता व तरुणांचे विचार कसे क्रांतिवादी व जहाल बनत चालले होते हें, युगांतर पत्रांतील त्या वेळचे उतारे वाचले म्हणजे स्पष्ट रीतीनें समजेल. एका वर्षात 'युगांतर' पत्राचा खप जवळ जवळ साठ हजारांपर्यंत गेला, परंतु थोड्याच अवधींत या पत्रास सरकारी दडपशाहीमुळें राम म्हणणें भाग पडलें, व तीच गत इतर पत्रांची झाली. दडपशाहीच्या कायद्यानें अनेक ठिकाणच्या जहाल वर्तमानपत्रांना पूर्ण विराम नाहीं तरी अर्धविराम घेणें भाग पडलें.

त्या वेळीं राजद्रोह हा मोठा भयंकर गुन्हा समजला जाई. कायद्याच्या कक्षें-तून सुटण्याचे प्रयत्न कायदेपंडित करीत होते. राजद्रोहाच्या आरोपावरून क्रांतिकारकांना शिक्षा व्हाव्यात व कांहीं लोक मधून मधून या आरोपांतून दोषमुक्त व्हावेत असा प्रकार हरहमेशा बंगालमध्यें घडत असे. केवळ शिक्षेच्या भीतीनें राजद्रोहाचे गुन्हे दडपले जाणें शक्य नव्हतें, याची जाणीव सरकारला झाली व हळूहळू याला पायबंद घालण्याचीहि सरकारनें तयारी केली. 'सिडिशस मीटिंग अ‍ॅक्ट' 'प्रेस अ‍ॅक्ट' 'क्रिमिनल लॉ, अ‍ॅमेंडमेन्ट अ‍ॅक्ट' वगैरे कायदे पास करून क्रांतिकारक चळवळीच्या गळ्याला कायमचा फास लावण्याचें शतकृत्य आपण केलें असें सरकारला वाटलें.

### आध्यात्मिक प्रवृत्तींकडे क्षणिक कल

यानंतरच्या काळांत डॉ. रॉय यांना अनेक वेळां सरकारचा पाहुणचार घ्यावा लागला. बरेच वेळां राजद्रोहाच्या आरोपावरून त्यांना अटक करण्यांत येई. एक-दोन वेळां डॉ. रॉय यांना किरकोळ स्वरूपाच्या शिक्षाहि देण्यांत आल्या व एक-दोन प्रसंगीं त्यांची सुटकाहि झाली. दडपशाहीच्या कायद्यानें राजकीय चळवळ मरते, अशी आपली वेडी समजूत सरकारनें करून घेतली होती. परंतु गुप्त चळवळीचा प्रसार कोणत्याहि दडपशाहीच्या कायद्यांस न जुमानतां झपाट्यानें होऊं लागला होता. या चळवळीच्या कार्यांत हजारों तरुण मोठ्या उत्साहानें भाग घेऊं लागले. पुन्हा एकदां डॉ. रॉय यांना याच सुमारास बादशहांविरुद्ध युद्ध पुकारण्याच्या आरोपावरून अटक करण्यांत आली. आपलें राजकीय ध्येय सिद्धीस नेण्याकरितां पैसा जमविणें असा या कटाचा उद्देश होता असें सरकारचें म्हणणें होतें. रॉय यांच्याबरोबर जतींद्रनाथ मुकर्जी, सुरेंद्र चंद्र मुुजुमदार व इतर कांहीं मंडळी यांनाहि अटक करण्यांत आली. हौरा कटाच्या खटल्यांत रॉय यांना जतींद्रनाथ मुकर्जी, सुरेशचंद्र मुजुमदार व इतर सहकारी यांच्याबरोबर पोलिसांनीं पकडलें. तो कटाचा खटला जवळ जवळ वीस महिने चालून शेवटीं नरेंद्रनाथ त्यांतूनहि निर्दोषी सुटले.

त्या वेळचे तुरुंग व सध्यांचे तुरुंग यांत पुष्कळ फरक आहे. त्या वेळच्या मानानें हल्लींची तुरुंगांतली वागवणूक पुष्कळ सुधारली आहे. त्या वीस महिन्यां-च्या तुरुंगवासांत नरेंद्रांनीं पुष्कळ धार्मिक पुस्तकें वाचलीं, योगसाधनेंहि

केली व यापुढें संन्याशाचें जीवन कंठावें या निश्चयानें ते तुरुंगाबाहेर पडले. पण गांवोगांव हिंडत असतांना दानधर्माचें भोंदू स्वरूप त्यांना कळून येतांच त्यांनीं हा मार्ग सोडून दिला व ते कलकत्त्यास पायीं आले. धार्मिक संस्थांशीं व व्यक्तींशीं निकट संबंध आल्यामुळें त्यांना त्या संस्थांबद्दल तिटकारा येऊन ते दिवसच्या दिवस सारखे विचार करूं लागले. क्रांतिकारक चळवळीकडे तर मन सारखें ओढ घेत होतेंच. अशा मनःस्थितींत त्यांचा एका जुन्या सहकाऱ्याबरोबर धर्माबद्दल वादविवाद झाला. तो सहकारी आतां संन्यासी बनला होता. त्यानें जेव्हां 'आत्मदर्शन' झाल्याशिवाय कोणाला स्वातंत्र्य मिळवितां येणार नाहीं असें सांगितलें तेव्हां नरेंद्रांना त्या विधानांतील मूर्खपणा चटकन कळला. " जर हिंदुस्थानांतल्या लोकांना आत्मदर्शन झाल्याशिवाय स्वातंत्र्याची चळवळ करतां येणार नाहीं, तर हिंदुस्थानाला केव्हांच स्वातंत्र्य मिळणार नाहीं. लहानपणापासून रक्तांत भिनलेल्या क्रांतिकारक ध्येयवादानें धार्मिक अवडंबरांतून त्यांची सुटका केली. त्यांनीं परत क्रांतिकारक चळवळींत भाग घेण्यास सुरुवात केली. या वेळीं युरोपांत महायुद्धाला सुरुवात झालेली होती.

**बंगालची फाळणी रद्द**

बंगालच्या फाळणीविरुद्ध झालेल्या चळवळीचा राज्यकर्त्यांवर परिणाम झाल्याखेरीज राहिला नाहीं. लॉर्ड कर्झन यांच्या दडपशाहीच्या धोरणाबद्दल लॉर्ड मोर्ले यांनीं शाब्दिक नापसंती दर्शविली; परंतु केवळ शाब्दिक अभिवचनानें लोकांचें समाधान कसें होणार? बंगालची फाळणी रद्द करण्याची हिंदी जनतेची एकमुखी मागणी होती. इकडे बंगालची फाळणी हा ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या इभ्रतीचा प्रश्न होऊन राहिला होता. आम्हांला जें योग्य दिसेल तें आम्ही करूं, आम्ही वरिष्ठ अधिकाऱ्यांच्याहि मताप्रमाणें वागणार नाहीं अगर लोकांच्या धाकदपटशालाहि भीक घालणार नाहीं असें ना. व्हाइसरॉय लॉर्ड मिंटो यांनीं मोठ्या ऐटीनें जाहीर केलें. शेवटीं जनतेच्या चळवळीमुळें १२ डिसेंबर १९११ रोजीं राजेसाहेबांच्या राज्यारोहण-समारंभप्रसंगीं बंगालच्या फाळणीच्या कायद्याला सरकारी हुकुमानें एकदांची मूठमाती देण्यांत आली.

## ३ सरकारचा ससेमिरा

बंगालची फाळणी रद्द केल्यानंतरहि चळवळीचा जोर ओसरला नाहीं. लोकांच्या राजकीय हक्कांवर अतिक्रमण करणारे कायदे अद्यापहि अस्तित्वांत होते. संघस्वातंत्र्य, भाषणस्वातंत्र्य, लेखनस्वातंत्र्य यांच्यावरील बंदी होती तशी होतीच. कित्येक तरुण क्रांतिकारक तुरुंगांतील यमयातना भोगीत पडलेले होते. लोकमान्य टिळकांचा एकटा एक जीव मंडलेच्या तुरुंगांत सहा वर्षांची खडतर शिक्षा भोगीत होता. १९११ सालची परिस्थिति ही अशी होती. कांहीं काळ चळवळीचा ओघ ओसरला असें वाटत होतें. परंतु ही वरवर दिसणारी आभासात्मक शांतता होती. तिच्याखालीं लोकक्षोभाचा अग्नि सारखा धुमसत होताच. ह्याच सुमारास हिंदुस्थानचे व्हाइसरॉय लॉर्ड हार्डिंज १९१२ सालीं हत्तीवरून दिल्ली शहरांत साम्राज्यशाहीच्या डौलानें प्रवेश करीत असतांना, त्यांच्या अंगावर एक बॉंब फेकण्यांत आला. नोकरशाहीचें माथें भडकण्यास हें कारण मिळालें व दडपशाहीस पुन्हा सुरवात झाली. वरील गोष्ट झाल्यानंतर छापखान्यांवरील नियंत्रण अधिकच वाढलें. ही दडपशाहीची जाणीव करून देणारी सूचनाच होती असें म्हणण्यास हरकत नाहीं. सरकारी दडपशाहीस उत्तर देण्यासाठीं लोकांनींहि आपल्या बाजूनें कंबर कसली. लेखनस्वातंत्र्याची मागणी लोकांनीं जोरानें पुढें मांडली आणि पुन्हा जनता व सरकार यांच्यामधील विरोधाला लढ्याचें कायमचें स्वरूप प्राप्त झालें.

### गार्डन बीच येथील सुप्रसिद्ध दरोडा

या एकंदर सर्व चळवळीचा सामुदायिक परिणाम कॉ. रॉय यांच्यावर झाल्याखेरीज राहिला नाहीं. बंगाल-फाळणीच्या विरुद्ध चळवळ करणारा, एकदां नव्हे, दोनदां नव्हे—तर अनेकदां राजद्रोह, कट, वगैरे आरोपांवरून अटक झालेला व 'हौरा' कटाच्या खटल्यांत प्रमुख म्हणून नांवाजलेला आणि अनेक क्रांतिकारांशीं

सलगीचे संबंध असलेला म्हणून कॉ. रॉय यांचें नांव पोलिसांच्या 'काळ्या' बुकांत दाखल झालें होतें. अर्थात् यानंतर पोलिसांचा ससेमिरा कॉ. रॉय यांच्यामागें जो लागला तो कायमचाच ! कॉ. रॉय यांच्या हालचालींवर पोलिसांची टेहळणी २४ तास होऊं लागली हें सांगणें नकोच. बंगाल या वेळीं निद्रिस्त नव्हता; अनेक मार्गांनीं चळवळ चालू होती. बंगालमध्यें पुन्हा एकदां दरोडेखोरीची लाट उसळली. गार्डन बोच येथें मोठा दरोडा पडला व या दरोड्यांत क्रांतिकारकांना अतिशय पैसा मिळाला. दरोड्याबद्दल कॉ. रॉय यांना संशयावरून अटक करण्यांत आली. पोलिसांनीं पुरावा गोळा करण्यासाठीं जंगजंग पछाडलें, परंतु अखेरीस पुराव्याच्या अभावीं कॉ. रॉय यांना सोडून देणें सरकारला भाग पडलें.

आरोपांतून सुटका झाली म्हणून रॉय यांना स्वस्थता लाभली असें थोडेंच आहे ! पोलिसांचा ससेमिरा सारखा मागें लागलेला असावयाचाच. ते कोठें प्रवासास निघाले, कीं त्यांच्यामागें पोलिसांचा सुळसुळाट सुरू झालाच म्हणून समजावें; मग त्यांच्या पाळतीवर किती पोलीस निघतील याची कोणी गणतीच करूं नये ! एकदां सहज बनारसला जाण्याचें त्यांच्या मनांत आलें. त्यांना वाटलें, येथें कोण आपणांस त्रास देतो ? अशा विचारानें ते मनाचें समाधान मानीत बसलेले आहेत तों बनारस स्टेशनवर त्यांना दिसलें, कीं पोलीस मुंग्यांप्रमाणें मागें लागलेले आहेत.

**रॉय यांचें प्रसंगावधान**

चळवळ, अटक, खटले, तुरुंग, पोलीस-टेहळणी या गोष्टी आतां कॉ. रॉय यांच्या अंगवळणीं पडून गेल्या होत्या. रॉय जातील तेथें पोलीस आहेतच. गांवांत कांहीं खुट्ट झालें, कीं रॉय यांना अटक व चौकशी सुरू झाली म्हणून समजावें. अशा अनेक प्रसंगांतून आपल्या चरित्रनायकानें दिवसच्या दिवस काढले.

या परिस्थितीमुळें क्रांतिकारकांना आवश्यक असणाऱ्या गुणांचाहि त्यांना परिपोष करतां आला. प्रसंगावधान हा गुण क्रांतिकारांना किती आवश्यक आहे हें सांगावयाचें कारण नाहीं. अगदीं तरुणपणीं कॉ. रॉय यांनीं प्रसंगा-

वधान राखून पोलिसांच्या तावडींतून कशी सुटका करून घेतली, याची रोमांचकारी हकीकत पुढें दिली आहे. कॉ. रॉय हे एक दिवस आपल्या सहकाऱ्यांबरोबर कलकत्ता शहरीं गुप्त खलबत करीत बसले होते. जवळच एका टेबलावर एक पिस्तुल पडलें होतें. इतक्यांत कोणी तरी येऊन दरवाजावर थाप मारली. अशा वेळीं पोलिसांशिवाय दुसरें कोण येणार असा संशय आंतील मंडळींना आला. व कॉ. रॉय यांनीं प्रसंगावधान राखून तेथेंच पडलेलें एक दैनिक घेतलें व तें पिस्तुलावर ठेवून जणूं कांहीं झालेंच, नाहीं अशी मुद्रा करून दरवाजा उघडला. दरवाजा उघडून पाहतात तों काय! पोलीस कमिशनर मि. टेगार्ट यांची स्वारी आपल्या लव्याजम्यासह हजर! कॉ. रॉय यांनीं फारच सभ्यपणानें पोलीससाहेबांस आंत येण्याची विनंति केली. व बसावयास खुर्चीहि पुढें सरकवली. रॉय हे आपल्या सहकाऱ्यांसह टेबलाशीं इतके सहजगत्या उभे राहिले, कीं पोलीससाहेबांना त्यामुळें कसलाहि संशय आला नाहीं. आपल्या हालचालीसंबंधानें विचारलेल्या प्रश्नांस कॉ. रॉय हे अत्यंत शांतपणें सुमारें अर्धा तासपर्यंत उभे राहून उत्तरें देत होते. प्रश्नोत्तरें झाल्यावर सर चार्ल्स टेगार्ट हे निघून गेले व मग आंतील मंडळींनीं चटकन् दरवाजा लोटला व हें आलेलें संकट टाळलें.

येथपर्यंतच्या कालखंडांत कॉ. रॉय यांना क्रांतिकारांच्या संस्थेंत अत्यंत महत्त्वाचें असें स्थान प्राप्त झालें होतें. बंगाली क्रांतिकारकांची 'अनुशीलन समिति' नांवाची मध्यवर्ती संस्था होती. या संस्थेच्या शाखा बंगालभर पसरलेल्या होत्या. त्या संस्थेचे तर कॉ. रॉय हे प्राण होते असें म्हणण्यास हरकत नाहीं.

---

# ४ सशस्त्र क्रांतीचा प्रयत्न

एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस औद्योगिक प्रगतीमुळें साम्राज्यवादी राष्ट्रांना वसाहतींचें महत्त्व अधिकाधिक जाणवूं लागलें. जगांतील बलिष्ठ राष्ट्रें इंग्लंडच्या सार्वभौमत्वाबद्दल उघड उघड आव्हान देऊं लागलीं, पाश्चात्य राष्ट्रें जगांतील बाजारांत इंग्लंडचे प्रतिस्पर्धी म्हणून दंड थोपटून उभीं राहिलीं. जर्मन राष्ट्र हें त्यांपैकींच एक होय. पाश्चात्य राष्ट्रांचें राजकीय स्वरूप साम्राज्यशाहींत परिणत होत होतें.

अशा स्थितींत दोन साम्राज्यवादी राष्ट्रांची केव्हां ना केव्हां तरी लढाई जुंपणार, हें भविष्य इतिहासकारांनीं फार दिवसांपूर्वीं करून ठेविलें होतें व तेंच १९१४ सालीं सुरू झालेल्या महायुद्धानें जगाच्या निदर्शनास आलें. औद्योगिक प्रगतीच्या शिखरावर पोंहोचलेलीं दोन राष्ट्रें इंग्लंड व जर्मनी हीं लढाईच्या आखाड्यांत १९१४ च्या नोव्हेंबर महिन्यांत उतरलीं.

१९१४ च्या नोव्हेंबर महिन्यांत लढाईस सुरुवात झाली. जर्मन सैन्य फ्रान्सच्या सरहद्दीवर येऊन भिडलें. ब्रिटिशांनीं धावपळ करून हिंदी सैन्यालाहि फ्रान्सच्या मदतीला पाठविण्यास सुरुवात केली. युद्धाला सुरुवात झाली खरी, पण त्याचा उपयोग आपल्या देशाला काय ? आपण या युद्धांत कां भाग घ्यावा ? आपण भाग घेतला नाहीं तर काय परिणाम होतील ? हे व अशाच तऱ्हेचे विचार आपल्या देशांतील लोकांच्या मनांत घोळत होते. १९१४ सालीं राष्ट्रीय सभेनें हिंदी राष्ट्राची मागणी म्हणून स्वराज्याची घोषणा केली. इकडे क्रांतिकारक विचारांच्या तरुणांच्या मनांत निराळेच विचार घोळत होते. इंग्लंड महायुद्धांत गुंतलेलें आहे, हिंदुस्थानांतील सैन्य परदेशांत पाठवून दिल्यामुळें प्रत्यक्ष येथें ब्रिटिश अगर देशी सैन्य असें फारसें असणारच नाहीं, तेव्हां अशा संधीचा फायदा घेऊन, जर जर्मनीच्या साहाय्यानें आपण क्रांतिकारक

उठाव केला तर ब्रिटिश राज्यसत्ता उलथून पाडण्यास असा कितीसा वेळ लागणार? असे विचार महायुद्धाच्या सुरुवातीस जहाल तरुणांच्या डोक्यांत येणें अशक्य नव्हतें व या विचारांची परिणति प्रत्यक्ष कृतींतहि झाली. विचार येण्याचा अवकाश, लगेच तरुण क्रांतिकारकांनीं कार्यक्रम आंखलाहि. सयाम व बंगालमधील क्रांतिकारकांशीं संधान बांधून जर्मनीच्या साहाय्यानें हिंदुस्थानांत क्रांतीचा वणवा पेटवावयाचा असा कांहीं बंगाली तरुणांनीं १९१५ च्या सुमारास निश्चय केला. निश्चय झाला, पण सुरुवात कशी करावयाची? या सर्व गोष्टींना पैशाची तर अत्यंत आवश्यकता! बरें, पै-पैसा करून असा किती पैसा जमणार? अशा क्रांतिकारक चळवळीस पैशाचीहि तशीच भरपूर मदत पाहिजे म्हणून दरोडे घालून पैसा जमविण्याचें बंगाल व इतर ठिकाणच्या क्रांतिकारक तरुणांनीं ठरविलें व त्याप्रमाणें कार्यास सुरुवात केली.

**रॉय यांची बटाव्हियास रवानगी**

१२ जानेवारीला एक दरोडा मोठा गार्डन बीचला पडला. २२ फेब्रुवारीला बालीघाट येथें दुसरा मोठा दरोडा पडला. आमच्या क्रांतिकारकांना या दरोड्यांत एकंदर चाळीस हजार रुपयांची कमाई झाली. बँकॉक येथें तेथील क्रांतिकारकांशीं संधान बांधण्यासाठीं भोलानाथ चतर्जी यांची आगाऊ रवानगी झालेली होतीच. इकडे जतींद्रनाथ लाहिरी यांनीं अशी बातमी आणिली कीं, जर्मन सरकार आपल्याला मदत करणार असून बटाव्हियाला आपलीं माणसें पाठविलीं तर पुढलीं कामें नीट जमतील. अशा रीतीनें एकेका गोष्टीचा जम बसत चालला. एका गुप्त सभेंत जर्मनीच्या योजनेचा विचार करण्यांत येऊन आपले चरित्रनायक नरेंद्रनाथ भट्टाचार्यजी ( कॉ. रॉय ) यांची 'बटाव्हिया' ( जाव्हा ) कडे रवानगी करण्यांत आली. येथूनच कॉ. रॉय यांच्या आयुष्यांतील रहस्यमय आणि रोमांचकारी अशा आयुष्यास सुरुवात झाली, असें म्हणण्यास हरकत नाहीं. कॉ. रॉय यांनीं 'सी. मार्टिन' या टोपण नांवाखालीं एप्रिल महिन्यांत बटाव्हियाला प्रयाण केलें. कॉ. रॉय यांच्याप्रमाणेंच दुसरे एक क्रांतिकारक बंगाली तरुण 'अबनी मुकर्जी' यांना जपानकडे पाठविण्यांत आलें. या कटांतील एक क्रांतिकारक जतीन मुकर्जी यांना मात्र पोलिसांच्या पाळतीमुळें बलसोर येथें

गुप्त रीतीनें राहणें भाग पडलें. कॉ. रॉय हे बटाव्हियाला आल्यानंतर तेथील जर्मन कॉन्सल थिओडोर हेल्फरिच यांची कॉ. रॉय यांच्याशीं गांठ पडली. हिंदी क्रांतिकारकांना मदत करण्यासाठीं दारूगोळ्याच्या पुरवठ्यासह एक जहाज कराचीकडे रवाना झाल्याचें कॉ. रॉय यांना समजलें. तें जहाज बंगालकडे पाठविण्याची कॉ. रॉय यांनीं जर्मन कॉन्सलला सूचना दिली. या बोटींत अंदाजें तीस हजार बंदुका, चारशें काडतुसांच्या पेट्या व रोख दोन लक्ष रुपये इतका माल होता. इकडे कलकत्त्याला 'हॅरि अँड सन्स' नांवाची दिखाऊ कंपनी अगोदरच उभारण्यांत येऊन त्या कंपनीतर्फे क्रांतिकारकांच्या चळवळी मोठ्या व्यवस्थित रीतीनें चालू झालेल्या होत्या. 'धंदा तर बुडीत नाहीं' अशा आशयाची सांकेतिक अर्थाची तार 'मार्टिन' यांनीं 'हॅरि अँड सन्स' या कंपनीला पाठविली. थिओडोर हेल्फरिच यांच्याकडून जून ते ऑगस्ट या तीन महिन्यांच्या अवधींत ४३००० रुपये पाठविण्यांत आले. त्यांपैकीं ३३००० रुपये क्रांतिकारकांच्या प्रत्यक्ष पदरांत पडले, बाकीचे पैसे कोठें गेले याचा पत्ता लागला नाहीं. हिंदुस्थानातील सशस्त्र क्रांतीचे पुढचे बेत ठरविण्यासाठीं आमचे 'मार्टिन'साहेब हे १९१५ च्या जून महिन्यांत हिंदुस्थानांत पुन्हा परत आले. जतीन मुकर्जी, जय गोपाळ मुकर्जी, नरेंद्र भट्टाचार्यजी, भोलानाथ चतर्जी, अतुल घोष व रॉय या सर्वांनीं मिळून मेव्हरिक ही दारूगोळा व बंदुका घेऊन येणारी बोट हिंदुस्थानांत आल्यावर कोठें उतरावयाची, माल कसा व कोठें पाठवावयाचा यांच्या योजना आंखल्या. हतिया, कलकत्ता व बलसोरा या तीन ठिकाणीं बंदुका व दारूगोळा यांची विभागणी करावयाची असा निश्चय या तरुणांनीं केला.

### हिंदुस्थानांतील बंडाची आंखणी

आतां प्रत्यक्ष कृति करण्याचा काळ येऊन ठेपला होता. बंगालमध्येंच बंड उभारलें तर एकट्या ब्रिटिश सरकारला आपण भारी आहोंत हें खरें; पण ब्रिटिशांना जर बाहेरून सैन्याची मदत आली तर कसें, हा बिकट प्रश्न येऊन पडला. याचें उत्तर मिळण्यास त्या तरुणांना फारसा वेळ लागला नाहीं. ज्या भागांतून सैन्य वगैरे येण्याचा संभव आहे त्या बाजूची रेल्वे अडविली म्हणजे पुरें! मद्रासकडून येणाऱ्या रेल्वेचें नाकें जें बलसोरा स्टेशन, तेथें जतींद्रनाथांनीं

जाऊन व बंगाल—नागपूर रेल्वेचें नाकें चक्रधरपूर येथें भोलानाथांनीं जाऊन दोन्ही ठिकाणचे रेल्वेचे पूल उडवून दिले, कीं काम भागलें! मूळ उद्देश साधण्यास एवढ्याच कार्याची आवश्यकता होती. अशा रीतीनें दुसऱ्या प्रांतांतून सैन्य येण्याविरुद्ध नाकेबंदी केल्यावर सुधीश चक्रवर्ती यांनीं आपला मोर्चा हतियाच्या बाजूला वळवावयाचा व आपल्या अनुयायांसह उत्तरबंगाल प्रांतांत चढाईला सुरुवात करावयाची व नंतर कलकत्त्यास कूच करीत यावयाचें. नरेंद्र भट्टाचारजी, बिपिन गांगुली यांनीं आपल्या कलकत्ता येथील अनुयायांसह प्रथम फोर्ट वुइल्यम सर करून, कलकत्ता शहर काबीज करावयाचें. अशा रीतीनें बंगाल प्रांतांत सर्व ठिकाणीं नाकेबंदी केल्यावर 'मेव्हरिक' या बोटीनें हिंदुस्थानांत येणाऱ्या जर्मन लष्करी अधिकाऱ्यांनीं पूर्वबंगाल भागांत तळ ठोकावयाचा व तेथील तरुणांना लष्करी शिक्षण देऊन अधिक सैन्य उभारावयाचें. अशा तऱ्हेचे बेत या तरुण क्रांतिकारकांनीं आंखून ठेवले. येथपर्यंत सर्व योजना आंखण्यांत आल्या. बोटीवरील माल कसा उतरून घ्यावयाचा याचा आतां विचार सुरू झाला. इकडे जय गोपाळ मुकर्जी यांनीं एका जमीनदाराशीं संधान बांधून बोटीवरील माल उतरण्यासाठीं हलक्या होड्या मिळण्याची व्यवस्था केली. माल उतरण्यास मनुष्यबळहि पाहिजे होतें, तेंहि या जमीनदाराकडून मिळूं शकलें. 'मेव्हरिक' हें जहाज गुप्त रीतीनें येईल व बंदरावरून कांहीं विशिष्ट रचनेचे दिवे दिसले, कीं तेंच 'मेव्हरिक' असें ओळखून काढावयाचें अशी योजना आगाऊ ठरविण्यांत आली होती. १९१५ च्या जुलैच्या पहिल्या तारखेस आपल्या हातांत दारूगोळा पडेल अशी या तरुणांची अपेक्षा होती.

क्रांतिकारक तरुण अशा रीतीनें बोटीची वाट पाहत बसले होते, इतक्यांत या कटापैकीं एका आत्माराम नांवाच्या पंजाबी क्रांतिकारकाकडून एक बंगाली इसम असा निरोप घेऊन आला, कीं सयाममधील जर्मन कॉन्सलकडून ५०००
हो दुका, कांहीं दारूगोळा व एक लक्ष रुपये घेऊन एक बोट रायमंगलकडे
पोलि आहे. 'मेव्हरिक' बोटीच्याऐवजींच ही नवीन बोट दारूगोळा घेऊन
विषया ाहे कीं काय, असें या तरुण मंडळींना वाटलें व मेव्हरिक बोट हिंदु-
इस्लामी पांठविण्याचें कदाचित् रहित करण्यांत येईल, ही शंका मनांत आल्या-
यॅय यांनी?

मुळें या मंडळींनीं आत्मारामाकडून आलेल्या इसमाबरोबर हेल्फरिच यांच्याकडे परत निरोप पाठविला, कीं आपला पूर्वींचा बेत बदलूं नये व जमल्यास हातिया व बलसोरा अगर गोकर्णी यापैकीं कोणत्याहि बंदरांतून मेव्हरिक बोट उतरवावी व माल पाठविण्यास हयगय करूं नये.

अशा प्रकारें निरोपाची ये-जा चालू होती. आपलें कार्य फारच अक्कलहुशारीनें चाललें आहे असें या मंडळींना वाटत होतें. परंतु एकाएकी सरकारला या कटाचा सुगावा कसा लागला कोण जाणे! पण जुलै महिन्यांत सरकारची धाड 'हॅरि अँड सन्स' या कंपनीवर येऊन पडली. कंपनीच्या जागेची कसून झडती घेण्यांत आली. कांहीं लोकांना पकडून तुरुंगांत धाडण्यांत आलें. येवढ्यानें या कटाच्या सुगाव्याचें काम संपलें नाहीं. या कटाच्या हालचालींकडे सरकार डोळ्यांत तेल घालून पाहत होतें. इकडे १३ ऑगस्टला कटवाल्यांपैकीं एकजण मुंबईस गेला व तेथून त्यानें जाव्हा बेटां-तील जर्मन कॉन्सल हेल्फरिच यांस एक सूचक तार पाठवून सावध राहण्याचा इशारा दिला. परंतु तेवढ्यानें आपलें कार्य बरोबर साधेल असें रॉयप्रभृति क्रांतिकारकांना वाटलें नाहीं; म्हणून आपले चरित्रनायक रॉय 'मार्टिन' या टोपण नांवानें एका मित्रासह हेल्फरिचबरोबर चर्चा करण्याकरितां बटाव्हियास पुन्हा जाण्यास निघाले.

**आणखी एक रोमांचकारी प्रसंग**

परिस्थिति पाहून पाऊल टाकणें हें अशा बिकट व गंभीर परिस्थितींत जरूर होतें. कॉ. रॉय यांनीं आपल्या एका जीवश्चकंठश्च मित्राबरोबर हिंदुस्थाना-बाहेर पलायन करण्याचा बेत केला, त्या वेळीं गुप्त पोलिसांचें जाळें हिंदुस्थानांत कोनाकोपऱ्यांत इतकें पसरलेलें होतें, कीं क्रांतिकारकांच्या कोणत्याहि हाल-चालीची माहिती त्यांना सहज मिळत असे व त्याचप्रमाणें झालें. कॉ. रॉय यांचा बेत कसा कळला कोण जाणे; पण पोलिसांना त्यांच्या पलायनाचा ...न अगोदरच समजला, हें खरें. ज्या

हिंदुस्थानच्या दक्षिण किनाऱ्यावर एक बोट नांगर टाकून उभीम्हणजे अनेक युक्त्याप्रयुक्त्यांनीं कॉ. रॉय यांनीं आपल्या सहकाऱ्यांबरोबर त्याथांनीं

वर प्रवेश तर मिळविला. पोलिसांचें रॉय यांच्या हालचालींकडे बारीक लक्ष होतेंच. सर्व बंदरांवर चौकशीसाठीं पोलिसांना हुकूम सोडण्यांत आले.

उत्तरेकडे जाणाऱ्या सर्व बोटींची कसून तपासणी सुरू झाली. ज्या बोटीनें कॉ. रॉय हे जाण्यास निघाले होते, ती बोट एका बंदरावर माल घेण्यासाठीं थांबली. कॉ. रॉय हे आपल्या मित्राबरोबर बोटीवरील आपल्या खोलींत पुढील प्रवासाचे बेत करीत उभे होते. या वेळीं जगांतील निरनिराळ्या देशांतील प्रवासाचे मार्ग नकाशाच्या साहाय्यानें पाहण्यांत हे दोघे तरुण गढून गेलेले होते. इतक्यांत कोणी तरी दरवाजा ठोठावल्याचा आवाज ऐकूं आला. कॉ. रॉय यांनीं ताडलें, कीं कांहीं तरी कठीण प्रसंग येणार! एक सेकंदहि न गमावतां अगदीं शांत रीतीनें आपल्यापुढें असलेले नकाशे रॉय यांनीं गुंडाळले व ते मागेंच असलेल्या एका पेटींत फेकून दिले.

खाडदिशीं दरवाजा उघडला गेला. थोड्या पोलिसांसमवेत एक मुसलमान पोलिस अंमलदार आंत आला. चेहऱ्यावर कसलीच हालचाल न दाखवितां कॉ. रॉय यांनीं सदर पोलिससाहेबांचें 'या बसा; आपणांस काय पाहिजे' असें म्हणून हसत-हसत स्वागत केलें.

पहिल्या स्वागताबरोबर पोलिस अंमलदाराची विजयी मुद्रा थोडी उतरलेली रॉय व त्यांचे साथीदार यांना दिसली. पोलिससाहेबांनीं आंत बैठक ठोकली.

"काय पहा! बंगालमधील उच्च कुळांतील कांहीं बंगाली तरुण मुलें अत्याचार व दरोडे घालून कसल्या भलत्याच फंदांत पडलीं आहेत. त्यांना तर आम्हांला पकडावयाचें आहे. हिंदुस्थांनातून पलायन करण्याचा त्यांचा विचार दिसतो. माझी त्यांच्यावर पाळत आहेच. मला जर त्यांचा कोठें सुगावा लागला, तर मी खात्रीनें त्यांना पकडीन. कालत्रयींहि सोडणार नाहीं." अशा अर्थाचें कांहींसें पुटपुटत पोलिससाहेबांची दृष्टि खोलींत चौफेर संचार करीत होती. तेथेंच टेबलावर टॉलस्टॉयचें 'धर्म' हें पुस्तक पडलेलें होतें, तिकडे पोलिससाहेबांची नजर फिरली. तें पुस्तक तेथें पडलेलें पाहतांच धार्मिक विषयावर वादविवाद करण्याची या अंमलदारास हुकी आली; व त्यांनीं इस्लामी धर्माची स्तुति करण्यास सुरुवात केली. एकंदर रागरंग पाहून कॉ. रॉय यांनींहि भरीसभर देण्याचा मनाशीं निश्चय केला व हळूहळू वादाच्या

भरांत पोलिसअंमलदारीहि खुलूं लागले. अशा रीतीनें वादविवाद चालला आहे इतक्यांत अंमलदारसाहेबांना आपण कशासाठीं आलों याची आठवण झाली असावी. कारण धार्मिक चर्चेचा ओघ थोडा ओसरल्याबरोबर तुम्हीं कोण, कुठलें, कुठें जाणार याची चौकशी करण्यास सदर पोलिस-अधिकाऱ्यांनीं सुरुवात केली. कॉ. रॉय म्हणाले, "आम्ही, आमचा येथील शिक्षण·क्रम संपवून परदेशांत उच्च शिक्षणासाठीं जात आहों! इंग्लंडलाच जाण्याचा आमचा मानस होता, पण सध्यां युद्धाची भीति आहे ना? म्हणून आम्हीं जपानला जावयाचें ठरविलें आहे."

थोडा वेळ त्या केबिनमध्यें स्तब्धता पसरली होती.

"आम्ही अशाच कांहीं लोकांच्या शोधांत आहोंत." पोलिस-अधिकारी म्हणाले.

"आणि हें पाहा, आम्हीच ते लोक नाहींत हें तुम्ही कशावरून म्हणतां?" बोलतां बोलतां, कॉ. रॉय हसून म्हणाले.

"हें पाहा माझें काम मला फार चांगलें साधतें. मला या कामाचा बराच अनुभव आहे. मी कोणत्याहि माणसाला नुसत्या तोंडावळ्यावरून ओळखूं शकतों. तुमच्या चेहऱ्यावरून तुम्ही गुन्हेगार असूं शकाल असा संशय घेण्यास मुळींच जागा नाहीं. काय, मी म्हणतों तें बरोबर आहे ना?" पोलिसअंमलदार आपल्याच तोऱ्यांत बोलत होते.

"बाकी, तुम्ही फारच चाणाक्ष दिसतां यांत शंका नाहीं." कॉ. रॉय यांनीं स्तुतिसुमनें उधळण्यास सुरुवात केली.

बोट सुटण्याची वेळ झालेली होती व सरकारी अंमलदारांना आपलें काम संपवून परत फिरणें आवश्यक होतें.

"मीं तुम्हांला थोडा त्रास दिला याबद्दल माफ करा हं! तुमच्याशीं झालेल्या संभाषणानें मला फार समाधान वाटलें. बरें, मी येतों आतां. तुमचा समुद्रप्रवास सुखाचा होवो!" आशीर्वाद देत देत पोलिसअंमलदारांची स्वारी आपल्या शिपाईप्याद्यांसह केबिनमधून बाहेर पडली.

आपल्या हातची एक शिकार गेली हें त्या बिचाऱ्यांना काय बरें माहीत! भों –ऽ–ऽ– असा आवाज झाल्यावर बोटीनें समुद्र किनारा मोडला. कॉ. रॉय हे अज्ञात अशा स्थळीं रवाना झाले. कॉ. रॉय यांची अशा रीतीनें अचानक सुटका झाली यांत त्यांचें अंगीकृत कार्य सफल व्हावयाचें होतें.

'हॅरि अँड सन्स' या कंपनीची ज्याप्रमाणें एक शाखा कलकत्त्यास होती, तशीच दुसरी एक शाखा बलसोरा येथें क्रांतिकारकांनीं चालू केली होती. पोलिसांना या कंपनीचा सुगावा लागल्यावर कलकत्ता तेथें झडती घेण्यांत आली, तशीच बलसोरा येथील शाखेचीहि झडती घेण्यांत आली. तेथून वीस मैलांवर असलेल्या केपाटापाडा या गांवीं मेव्हरिक जहाजासंबंधीं कांहीं महत्त्वाचे कागद आहेत याची माहिती पोलिसांस मिळाली व त्या आधारावर पोलिसांनीं तेथील कागद जप्त केले; व पांच बंगाली तरुणांना अटकहि करण्यांत आली. अशा महत्त्वाच्या ठिकाणीं सहाजासहजीं क्रांतिकारकांना अटक करणें शक्य नव्हतें. झडती व अटक होत असतांना पोलिसांशीं क्रांतिकारक तरुणांची चकमक उडाली. 'जतीन मुकर्जी' व 'चित्तप्रिय रे चौधरी' या दोन बंगाली क्रांतिकारकांचे प्राण या चकमकींत खर्ची पडले.

यापुढें मात्र या तरुण क्रांतिकारकांच्या चळवळीला निराळें स्वरूप प्राप्त झालें. सरकारहि आपलें पाऊल बेताबेतानें पुढें टाकीत होतें. कटाचे सर्व धागेदोरे हातीं आणण्याचे त्यांचे प्रयत्न फारच सावधगिरीनें सुरू झाले होते. 'मार्टिन'च्या हालचालीसंबंधानें मात्र तरुण मंडळींना फार काळजी वाटूं लागल्यामुळें, दोघा तरुणांनीं मार्टिन यांना बटेव्हियास गोव्याहून तार पाठवून विचारपूस केली. 'चॅटरटन' या टोपणनांवानें पाठविलेल्या या तारेंत "कसें काय चाललें आहे? कांहीं बातमी कळत नाहीं. फार काळजी वाटते." येवढा मजकूर होता. दुर्दैवानें याहि तारेचा सुगावा सरकारला लागला व तार पाठविणाऱ्या गोव्यांतील दोन बंगाली तरुणांना पोलिसांकडून अटक करण्यांत आली. भोलानाथ चतर्जी हे त्यांपैकीं एक होत. भोलानाथ यांना अटक करण्यांत आल्यावर, त्यांना पुण्याच्या तुरुंगात पाठविण्यांत आलें. तेथें त्यांनीं २७ जानेवारी १९१६ रोजीं आत्महत्या केली. अशा रीतीनें

क्रांतिकारक तरुणांच्या चळवळींतील एक मोहरा आत्मबलिदानानें गळून पडला.

**'एस्. एस्. मेव्हरिक' बोटीची हकीकत**

आतां आपण जरा मेव्हरिक या बोटीच्या हकीकतीकडे वळूं या. तसेंच या बोटीच्या इतिहासाबरोबर 'हेन्रि एस्.' नांवाच्या जहाजाच्या हालचालीचीहि माहिती आपणांस घ्यावी लागेल.

एस्. एस्. मेव्हरिक हें जहाज मूळचें स्टॅंडर्ड ऑईल कंपनीच्या मालकीचें होतें. हें जहाज पुढें 'एफ्. जेबरून आणि कंपनी' या नांवाच्या जर्मन व्यापारी कंपनीनें विकत घेतलें. ता. २२ एप्रिल १९१५ रोजीं हें जहाज कॅलिफोर्नियांतील सॅनपेड्रो या बंदरांतून माल घेऊन निघालें. जहाजावर नाविक व अंमलदार मिळून पंचवीस लोक होते. त्यांत नोकर म्हणून पांच इराणी लोकहि याच बोटीवर प्रवास करीत होते. क्रांतिकारक चळवळी करणाऱ्या ज्या अनेक संस्थांचें जाळें त्या काळीं बंगालमध्यें पसरलें होतें, त्यांपैकीं 'गधर पार्टी' नांवाची एक क्रांतिकारक संस्था होती. या पार्टीचे प्रमुख हरदयाळ, यांचे अनुयायी रामचंद्र, या तरुणानें व सॅन्फ्रान्सिस्को येथील जर्मन वकील व्हॉन ब्रिकन यांनीं बराच खटाटोप करून वरील बोटींतून हीं माणसें पाठविलीं होतीं. या बोटीवरील एक पंजाबी क्रांतिकारक हरिसिंग यांच्याबरोबर गधर पार्टीच्यासंबंधींचें बरेंचसें वाङ्मय एका ट्रंकेंत सांठविलें होतें. मेव्हरिक जहाजाला जाव्हा बेटांतील अंजारा नांवाच्या बंदरापर्यंत सुरक्षितपणें मार्ग मिळाला. इकडे 'ॲनी लॉरसन' नांवाची दुसरी एक छोटी बोट टॉझर नांवाच्या एका जर्मन इसमानें विकत घेऊन, त्या जहाजांतूनहि बंदुका व दारूगोळा पाठविला होता. ही बोट मेक्सिकोच्या पश्चिम बाजूस असलेल्या सोकोरा नांवाच्या बेटावर जावयाची व तेथें मेव्हरिक बोटीनें 'ॲनी लॉरसन'वरील दारूगोळा उतरावयाचा. तसेंच या दोन बोटींची भेट झाल्यावर एका तेलाच्या मोकळ्या टाकींत दारूगोळा व बंदुका भरावयाच्या; आणि अशा रीतीनें मेव्हरिक बोटीवर दारूगोळा जमा करावयाचा व मग या बोटीनें तो दारूगोळा बंगालमध्यें आणावयाचा; अशी ही एकंदर कटाची योजना ठरली होती. परंतु तसा योगायोग जुळून आला नाहीं. कारण दुर्दैवानें मेव्हरिक

बोटीची ॲनी लॉरसन बोटीशीं गांठच पडली नाहीं व ठरल्याप्रमाणें मेव्हरिक बोटीवर दारूगोळा चढवितां आला नाहीं. शेवटीं नाइलाजानें मेव्हरिक बोटीला होनुलुलू बेटाच्या मार्गानें जाव्हा बेटाकडे जाणें भाग पडलें व हा बेत फसला. जाव्हा बेटांत मेव्हरिक जहाज आल्यावर तेथील पोलिस-अधिकाऱ्यांनीं जहाजाची तपासणी केली, परंतु त्यावर संशयास्पद असें कांहींच मिळालें नाहीं. इकडे 'ॲनी लॉरसन' हें जहाज १९१५ च्या जुलै महिन्याच्या मध्याच्या सुमारास अमेरिकेच्या किनाऱ्याला लागलें. जर्मन वकील काउंट बर्न्सडॉर्फ यांनीं जहाजावर जर्मनीचा हक्क आहे असें सांगितलें; परंतु त्यांच्या म्हणण्याचा कांहींहि उपयोग झाला नाहीं. अमेरिकन सरकारनें लॉरसन जहाज जप्त केलें. इकडे थिओडोर हेल्फरिच यांनीं मेव्हरिक बोटीवरील खलाशांची योग्य ती काळजी मात्र घेतली व सर्व लोकांना परत अमेरिकेला पाठविलें.

वरीलप्रमाणें मेव्हरिक जहाजाचा बेत फसला तरी, याच कटाच्या सिद्धयर्थ 'हेन्री एस्.' नांवाचें बंदुका आणि काडतुसें यांनीं भरलेलें दुसरें जहाज मॅनिला बंदरापासून शांघायच्या मार्गानें पाठविण्यांत येत होतें. दुर्दैवानें या वेळीं सरकारी अधिकाऱ्यांना सर्वच कटाचा सुगावा लागला होता व त्यांना या दुसऱ्या जहाजाच्या हालचालीचीहि बातमी लागली व त्याप्रमाणें सरकारी अधिकाऱ्यांनीं 'हेन्री एस्.' या जहाजाला गांठून त्याची तपासणी केली आणि आंतील सामान मॅनिला बंदरावर उतरून घेतलें व मग या जहाजास पुढें जाण्यास परवानगी देण्यांत आली. या जहाजाची मोटार वाटेंत नादुरुस्त झाल्यामुळें 'सिलेबरा' बंदरावर या जहाजास थांबणें भाग पडलें. याच जहाजावर मि. व्हिड व मि. बोहम नांवाचे जर्मनवंशाचे दोन अमेरिकन नागरिक होते. शिकागो येथील एच्. गुप्ता नांवाच्या इसमाच्या सूचनेप्रमाणें मि. बोहम यांनीं 'हेन्री एस्.' ही बोट मॅनिला बंदरावर गांठली व तींत ते चढले. तसेंच दुसरी एक सूचना मॅनिला येथील जर्मन कॉन्सलनें या गृहस्थास दिली होती ती अशी कीं, या गृहस्थानें बँकॉक येथें ५०० पिस्तुलें उतरून घ्यावयाचीं व बाकीच्या ५००० पिस्तुलांची रवानगी चितगांग या शहरीं करावयाची. परंतु हेन्री एस्. हें जहाज सिलेबरा बंदरावर अडकून राहिल्यामुळें मि. बोहम हे

तेथेंच राहिले. पुढें त्यांनीं युक्तिप्रयुक्तीनें बटाव्हियाच्या मार्गानें सिंगापूर गांठलें. परंतु तेथेंहि बोहम यांस अटक करण्यांत आली व सर्वच बेत ढासळले.

वर सांगितल्याप्रमाणें मेव्हरिक जहाजाचा बेत ढासळला होता परंतु तेवढ्यानें न डगमगतां बंगालच्या सामुद्रधुनींतून हत्यारांनीं भरलेलीं दोन जहाजें, एक रायमंगल येथें व दुसरें बलसोरा येथें पाठविण्याचा तिसरा बेत शांघाय येथील जर्मन कॉन्सलनें ठरविला. या दोन जहाजांपैकीं एका जहाजांत २० हजार बंदुका, ८ लक्ष काडतुसें, २ हजार पिस्तुलें व कांहीं हात बॉंब असा दारूगोळा पाठविण्याचें ठरलें होतें.

हतिया बंदराला येणारें जहाज हें शांघायकडून सुटावयाचें व साधारणतः डिसेंबरच्या अखेरीस तें हतिया बंदरावर येईल अशी व्यवस्था करावयाची. डच बंदरावर असलेल्या जर्मन जहाजाची बलसोरा येथें रवानगी व्हावयाची. लढाईच्या कामगिरीवर असलेल्या तिसऱ्या एका जहाजानें दारूगोळा घेऊन अंदमानकडे जाऊन 'पोर्ट सेंट' बंदरावर स्वारी करून तेथील कैद्यांना मोकळें करावयाचें. सिंगापूर रेजिमेंटमध्यें जें बंड झालें होतें तेथील सैनिक पोर्ट सेंटला असावेत असा या मंडळींचा तर्क होता. अशा रीतीनें तेथील सैनिकांच्या सहकार्यानें रंगूनवर स्वारी करून तें हस्तगत करावयाचें, असा बेत त्यांनीं आंखला होता. बंगालमधील कटवाल्यांना व क्रांतिकारकांना मदत करण्यासाठीं हेल्फरिचसाहेबांनीं ६६ हजार गिल्डर नाणीं बरोबर देऊन एका चिनी इसमाला पाठवून दिलें होतें. पेनांग येथील एका बंगाली इसमाला देण्यासाठीं एक पत्रहि सदर इसमाबरोबर देण्यांत आलें होतें; पण हा बेत यशस्वी झाला नाहीं. सदर चिनी इसमाला सिंगापूर येथें अटक झाली व पैसेहि सरकारला मिळाले आणि पुढचे बेत अशा रीतीनें फसले. इकडे अशा बिकट परिस्थितींत मार्टिनसाहेबांबरोबर बटाव्हियाला गेलेल्या बंगाली इसमाची शांघायला रवानगी करण्यांत आली. शांघाय येथें असलेल्या जर्मन कॉन्सलबरोबर विचारविनिमय करून मग 'हतिया' बंदरावर येणाऱ्या जहाजांत बसून परत यावयाचें असें ठरलें होतें. हें काम सदर बंगाली इसमास देण्यांत आलें होतें. मोठ्या प्रयासानें हा बंगाली इसम शांघाय

येथें पोंहोचला खरा; परंतु येथेंहि क्रांतिकारकांचें दुर्दैव आडवें आलें व शांघाय येथें या बंगाली इसमास अटक करण्यांत आली.

हिंदुस्थान देश स्वतंत्र करण्याकरितां क्रांतिकारकांच्या वरीलप्रमाणें खटपटी चालल्या होत्या; परंतु या सर्व खटपटी वायां गेल्या. जतीनसारखा मोहरा सुरुवातीसच मृत्युमुखीं पडला. अनेक सहकारी महत्त्वाच्या व आणीबाणीच्या वेळीं पकडले गेले. कित्येकांना फासावर लटकावें लागलें. कांहींना लांबमुदतीच्या शिक्षा झाल्या. क्रांतिकारकांच्या गोटांत हेरांचा सुळसुळाट उत्पन्न झाला. पैशाची मदत मोठ्या प्रमाणावर व्हावयाची तीहि चिनी इसमाच्या अटकेमुळें थांबली. जपानकडे पाठविलेले सुप्रसिद्ध क्रांतिकारक तरुण 'अबिन मुकर्जी' यांच्याजवळ असलेले महत्त्वाचे कागदपत्र व डायऱ्या पोलिसांच्या ताब्यांत अचानक रीतीनें गेल्या. अशा एक ना दोन संकटांमुळें क्रांतिकारक चळवळीचा फैलाव होण्याच्याऐवजीं क्रांतिकारकांच्या या चळवळीच्या नाड्या मात्र आखडून गेल्या.

## विचारमालिकेस सुरुवात

क्रांतिकारक चळवळ यशस्वी व्हावयाची असेल तर, त्या चळवळीस जनतेचा पाठिंबा पाहिजे हें त्या वेळीं पुढाऱ्यांच्या लक्षांत आलें नाहीं. कोणतीहि चळवळ यशस्वी व्हावयाची असेल तर तिला बहुजन समाजाचा पाठिंबा पाहिजे. या समाजाच्या आकांक्षा व गरजा यांवरच ही चळवळ उभारली पाहिजे. कांहीं मध्यमगींय तरुणांचा क्रांतिकारक ध्येयवाद अगर कांहीं सैनिकांची अस्वस्थता, यांमुळें राष्ट्रीय स्वातंत्र्याचा प्रश्न सुटणें शक्य नाहीं, हें आतां आमच्या या तरुण क्रांतिकारकांच्या लक्षांत येऊं लागलें. कॉ. रॉय यांच्या चरित्रांतील वैचारिक क्रांतीचा हाच काल होता. या चळवळींत बहुतेक सर्व क्रांतिकारक पुढाऱ्यांच्या मनःपटावर या ऐतिहासिक सिद्धान्ताचा प्रकाश अनुभवामुळें स्पष्ट रीतीनें पडला. परकीय सत्तेविरुद्ध लढतांना आपल्या पाठीमागें दलित जनता उभी पाहिजे व तिच्या गरजा ह्याच त्या चळवळीचा आत्मा होत, ही गोष्ट पहिल्या प्रथम कॉ. रॉय यांच्यासारख्या विचारी क्रांतिकारक तरुणांच्या मनावर बिंबली. आज अशी जनता कोणती ?

कोणाच्या जिवावर ही अवाढव्य चळवळ उभारावयाची? कोणत्या वर्गाचा पाठिंबा शेवटपर्यंत आपल्या चळवळीला मिळेल? असे प्रश्न या पुढाऱ्यांच्या मनांत आतां येऊं लागले. भावनेचा भर ओसरल्यामुळें इतिहासाकडे सूक्ष्म दृष्टीनें पाहण्याची दृष्टि त्यांना आली. १९१६ सालच्या सुमारास कॉ. रॉय यांना स्पष्ट रीतीनें कळून चुकलें, कीं बहुजन समाजाच्या आर्थिक गरजांवर समाजाची संघटना करणें, ही क्रांति यशस्वी करण्याची गुरुकिल्ली आहे! हें कळण्यासाठीं या क्रांतिकारकांना अनुभवाचे धडे घ्यावे लागले. केवळ पांडित्य करून क्रांतीच्या गप्पा मारण्यांत त्यांचा वेळ गेला नव्हता, तर उलट प्रत्यक्ष अनुभवाचे खडे बोल त्यांच्या मनावर बिंबले असल्याकारणानें कॉ. रॉय यांच्या हातून पुढील आयुष्यांत प्रभावी व विशाल अशी कामगिरी पार पडली. कॉ. रॉय यांच्या यापुढील आयुष्यांतील हकीकतीकडे आपण आतां क्रमाक्रमानें वळूं या.

---

# ५ विस्मयजनक सुटका

सशस्त्र क्रांतीचा बेत जनतेची तयारी नसल्यामुळें फसला व कॉ. रॉय हे बटाव्हियाहून हिंदुस्थानांत परत आले. हिंदुस्थानांत प्रथम गोवा येथें येऊन ते उतरले; परंतु त्यांच्यामागें पोलिसांचा ससेमिरा अहोरात्र होता. तेथें आणखी दोन बंगाली क्रांतिकारक त्यांस भेटले, परंतु सिकंदराबाद येथील हे तिघे क्रांतिकारक एके दिवशीं जर्मन कॉन्सलशीं पत्रव्यवहार करण्यासंबंधीं खलबत करीत असतांना कागद-पत्रासह सर्वजण पकडले गेले. त्यावेळीं सिकंदराबाद येथें बंडखोर कैद्यांचें मुख्य ठाणें असे. या तिघांहि तरुणांना, पोलिसांनीं सिकंदराबाद येथें रवाना केलें व तेथें असतांना कॉ. रॉय हे मोठ्या शिताफीनें तुरुंगांतील अधिकाऱ्यांच्या हातांवर तुरी देऊन निसटले. दुर्दैवानें मागें राहिलेले दोन तरुण बादशहाविरुद्ध कट केल्याच्या आरोपावरून पुढें फासावर लटकले गेले हें सर्वविश्रुत आहेच. अशा रीतीनें कॉ. रॉय हे निसटले खरे; परंतु त्यांच्यावरहि बादशहाविरुद्ध बंडाचा आरोप असल्यामुळें त्यांना इतःपर हिंदुस्तानांत राहणें फारच धोक्याचें होतें. लागलीच त्यांनीं हिंदुस्थान सोडून जाण्याचा निश्चय केला व ते त्या मार्गास लागले. रॉय यांनीं हिंदुस्थान सोडल्यावर ते कसे फरारी झाले व ते प्रथम कोठें गेले याबद्दलची इत्थंभूत माहिती मिळणें शक्य नाहीं. येवढें खरें कीं, हिंदुस्थान सोडल्यावर ते प्रथमतः डच इंडीजमध्यें येऊन दाखल झाले; परंतु तेथेंहि त्यांना फार वेळ राहतां येईल असें त्यांस चिन्ह दिसेना. म्हणून त्यांनीं फिलिपाइन देशांत पळ काढला. वाटेंत इंडोचायनांतील सायगॉन बंदरावर बोट थांबली तेव्हां फ्रेंच सरकार कॉ. रॉय यांना तेथें उतरूं देईना. आठ दिवसपर्यंत लष्करी पहाऱ्यांत रॉय यांना बोटीवरच काढावे लागले. ही बोट पुढें हॉंगकॉंगला जाणार होती व तेथें तर आपण खात्रीनें पकडले जाऊं; याचा पूर्ण विचार करून

रॉय यांनीं सुटकेचा एक नवीनच मार्ग शोधून काढला. रॉय यांनीं बोटीच्या कप्तानाला थोडे पैसे चारले व आपण स्वतः दुसऱ्या बोटींत चढून ते फिलिपाइन्सला निघून गेले. फिलिपाइनमधून कॉ. रॉय यांची स्वारी चीनमध्यें येऊन थडकली.

चीनमध्यें असतांना चीनचे प्राण व स्वातंत्र्यसंस्थापक डॉ. सन्-यत्-सेन यांची कॉ. रॉय यांच्याशीं गांठ पडली व दोघांचें दाट मैत्रींत रूपांतर झालें. येथें असतांना हिंदी लोकांच्या स्वातंत्र्याचा प्रश्न आणि चीन देशांतील लोकांचा प्रश्न या विषयांवर या दोन सुप्रसिद्ध क्रांतिकारकांची तासन् तास चर्चा होत असे. या भेटीचें पर्यवसान दोघांच्या राजकीय मतैक्यांत झालें. कॉ. रॉय यांच्याबद्दल डॉ. सन्-यत्-सेन यांना फार आदर असे व चीनमध्यें असतांना रॉय यांना सन्-यत्-सेन यांनीं फारच मदत केलेली आहे. एकदां तर चीनमध्यें रॉय यांना पोलिसांनीं अटक करून तुरुंगांत डांबून टाकलें परंतु डॉ. सन्-यत्-सेन व त्यांचे मित्र यांच्या मदतीनें याहि संकटांतून ते सुटून गेले.

---

# ६ अमेरिकेंत

चीनमधून आपले चरित्रनायक हे बटाव्हियाच्या मार्गानें अमेरिकेच्या किनाऱ्याला येऊन थडकले. रॉय अमेरिकेला आले ते कॅथॉलिक पाद्र्याच्या वेषांत आले. पण अमेरिकेंत पाऊल टाकतांच 'जर्मनीचा हेर अमेरिकेंत आला' अशी वर्तमानपत्रांनीं ओरड करण्यास सुरुवात केली. म्हणून रॉय हे घाईघाईनें हिंदी क्रांतिकारकांच्या गधर पक्षांतील लोकांना प्रथम भेटले व त्यांना योग्य तो इशारा त्यांनीं दिला. कॉ. रॉय यांनीं तेथें असतांना जर्मनीच्या परराष्ट्रीय वकिलाची प्रथम भेट घेतली. तेथें झालेल्या संभाषणांत कॉ. रॉय यांच्या डोक्यांत जर्मनयुद्धाबद्दल प्रकाश पडला. महायुद्धाच्या पोटीं जर्मनीची साम्राज्यतृष्णा होती हें कॉ. रॉय यांना या भेटींत चांगल्या रीतीनें उमगलें. जर्मनीनें हिंदी क्रांतिकारकांना मदत करण्याचें ठरविलें तें कां बरें? हिंदुस्थान स्वतंत्र व्हावा अशी का जर्मनीची इच्छा होती? महायुद्धांत इंग्लंडला जी हिंदुस्थानची मदत होत होती तिला पायबंद घालणें व इंग्लंडला चहूंबाजूंनीं युद्धांत गुंतविणें हाच हिंदुस्थानांतील क्रांतिकारकांना मदत करण्यांत जर्मनीचा उद्देश होता. जर्मन साम्राज्यशाहीचा उद्देश जर्मन कॉन्सल जनरलच्या तोंडून कसा अचानकपणें बाहेर पडला तें मनोरंजक असल्यामुळें कॉ. रॉय व जर्मन वकील यांच्या भाषणाचा गोषवारा खालीं दिला आहे.

**जर्मन कॉन्सलला सडेतोड उत्तर**

"काय हो, जर आपण ब्रिटिशांना हिंदुस्थानांतून हाकलून देऊं शकलों, तर जर्मनीला हिंदुस्थानची कोणती बरें मदत मिळेल? तुमच्या देशांत जर्मनीला व्यापारी सवलती मोठ्या प्रमाणांत मिळतील काय?" असा जर्मन कॉन्सल जनरलनें कॉ. रॉय यांना सहज प्रश्न टाकला.

कॉ. रॉय यांचें विचारचक्र जोरानें चालूं लागलें. जर्मन मैत्रीच्या बुरख्याखालीं भीषण साम्राज्यशाहीचा दडून राहिलेला डाव उघडा पडला. फार वेळ

विचारांत न घालवितां कॉ. रॉय यांनीं कॉन्सल जनरलला जरा तोऱ्यांतच उत्तर दिलें—

" तर मग तुमच्या म्हणण्याचा आशय मला असा दिसतो, कीं जर्मनीची मदत घेऊन तिची परतफेड म्हणून आम्ही आपला देश एका राष्ट्राऐवजीं दुसऱ्या राष्ट्राला विकावयाचा ! असेंच ना ? आमची याला कधींहि संमति मिळावयाची नाहीं. ही देवघेव शुद्ध निर्लज्जपणाची आहे. तुमची ही मागणी आम्ही झिडकारतों. इतकेंच नव्हे तर, जो कोणी अशा रीतीनें आपल्या देशाच्या स्वातंत्र्याचा लिलांव करण्यास तयार होईल, त्याविरुद्ध आम्ही शस्त्र उपसण्यासहि कमी करणार नाहीं. आमची अशी वेडी समजूत होती, कीं जर्मनी आम्हांला जी मदत करणार, ती आम्हांला स्वातंत्र्य प्राप्त व्हावें म्हणून. पण ही कल्पना केवळ स्वप्न ठरली. हिंदी लोक यापुढें कोणत्याहि परकीय राष्ट्राचे गुलाम होण्यास तयार नाहींत; मग जर्मन राष्ट्र तरी असें कोठून स्वर्गांतून उतरलें !"

कॉ. रॉय हे अधिक निश्चयी स्वरानें पुढें बोलूं लागले—

" माझी अशी पक्की खात्री झाली आहे, कीं हिंदी लोकांनीं आपल्या सामर्थ्यावरच अवलंबून राहिलें पाहिजे व परकीय सत्तेविरुद्ध राष्ट्रीय स्वातंत्र्याकरितां निकरानें लढलें पाहिजे.

कॉ. रॉय यांनीं जशास तसें, या न्यायानें जर्मन कॉन्सलची संभावना केली व ते तांतडीनें जावयास निघाले. जर्मन वकिलानें आग्रहानें थांबवून त्यांना पुन्हा म्हटलें, " मला आजपर्यंत अनेक हिंदी तरुण भेटले, पण माझा व त्यांचा या बाबतींत मतभेद झालेला नाहीं. तुम्हीच तेवढे एक अपवाद मला दिसतां." जर्मन कॉन्सल जनरलनें पुन्हा एकदां उत्तराच्या अपेक्षेनें दुसरा सवाल केला.

कॉ. रॉय शांतपणानें म्हणाले; " आपण म्हणतां तसें असेल कदाचित्. पण ब्रिटिश राज्य नाहींसें करण्याच्या उत्साहातिरेकामुळें तुमच्या म्हणण्याचा गर्भितार्थ त्यांच्या लक्षांत आला नसावा असें मला वाटतें. नाहीं तर देशप्रेमाच्या बाबतींत ते माझ्यापेक्षां कांकणभरहि कमी भरणार नाहींत.

कॉ. रॉय यांच्या डोक्यांत एकंदर राजकीय परिस्थितीसंबंधानें लख्ख प्रकाश पडूं लागला. जर्मनी युद्धांत पडला तो दलित राष्ट्रांचें रक्षण करण्यासाठीं थोडाच पडला होता! लोकशाहीचें संरक्षण करणें हाहि त्या राष्ट्राचा उद्देश नव्हता अगर महायुद्ध जगांतून नाहींशीं व्हावींत हाहि नव्हता. फक्त जगांतील मागासलेल्या राष्ट्रांना कसें नागवितां येईल व जगाच्या बाजारांत आपलें व्यापारी स्वामित्व कसें स्थापन करतां येईल, एवढाच काय तो स्वार्थी उद्देश या महायुद्धाच्या मुळाशीं होता हें आतां अगदीं सूर्य प्रकाशाइतकें स्पष्ट झालें होतें. कॉ. रॉय यांना तर या बाबतींत काडीचाहि संशय उरला नव्हता. इकडे इंग्लंड हिंदुस्थान व इतर वसाहती यांमधून करोडो रुपयांची संपत्ति लुटीत होतें, तर तिकडे जर्मन राष्ट्र जर्मन ईस्ट आफ्रिकेसारख्या वसाहतींतून तीच लूटमार करीत होतें. नांवांत फरक—कृति मात्र एकच! अशा रीतीनें जर्मन साम्राज्यशाहीचें अंतरंग उघडें पडल्यावर व त्याची खरी परीक्षा झाल्यावर स्वातंत्र्याच्या लढ्याचीं साधनें, उपकरणें व मार्ग यांतहि बदल करणें अवश्य झालें. इकडे इंग्लंड युद्धांत गुंतलें आहे अशा वेळीं केवळ आपण हिंदुस्थानांत क्रांतिकारक उठाव केला म्हणजे भागलें, इतका साधा व सोपा मार्ग हिंदी स्वातंत्र्याचा नाहीं हें रॉय यांना पक्कें कळून चुकलें. केवळ कांहीं तरुणांच्या सशस्त्र उठावानें समाजक्रांति अथवा राज्यक्रांति होत नसते. या उठावाला पाठिंबा देण्यासाठीं देशांतील बहुजनसमाज तयार असल्याखेरीज क्रांतिकारक परिस्थिति निर्माण झाली असें म्हणतां येत नाहीं. आणि देशांतील जनता क्रांतीला तयार झाल्यावर परदेशाच्या मदतीवर अवलंबून राहण्याची तरी काय आवश्यकता? महायुद्धाचा फायदा हिंदी जनतेला घेतां आला असता, पण केव्हां? हिंदी जनता राजकीय दृष्ट्या क्रांतीला तयार असती तर! बहुजनसमाज क्रांतीला तयार आहे, आणि राज्यकर्ते व त्यांच्या सत्तेखालीं भरडली जाणारी जनता यांच्यांत तीव्र विरोध उत्पन्न झाला आहे अशा वेळीं महायुद्धासारखा प्रसंग उद्भवला तर मात्र त्या संधीचा फायदा दलित राष्ट्रांना यशस्वी रीतीनें घेतां आला असता. जनतेच्या सहकार्यानें दळणवळणाचे मार्ग बंद करून परकीय राजसत्तेच्या नाड्या आखडतां आल्या असत्या; सरकारला ठिकठिकाणीं सळो कीं पळो करून सोडतां आलें असतें, सरकारच्या तिजोरींत

पैशाचा खडखडाट उत्पन्न करतां आला असता, व क्रांतीला उग्र स्वरूप देतां आलें असतें. पण तितकी समाजजागृति हिंदुस्थानांत झाली नसल्यामुळें परराष्ट्रीयांच्या साहाय्यानें हिंदुस्थानांत क्रांति घडवून आणणें अशक्य आहे, अशी कॉ. रॉय यांची खात्री झाली.

**कॉ. रॉय व दे. भ. लाला लजपतराय**

कॉ. रॉय हे अमेरिकेंत असतांना त्यांची व कै. दे. भ. लाला लजपतराय यांची गांठ पडली. याच सुमारास कै. दे. भ. लालाजी यांना ब्रिटिश सरकारनें हद्दपार केल्यामुळें त्यांनीं अमेरिकेचा आश्रय केला होता. कॉ. रॉय व लाला लजपतराय हे दोघेहि एकत्र राहत असत व या अवधींत हिंदी राजकीय परिस्थितीची रॉय यांना चांगली कल्पना आली. राजकीय प्रश्नां-संबंधीं या दोघांची नेहमीं चर्चा होत असे. अमेरिकेंत असतांना रॉय यांना स्वस्थपणें विचार करण्यास अवसर मिळाला. तसेंच राजकीय चळवळींत अनेक पक्षोपपक्षांची माहितीहि त्यांना मिळवितां आली. समाजशास्त्र, इतिहास व तत्त्वज्ञान वगैरे विषयांचा अभ्यास करण्यास त्यांना अमेरिकेंत चांगली संधि मिळाली व भरपूर वेळहि मिळाला आणि थोड्याच काळांत या शास्त्रांतील त्यांची प्रगति विद्वान् लोकांच्या डोळ्यांत भरण्यासारखी झाली. राजकारणी समजल्या जाणाऱ्या विद्वानांत कॉ. रॉय यांचें नांव मोठ्या आदरानें उच्चारलें जाई. हळूहळू अमेरिकेंतील प्रमुख अशा वर्तमानपत्रांतून आणि मासिकां-तून हिंदी राजकीय प्रश्नांवर कॉ. रॉय यांचे लेखहि येऊं लागले. हिंदी राजकीय चळवळीविषयीं त्यांनीं लिहिलेले लेख व विशेषतः ऐतिहासिक जडवादाच्या आधारानें हिंदी राजकीय लढ्याची त्यांनीं केलेली मीमांसा ही अत्यंत मार्मिक अशी होती. कोठेंहि जा, मग तो समाजवादी लोकांचा संघ असो, कामगारांची सभा असो, अथवा कामगार–चळवळीसंबंधानें चाललेली चर्चा असो; तेथें कॉ. रॉय यांचें नांव मुख्यत्वेंकरून पुढें यावयाचेंच. त्या काळीं मार्क्सिस्ट तत्त्वज्ञानाची सांगोपांग माहिती असणाऱ्या ज्या कांहीं थोड्या व्यक्ति होत्या त्यांत कॉ. रॉय यांचें नांव प्रामुख्यानें पुढें येत असे. रॉय हे अमेरिकेंत असतांना कै. लाला लजपतराय यांनीं, 'इंग्लंड्स डेट टु इंडिया' या नांवाचें एक पुस्तक लिहिण्यास घेतलें होतें. हें पुस्तक

लिहिण्याच्या कामीं रॉय यांनीं लालाजींना पुष्कळच मदत केली. म्हणून तें पुस्तक दोघांच्याहि नांवानें प्रसिद्ध करावें असें ठरलें होतें; पण प्रो. सेलिग्मन् यांच्या सांगण्यारून लालाजींनीं, "हिंदी चळवळीचें उद्दिष्ट साम्राज्यांतर्गत स्वराज्य हें आहे" असें पुस्तकांत केलेलें विधान रॉय यांना पसंत न पडल्यामुळें पुढें तें पुस्तक एकट्या लालाजींच्या नांवानेंच प्रसिद्ध झालें. लालाजींना रॉय यांचा स्वभाव अतिशय आवडत असे व त्यामुळें ते शक्यतोंवर एकमेकांस सोडून राहत नसत. अमेरिकेंतील सुप्रसिद्ध कम्युनिस्ट पुढारी कॉ. जे. लव्हस्टोन व कॉ. रॉय यांची भेट याच सुमारास झाली व या भेटीचें लवकरच दाट मैत्रींत रूपांतर झालें. कॉ. रॉय हे केवळ चर्चा करणारे मार्क्सिस्ट नव्हते; किंवा चार-दोन लेख लिहून अगर भाषणें करून केवळ शब्दच्छल करणारे विद्वान् समजले जात नव्हते. 'बोले तैसा चाले' या न्यायानें आपल्या तत्त्वज्ञानाप्रमाणें प्रत्यक्ष आचरण करून व कामगार-चळवळींत भाग घेऊन ते लोकांना मार्गदर्शक होत असत.

कोठेंहि जा 'पळसाला पानें तीनच' अशी आपल्याकडे म्हण आहे. अमेरिका हें राष्ट्र जरी मतस्वातंत्र्याचें अगर राजकीय स्वातंत्र्याचें भोक्तें असलें, तरी क्रांतिकारकांना आपली चळवळ करण्यास तें सरकार थोडेंच स्वातंत्र्य देणार होतें ! कॉ. रॉय यांच्याकडे अमेरिकन सरकारची वक्र दृष्टि वळण्यास फारसा वेळ लागला नाहीं. राजकीय सभांतून आपली विचारसरणी अगदीं स्पष्टपणें मांडून जनतेला प्रचलित सरकारविरुद्ध आणि समाजपद्धतीविरुद्ध उठाव करण्यास सांगणें हें कोणतें सरकार सहन करील? अमेरिकन सरकारलाहि कॉ. रॉय यांची चळवळ असह्य होऊं लागली. संधि सांपडतांच अमेरिकन सरकारनें रॉय यांना अटक करण्याचा हुकूम सोडला. पोलिसांनीं रॉय यांना अटक करून पोलीसठाण्यावर नेलें. दुसऱ्या दिवशीं त्यांच्यावरील खटल्यास सुरुवात झाली. कोर्टांत आपल्या जबानींत रॉय म्हणाले, "मजजवळ म्हणाल तर पैसा कांहीं नाहीं. माझें या ठिकाणीं कोणी ओळखीचेंहि नाहीं. जर मला माझ्या स्वतःच्या जबाबदारीवर जामिनावर सोडीत असाल, तर

माझ्या बचावाची कांहीं तरी व्यवस्था करतां येईल." असें सांगून रॉय यांनीं कशीबशी जामिनावर सुटका करून घेतली. कोर्टानें त्यांना जामिनावर मुक्त करून दुसऱ्या दिवशीं वेळेवर कोर्टांत हजर राहण्याचा हुकूम केला.

ही वेळ जरा आणीबाणीची होती. जामिनावर सुटलों म्हणून काय झालें ? आपल्या चळवळीबद्दल सरकार आपल्याला तुरुंगांत डांबून ठेवल्याखेरीज राहत नाहीं याबद्दल रॉय यांची खात्री झाली होती. मग आतां काय करावें ? मोठा विचार येऊन पडला. जें कार्य आपण अंगिकारिलें तें कसें पुढें जाईल ? तुरुंगांत राहण्यानें जाईल, कीं त्याला कांहीं दुसरी तोड काढली पाहिजे ? कोर्टाच्या: निकालाबद्दल तर बालंबाल खात्री होऊन चुकली होती. कोणता तरी एक निश्चय करणें जरूर होतें. 'तुरुंग का पलायन' असा एकच विचार रॉय यांच्या डोक्यांत घोळत होता. अखेर निश्चय तर ठरला.

---

## ७ मेक्सिकोंतील क्रांतियुद्धांत उडी

आपले चरित्रनायक यांनीं काय निश्चय केला असेल हें वाचकांना सांगण्याची जरूरी नाहीं. अमेरिकेहून कॉ. रॉय यांची स्वारी अमेरिकन सरकारच्या हातावर तुरी देऊन मेक्सिकोमध्यें येऊन थडकली. मेक्सिकोमध्यें आल्यावर तेथील परतंत्र जनतेच्या यातना प्रत्यक्ष पाहिल्यामुळें कॉ. रॉय यांनीं मेक्सिकन लोकांच्या स्वातंत्र्याच्या लढ्यांत उडी घेतली.

रॉय यांच्या आयुष्यक्रमाला आतां मात्र अगदीं निराळेंच वळण लागलें. जर्मनीची मदत घेऊन हिंदी क्रांतिकारांची चळवळ करणारा हा तरुण, मेक्सिकोमधील दलित जनतेमध्यें जाऊन त्यांच्या स्वातंत्र्याची जबाबदारी आपल्या अंगावर घेतो हा केवढा महत्त्वाचा फरक!! राजकीय चळवळीच्या मुळाशीं असलेली 'राष्ट्र' या शब्दांत सांठलेली आकुंचित कल्पना जाऊन 'साम्राज्यशाहीच्या कचाट्यांतून दलित जनतेची सोडवणूक करणें' अशी व्यापक कल्पना रॉय यांच्या हृदयांत दृढमूल झाली. जनतेची होत असलेली पिळवणूक थांबविणें हें एकच एक राजकीय ध्येय बहुजनसमाजाचें असूं शकतें हें रॉय यांना अनुभवानें पटलें. आपलें राष्ट्र स्वतंत्र करण्याच्या भावनेंत दुसऱ्या राष्ट्राची बेडी आपल्या पायांत ठोकून घेणें हें तितकेंच घातक आहे, हा धडा आतां रॉय यांना पक्का पाठ झाला होता. कोणत्याहि राष्ट्रांतील जनतेची पिळवणूक परकीय लोकच करतात असें नसून आपल्या जातीचे, धर्माचे व आपल्याच देशांतील लोक आपल्या बांधवांचें रक्तशोषण तितक्याच क्रूरपणानें करीत असतात हा सिद्धान्त आतां रॉय यांना आत्मसात् झाला होता, आणि कॉ. रॉय यांनीं संस्कृतिहीन अशा समजल्या जाणाऱ्या काळ्या लोकांच्या मेक्सिको देशांत जाऊन त्यांच्या स्वातंत्र्ययुद्धाची धुरा आपल्या खांद्यावर आपण होऊन घेतली. अमेरिकेहून पलायन करून केवळ

'जीव बचावणें' हा कॉ. रॉय यांचा उद्देश नव्हता; तर दलित जनतेला स्वातंत्र्य मिळवून देण्याकरितां त्यांनीं अमेरिका सोडली व आपला जीव अधिक धोक्यांत घातला आणि त्यांनीं आपला निश्चय एक क्षणाचाहि विलंब न करतां पार पाडला.

मेक्सिको देशांत या वेळीं जनतेंत फारच अस्वस्थता माजलेली होती. 'राबणारांची जमीन' असा आवाज खोपटाखोपटांतून बाहेर पडत होता. १९१० सालापासून मेक्सिकोंतील शेतकऱ्यांत चळवळीला सुरुवात झाली होती. दिवसेंदिवस चळवळीचा ओघ फोफावत चालला होता. या वेळीं मेक्सिकन जनतेला मार्गदर्शक असे दोन तरुण त्यांच्या सुदैवानें लाभले होते. लहानपणापासून 'ॲलव्हॅरो ऑब्रिगॉन' व 'प्लूटार्को कार्ल्स' या दोन तरुणांचा जहाल मताकडे ओढा होता. ऑब्रिगॉन हे एका मळ्यांत काम करणारे तरुण तर प्लूटॉर्को हे मेक्सिकोमधील शाळामास्तर होते. हळूहळू दोघेहि तरुण, मेक्सिकोंतील सैन्याच्या मुख्याधिपतीच्या जागेपर्यंत चढले. तेथील स्थानिक रहिवाशांच्या आवश्यक अशा मागण्यांवर भर देऊन सामाजिक क्रांति घडवून आणण्याच्या कामीं या दोन तरुणांनीं जिवापाड मेहनत घेतली होती. या चळवळीचा व्हावयाचा तो परिणाम होऊन, मेक्सिको हा देश स्वतंत्र झाला व १९११ सालीं 'मादिरो' व १९१४ सालीं 'कॅरेन्झा' यांना मेक्सिकन प्रजासत्ताक राष्ट्राचें अध्यक्षपद देण्यांत आलें. कॅरेन्झा यांच्या कारकीर्दीत ऑब्रिग्रॉन हे मेक्सिकोंतील मुख्य प्रधान झाले. अशा परिस्थितींत कॉ. रॉय मेक्सिकोंत येऊन उतरले. मेक्सिकोंत कॉ. रॉय आले ते हवापालट करण्यासाठीं आले होते असें नव्हे; तर मेक्सिकोंतील गरीब जनतेची भांडवलदारांकडून होत असलेली पिळणूक थांबविणें हें एकच ध्येय कॉ. रॉय यांच्या डोळ्यांपुढें असल्यामुळें, तेथील राजकीय लढ्यांत त्यांनीं उडी घेतली. संघटनाचातुर्य, क्रांतीचे डाव खेळण्यांत दिसून येणारी अलौकिक धडाडी, अहोरात्र काम करण्याची मानसिक तयारी, राजकारणांतील डावपेच चटकन ओळखून काढण्यास लागणारी अलौकिक बुद्धिमत्ता या गुणांच्या सर्व जोरावर कॉ. रॉय हे फारच थोड्या वेळांत मेक्सिकन लोकांच्या जिवाचे कलिजा बनून राहिले होते. क्रांतिकारकांचा सच्चा पुढारी हा अपूर्व मान कॉ. रॉय यांना तेथील लोकांनीं अंतःकरणपूर्वक अर्पण केला होता.

मेक्सिकोंत असतांना रॉय यांचा मिस् येव्हलेन या स्त्रीशीं १९१७ सालीं प्रथम विवाह झाला. मिस् येव्हलेन या जात्याच बुद्धिमान् असल्यामुळें कॉ. रॉय यांच्या लेखनकार्यास त्यांची फारच मदत झाली. या दोघांनीं पुढें एकमेकांच्या साहाय्यानें कित्येक ग्रंथ लिहिले व वर्तमानपत्रेंहि चालविलीं. १९२७ सालपर्यंत मिस् येव्हलेन व रॉय यांनीं वैवाहिक आयुष्य आनंदांत घालविल्यानंतर कॉ. रॉय यांना चीनमध्यें जावें लागलें व त्या वेळीं मिसेस् रॉय यांचा व कॉ. रॉय यांचा घटस्फोट झाला. मेक्सिकोमधील चळवळींतहि या वेळीं जहाल, मवाल असे भेद पडत चालले होते. कांहीं काळ कॉ. रॉय यांना अध्यक्ष 'कॅरेन्झा' यांनीं विरोध केला. परंतु अखिल जनतेच्या पाठिंब्यामुळें कॉ. रॉय यांना तेथील लोकांच्या मागण्यांना मूर्त स्वरूप देतां आलें. १९१७ सालांत नवीन राज्यघटना बनविण्यांत आली व त्या घटनेनुसार शेतकऱ्यांनीं जमिनीवर आपला हक्क शाबीत करून घेतला व देशांतील पेट्रोल व खनिज संपत्तीचे सर्व कारखाने राष्ट्राच्या मालकीचे करण्यांत आले.

या राजकीय उलाढालीच्या काळांत कॉ. रॉय यांच्या आयुष्यांत आणखी एक महत्त्वाची गोष्ट घडून आली. मेक्सिकोंत असतांना प्रारंभीं रॉय हे तेथील कम्युनिस्ट पक्षाचे चिटणीस व जहाल पक्षाच्या पत्राचे संपादक म्हणून चांगलेच प्रासिद्धीस आले. याच काळांत 'दि हाय रोड टू वर्ल्ड पीस' हें पुस्तक त्यांनीं प्रसिद्ध केलें. पुढें या पुस्तकाचें स्पॅनिश भाषेंत भाषांतर झालें. या पुस्तकामुळें रॉय यांना पुष्कळ प्रसिद्धि मिळाली; त्यामुळें रॉय ही व्यक्ति तरी कोण आहे हें पाहण्याची मेक्सिकोचे अध्यक्ष 'वेनुस्टियानो कार-शा' यांना इच्छा झाली व त्यांनीं रॉय त्यांना भेटीस बोलावलें. लवकरच ते दोघे मित्र बनले, ते इतके, कीं रॉय यांना लोक अध्यक्षांचे सल्लागार या नांवानें संबोधूं लागले. याच सुमारास रॉय यांनीं 'इंडिया पास्ट, प्रेझेंट आणि फ्यूचर' हें पुस्तक लिहून प्रसिद्ध केलें.

### रॉय व बोरोडिन यांची भेट

रशियांतील कम्युनिस्ट पार्टीचे पुढारी 'बोरोडिन' हे या वेळीं मेक्सिकोमध्यें होते. रॉय यांचें पाऊल मेक्सिकोंत पडल्यापासून बोरोडिन यांचें रॉय

यांच्याकडे फार बारीक लक्ष असे. या तरुण हिंदी क्रांतिकारकाची धडाडी पाहून बोरोडिन हेहि थक्क झाले व जसजसा बोरोडिन व रॉय यांचा परिचय वाढूं लागला, तसतशी या दोघा क्रांतिकारकांची मैत्री अधिकच दृढ होत गेली. आपल्याला क्रांतीच्या लढ्यांत एक जानी दोस्त मिळाला असें बोरोडिन यांना वाटलें. मेक्सिकोमध्यें कम्युनिस्ट पार्टी स्थापन करून तेथील लोकांना भांडवलशाही व जमीनदारशाहीपासून मुक्त करण्याचें काम कॉ. रॉय यांनींच केलें. मेक्सिकोंत असतांना रॉय हे तेथील कम्युनिस्ट पार्टीचे सेक्रेटरी होते. या त्यांच्या कर्तबगारीमुळें बोरोडिन यांच्या मनावर तर विलक्षण परिणाम झाला. जो पुढें मागें जगद्विख्यात पुढारी होईल असा एक सुप्रसिद्ध हिंदी क्रांतिकारक तरुण आपल्याला येथें भेटला असें बोरोडिन यानें लेनिनला पत्रद्वारें कळविलें व इतकेंच करून बोरोडिन राहिले नाहींत, तर कॉ. रॉय यांना आपण रशियांत बोलवावें, व त्यांच्या सहकार्यानें व विचारानें हिंदी चळवळीची दिशा आंखावी अशी लेनिनला बोरोडिन यांनीं आपल्या पत्रांत एक सूचनाहि केली. बोरोडिन यांच्या पत्रामुळें रशियांतील बोल्शेव्हिक पक्षातर्फे कॉ. रॉय यांना लेनिनकडून बोलावणें आलें. रॉय यांनाहि ही संधि दवडणें योग्य वाटलें नाहीं. आलेल्या संधीचा फायदा घेण्यासाठीं मेक्सिकन लोकांचा निरोप घेऊन कॉ. रॉय हे रशियाला जाण्याकरितां निघाले. मेक्सिकोंतील रहिवाशांना मात्र कॉ. रॉय यांच्या परदेशगमनाबद्दल मनापासून वाईट वाटलें. रॉय यांनीं मेक्सिकोंतील दलित जनतेच्या उद्धाराकरितां अहोरात्र खटपट केली असल्यामुळें त्या लोकांच्या अंतःकरणांत कॉ. रॉय यांनीं कायमचें ठाणें दिलें होतें. आजच्या घटकेला सुद्धां मेक्सिकोमधील जनता कॉ. रॉय हे आमच्यापैकींच आहेत असा अभिमान बाळगीत आहे व तेथील लोक अद्यापिहि रॉय यांना आपल्या देशांतील एक यशस्वी क्रांतिकारक पुढारी म्हणूनच ओळखतात, व त्यांच्याकडे आदरानें पाहतात.

---

# ८ जर्मनींतील वास्तव्य

मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें कॉ. रॉय यांनीं रशियांत जाण्यासाठीं मेक्सिकोचा मोठ्या जड अन्तःकरणानें निरोप घेतला. मेक्सिकोंत असतांना रॉय यांच्यावर अमेरिकन व इंग्रज सरकारचा डोळा होताच. अमेरिकेचे गुप्त पोलीस त्यांना पळवून नेणार अशी बोलवा होती. त्याकरितां रॉय यांच्या संरक्षणास्तव त्यांच्या घराभोंवतीं कित्येक दिवस मेक्सिकन सरकारनें सशस्त्र पहाराहि ठेविला होता.

रॉय यांनीं मेक्सिको सोडला खरा, पण तेथून अमेरिकन व इंग्रज पोलिसांचा डोळा चुकवून रशियास जाणें सोपें नव्हतें. मेक्सिकोंतून युरोपला जाणाऱ्या बोटी हॅवाना बंदरांत थांबत व तेथें अमेरिकन सरकारचा ताबा असल्यामुळें तेथून अमेरिकन पोलिसांचा डोळा चुकवून जाणें म्हणजे तें एक भयंकर दिव्यच होतें. तरीहि रॉय यांनीं आपल्या धाडसी वृत्तीस अनसरून रशियास जाण्याचा निश्चय केला व मेक्सिकोमधील परराष्ट्रीय वकिलाच्या मदतीनें पासपोर्टहि मिळविला. रॉय यांना घेऊन येणारी बोट हॅवाना बंदरांत येतांच तेथें संप सुरू असल्याचें कळलें. संपामुळें बोट तेथेंच अडकून पडली असती, तर रॉय हे उघडकीस येण्याची व पकडले जाण्याची भीति होती. अशा वेळीं कॉ. रॉय यांना त्यांचें मेक्सिकोमधील कार्य उपयोगी पडलें. त्यांच्या कामगिरीमुळें हॅवानाच्या आसपास त्यांचें नांव सर्वतोमुखीं झालें होतें. हॅवाना बंदरांत संप जोरांत चालला आहे हें पाहून रॉय यांनीं "मी येथें आलों आहे व मला युरोपला तात्काळ गेलेंच पाहिजे" अशा आशयाची एक चिठी संपाच्या पुढाऱ्याला पाठविली. त्याचा इष्ट तो परिणाम होऊन तेथील कामगार-संघानें ताबडतोब नोटीस काढून, तेवढीच बोट शक्य तितक्या लवकर पुढें सोडली. बोटीवरील लोकांना या गोष्टीचा मोठा अचंबा वाटला. परंतु आपल्या बोटींत कॉ. रॉय आहेत याचा स्फोट केला नाहीं. अशा रीतीनें रॉय हे हॅवाना बंदरां-

तून निसटून प्रवास करीत स्पेनला पोंहोचले! बोरोडिन दोन आठवड्यांपूर्वीच तेथें येऊन पोंहोचला होता. माद्रिदमध्यें रॉय महिनाभर राहिले व तेवढ्या काळांत तेथल्या कम्युनिस्ट पार्टीचे त्यांनीं नांव घेण्यासारखें काम करून दाखविलें. महिन्यानंतर स्वित्सर्लंड मार्गानें रॉय हे १९१८च्या शेवटीं बर्लिनला येऊन पोंहोचले.

जर्मनीमध्यें कांहीं दिवस त्यांचा मुक्काम पडला. या वेळीं जर्मनीवर मोठी आर्थिक आपत्ति कोसळली होती. महायुद्धामुळें जर्मनीची सामाजिक घडी पूर्ण-पणें विस्कळित झाली होती. जर्मनींतील कामगार चार वर्षांच्या युद्धाच्या काळांत अगदीं हवालदिल असे झाले होते. १९१८ च्या ऑगस्ट महिन्यांत जर्मन सैन्याचा रणांगणावर पराभव झाल्यामुळें, जनतेचा असंतोष तीव्र होत चाललेला होता. इकडे रशियांतील १९१८ च्या क्रांतीमुळें युरोप खंडांतील कामगारवर्गांत नवचैतन्य उत्पन्न झालें होतें. कामगारवर्गांतील अस्वस्थता सारखी वाढतच चालली होती. जर्मनीचें पाऊल रणांगणावर सारखें मागें पडत होतें; एकंदर लढाईचा सोक्षमोक्ष हा झालाच पाहिजे, असें युद्धपिपासेनें धुंद झालेल्या जर्मन लष्करी अधिकाऱ्यांना व साम्राज्यवादी भांडवलवाल्यांना मनापासून वाटत होतें; म्हणून त्यांनीं शेवटची निकराची चढाई करण्याच्या उद्देशानें जर्मन आरमाराला एकत्रित होण्याचा हुकूम दिला.

परंतु कामगारांत असंतोष वाढल्याकारणानें व सैनिक युद्धाला कंटाळले असल्याकारणानें ७ नोव्हेंबर १९१८ रोजीं जर्मन आरमारांतील सैनिकांनीं बंड पुकारलें व तेथील सामाजिक असंतोषाचें प्रत्यक्ष कृतींत रूपांतर झालें. १९१८ सालच्या ऑक्टोबर महिन्यापासून लोकांमधील असंतोष स्पष्ट रीतीनें दिसूं लागला होताच. ठिकठिकाणीं संप झाले, कामगारांचे उठाव झाले, कर्दनकाळ वाटणारा जर्मनीचा 'कैसर' या 'स्वातंत्र्य-युद्धाच्या' गर्जनेबरोबर पळपुट्या बाजिरावाप्रमाणें आपल्या पुत्रासमवेत हॉलंड देशांत पळून गेला. "युद्ध बंद करा. भांडवलदार, जमीनदार व लष्करी अधिकारी यांनीं चालविलेल्या पिळणुकीपासून मुक्त व्हा." अशी खऱ्या स्वातंत्र्याची घोषणा ऐकल्याबरोबर जर्मन साम्राज्य स्थापण्याचा डोलारा धाडदिशीं कोल-मडून पडला. जर्मन साम्राज्य हें कैसरचें स्वप्न ठरलें. थोड्याच दिवसांत

म्हणजे ११ नोव्हेंबरला दोस्त राष्ट्रें व जर्मनी यांच्यांत तह ठरला आणि युद्ध संपलें.

१९१८ सालच्या सुरुवातीपासून कामगारवर्गाची नवविचारांची लाट पसरूं लागली. रशियांतील क्रांतीच्या ज्योतीनें जर्मनींतील कामगारवर्गाला आपली पाऊलवाट स्वच्छ दिसूं लागली. आपले मार्ग, आपलीं साधनें यांबद्दल जर्मन कामगार, जास्त आस्थापूर्वक विचार करूं लागले. त्यांनीं संघटनेला सुरुवात केली. 'स्पार्टाकस बंड' नांवाची जहाल मतवाद्यांची संस्था त्या वेळीं जर्मनींत अस्तित्वांत होती. बर्लिनमधील दुकानांतील कामगारांनीं १९१८ सालापासून आपल्या चळवळीची तयारी चालविली होती. जर्मन कामगारांनीं एकदम उठाव करून भांडवलवाल्यांचे सर्व व्यवहार बंद पाडावयाचे व मग यशस्वी रीतीनें सत्ता हस्तगत करून भांडवलवाल्यांची सत्ता कायमची नष्ट करून टाकावयाची, अशी योजना बरेच दिवसांपासून बर्लिनमधील ठिकठिकाणच्या कारखान्यांतील कामगारांनीं आंखली होती. त्यांत हॉटेलांतील, दुकानांतील वगैरे कामगार प्रमुख होते. आपल्या चळवळीचें पुढारीपण 'स्पार्टाकस बंड' या संस्थेकडे असावें ही त्यांची मनापासून इच्छा होती. कारण कामगार-क्रांति करणारी अशी हीच जहाल संस्था आहे असें त्यांस वाटत होतें. जर्मनींत चाललेली ही घडामोड व मॅक्सिकोमधून क्रांति यशस्वी करून आलेले कॉ. रॉय यांची जर्मनींत येण्याची वेळ या दोन्ही गोष्टी एकदमच घडून आल्या. 'स्पार्टाकस बंड' या संस्थेच्या अधिकारी वर्गाशीं रॉय यांनीं प्रथम परिचय करून घेतला. जर्मनींत असलेल्या सोशल डेमोक्रॅटिक पार्टींतील जहाल मतवाद्यांचे "स्पार्टाकस बंड" ह्या पक्षाकडे नेतृत्व होतें असें म्हणावयास हरकत नाहीं. मेक्सिकोंतील जनतेचें पुढारीपण घेतलेले कॉ. रॉय यांनीं जर्मनींतील कामगारवर्गाच्या चळवळींत जातीनें भाग घेण्यास सुरुवात केली. बर्लिनमधील यच्चयावत् दुकानें, हॉटेलें, मोठमोठीं ऑफिसें येथील कामगारांनीं संप पुकारण्याची तयारी चालविली होती, हें वर सांगितलेंच आहे. थोड्याच अवधींत कॉ. रॉय यांनीं आपल्या कर्तबगारीनें बर्लिनमधील कामगारांचें लक्ष आपल्याकडे वेधून घेतलें. जर्मनींतील त्या वेळचे कामगारपुढारी 'कार्ल लॅब्नेथ' व 'रोझा लक्झेंबर्ग' हे 'स्पार्टाकस

बंड या संस्थेचे जनक होते. जर्मन कामगारांना कार्यप्रवण करण्यास याच दोन पुढाऱ्यांचे अविश्रांत श्रम कारणीभूत झाले होते. 'कार्ल लॅब्नेथ' व 'रोझा लक्झेंबर्ग' या दोन पुढाऱ्यांचीं नांवें जर्मन कामगार कधींहि विसरणें शक्य नाहीं. इतका या दोन पुढाऱ्यांचा जर्मनींतील कामगार-चळवळीवर परिणाम झालेला आहे. बर्लिनमधील होणारा संप हा पुढील क्रांतीचा पाया होता. मोठमोठे कारखाने, रेल्वे, गोद्या, बँका वगैरे ठिकाणीं सार्वत्रिक संप करून भांडवलशाहीचें राज्ययंत्र खिळखिळें करून टाकावयाचें व शेवटीं सत्ता हस्तगत करावयाची, अशी या संपाची रूपरेषा आंखून ठेवली होती. क्रांतीचा पहिला आघात मात्र बर्लिनमधील हॉटेलकामगार करणार होते. या सुमारास कॉ. रॉय हे बर्लिनमधील एका हॉटेलांतच राहत असत. एके दिवशीं एक हॉटेलकामगार सकाळींच रॉय यांच्या खोलींत आला व सद्गदित अंतःकरणानें आणि आपलेपणानें म्हणाला, भांडवलशाही पिळणुकीपासून स्वतंत्र होण्याचा आमचा निश्चय झालेला आहे. शहरांतील एकूण एक हॉटेलें, खाणावळी उद्यां सकाळीं स्मशानवत् दिसूं लागतील. ऐतखाऊ गब्रूंच्यापुढें 'हांजी हांजीं' करीत असलेला एकहि कामगार उद्यां या शहरांत दिसणार नाहीं. पण तुम्हांला मात्र आम्ही कांहीं कमी पडूं देणार नाहीं. तुम्ही आमचे आहांत. आमच्या खांद्याला खांदा लावून लढणारे तुम्ही आमचे भाई आहांत. एक महिनाभर पुरेल इतक्या अन्नसामुग्रीची व्यवस्था आम्हीं तुमच्याकरितां केलेली आहे. तुम्ही कांहींहि काळजी करूं नका." इतक्या थोड्या वेळांत कॉ. रॉय हे जर्मनींतील कामगारांत किती प्रिय झाले होते; याचें वरील उद्गार हें चांगले निदर्शक आहेत. सकाळीं सहाच्या ठोक्याबरोबर बर्लिन शहरांतील हॉटेल-कामगारांनीं सर्व हॉटेलें ओस पाडलीं. हॉटेलांतील धनाढ्यांची धांवपळ सुरू झाली. हॉटेल कामगारांचा हा संप कांहीं किरकोळ आर्थिक मागण्यांसाठीं नव्हता. दास्यविमोचनासाठीं राजकीय सत्तेवर जनतेनें मारलेला हा पहिला घाव होता. हळूहळू हा संप वणव्याप्रमाणें सर्व कारखान्यांत पसरला. त्रस्त व पराभूत झालेले जर्मन सैनिक परत येतांक्षणींच त्यांना खरी स्वातंत्र्यसंग्रामाची रणभूमि दिसूं लागली. आपला खरा शत्रु कोणता, हें सैनिकांना व कामगारांना सूर्यप्रकाशाइतकें स्पष्ट झालें. लढाईवर गेलेले

सैनिक भित्रे होते म्हणून ते परत आपल्या देशांत आले होते असें नाहीं; तर आपल्याच भाऊबंदांच्या पायांत कायमच्या बेड्या ठोकण्याचें कृत्य आपल्या हातून होतां कामा नये म्हणून त्यांना 'भीति' वाटत होती. देशांत परत आल्याबरोबर भय, भीति, दुःख, यातना वगैरे सर्व बाजूस सारून ते या संपांत सामील झाले. हां-हां म्हणतां समाजक्रांतीच्या ज्वाला सर्व शहरभर पसरल्या.

क्रांति यशस्वी होते ती केवळ एका सार्वत्रिक संपानें होत नसते. क्रांति हें एक शास्त्र आहे व तें कुशल कर्णधारच उत्तम रीतीनें जाणतो. कैसर बादशहा जर्मनींतून पळून गेले म्हणून कामगारसत्ता थोडीच स्थापन होणार होती ! कैसर बादशहा काय, अगर भांडवलशाही काय, दोघांच्याहि मागें अत्यंत प्रबळ असा भांडवलदारवर्ग आणि अधिकारीवर्ग होता व त्यांना जेरीस आणून अधिकारत्याग करावयास लावणें सोपें काम नव्हतें. कोणतीहि क्रांति यशस्वी होण्याला कामगारवर्गाला अचूक मार्ग दाखविणारा, आपल्या ध्येयापासून परावृत्त न होणारा व सुसंघटित असा राजकीय पक्ष असावा लागतो. ह्या वेळीं जर्मनींत अशा सुसंघटित पक्षाचें अस्तित्व नव्हतें. कामगारवर्गाच्या सर्वसाधारण चळवळी करणारे व भांडवलशाहीबरोबर प्रसंगीं मिळतें धोरण घेऊन, कामगारांचें समाधान करूं पाहणारे असें दोन पक्ष त्या वेळीं जर्मनींत होते. "एलबर्ट व शिडमन यांच्या नेतृत्वाखालीं असलेला सोशल डेमोक्रॅटिक पक्ष व कॉट्स्की बर्न्सटिन यांच्या पुढारीपणाखालीं असलेला इंडिपेंडंट सोशल डेमोक्रॅटिक पक्ष असे दोन पक्ष जर्मनींत त्या वेळीं होते परंतु ते कामगारक्रांतीचें पुढारीपण घेऊं शकले नाहींत. १९१८ च्या डिसेंबर महिन्यांत इंडिपेंडंट सोशल डेमोक्रॅटिक पक्षांत फूट पडली व स्पार्टासिस्ट नांवाचा जहाल गट त्यांतून बाहेर पडला. या वेळीं जर्मनींमधील सत्ता सोशल डेमोक्रॅट पक्षाच्या हातांत होती. त्यांनीं कामगारवर्गाच्या क्रांतिकारक चळवळीस पाठिंबा तर दिला नाहींच, उलट याच वेळीं बर्लिनमधील मुख्य पोलीसअधिकारी मि. इयार्न यास त्यांनीं जहाल गटांशीं संबंध ठेवल्याच्या आरोपावरून बडतर्फ करण्यांत आलें. या कृत्यानें कामगारांत असंतोष जास्तच वाढला. 'स्वतंत्र' स्पार्टासिस्ट व सार्वत्रिक

संपावर गेलेले हॉटेलकामगार, यांच्या एकजुटीनें सार्वत्रिक संपाला भीषण स्वरूप प्राप्त झालें. ता. ६ जानेवारी १९१९ रोजीं बर्लिन शहरांत रस्त्यांतून एकदम एक लक्ष कामगार एकत्र जमले. शहरांतील जनतेचा क्षोभ पाहून सरकारी अधिकारी घाबरून पळून गेले व राज्ययंत्र हातीं येण्यास फारसा वेळ लागणार नाहीं अशी क्रांतिकारकांना आशा वाटूं लागली. राज्ययंत्र ताब्यांत घेणारा व कामगारवर्गाला अचूक मार्ग दाखविणारा असा प्रभावी कामगारपक्ष जर्मनींत हवा होता. चालून आलेल्या परिस्थितीचा फायदा या वेळीं कामगारांना राजकीय पक्षाच्या अभावीं घेतां आला नाहीं. शहरांत व इतरत्र माजलेली अस्वस्थता सोशल डेमोक्रॅट कमिशनर 'गस्टा-व्हनोक' यांनीं जर्मनींतील जमीनदारांच्या व भांडवलदारांच्या साहाय्यानें मोडून टाकिली. कामगारांचे आवडते पुढारी कार्ल लॅब्नेथ व रोझा लक्झेंबर्ग यांना अटक करण्यांत येऊन त्यांस तुरुंगाकडे घेऊन जात असतां त्यांचा अमानुषपणें खून करण्यांत आला.

जर्मनींतील अनियंत्रित अशी कैसरची राजसत्ता गेली व त्या ठिकाणीं लोकसत्ताक राज्यपद्धति सुरू करण्यांत आली. जगांतील इतर राष्ट्रांतील राज्यपद्धतीपेक्षां जर्मनीमध्यें अमलांत आणलेली 'वीमर राज्यघटना' फारच पुरोगामी स्वरूपाची होती. महायुद्धकालानंतर जर्मनींत अमलांत आणिलेली 'वीमर राज्यघटना' ही पाश्चात्य देशांत आदर्शभूत समजली जात असे. लोकशाही राज्यपद्धति कितीहि आदर्शभूत असली तरी त्या राज्यघटनेनें जर्मन कामगारवर्गाच्या दास्यशृंखला कायमच्या तुटून पडल्या असें मात्र झालें नाहीं.

जर्मनीमध्यें चालू असलेल्या या घडामोडीच्या कालांतच त्या वेळीं पुढें आलेले 'हेन्रिच ब्रॅंडर', 'डॉ. आगस्ट थॉलहीमर', 'थियालमन' व इतर कित्येक कम्युनिस्ट पुढारी यांच्यांशीं कॉ. रॉय यांची दाट मैत्री झाली व हळहळू आंतरराष्ट्रीय राजकारणांत कॉ. रॉय प्रामुख्यानें पुढें येऊं लागले.

# ९ रशियांतील कामगिरी

मेक्सिकोमधील कम्युनिस्ट पक्षाचे प्रतिनिधि आणि हिंदी राष्ट्रीय क्रांतिकारक चळवळीचे अग्रणी म्हणून कॉ. रॉय हे १९१८ सालीं रशियांत येण्यास निघाले. वाटेंत १९१८ च्या अखेरीस त्यांनीं महिनाभर जर्मनींत मुक्काम केला. तेवढ्या अवधींत जर्मनींतील कामगार-चळवळीला त्यांनीं शक्य तितका हातभार लावून १९१९ सालच्या सुरुवातीला ते कामगारांच्या राज्यांत म्हणजे रशियांत येऊन दाखल झाले. रशियांत आल्यावर लेनिन व रशियन पुढाऱ्यांनीं त्यांचें मोठ्या प्रेमानें व उत्साहानें स्वागत केलें. लेनिनला जेव्हां ते भेटले तेव्हां हे रॉयच अशी लेनिनची खात्री पटेना. रॉय यांच्यासंबंधीं जें कांहीं लेनिननें ऐकलें होतें त्यावरून ते वयोवृद्ध, मोठी दाढी असणारे, असे पोक्त गृहस्थ असावेत अशी लेनिनची समजूत होती. म्हणून रॉय यांच्यासारखा तरुण पाहतांच प्रथमदर्शनीं लेनिन हे विस्मयचकितच झाले.

कॉ. रॉय ही एक असामान्य व्यक्ति आहे हें लेनिनच्या लक्षांत यावयास फारसा वेळ लागला नाहीं. मनुष्याची पारख व निवड करण्यांत लेनिन यांचा हातखंडा असे. पहिल्या भेटीच्या वेळेसच लेनिन यांच्यावर कॉ. रॉय यांनीं जी छाप पाडली ती शेवटपर्यंत कायम होती. कॉ. रॉय यांच्या आयुष्यांत अनेक प्रसंग आतांपर्यंत आले; त्या सर्वांस मोठ्या धैर्यानें तोंड देण्यांत कॉ. रॉय यांचा बराचसा काळ गेला होता. परंतु यापुढील काळांत कॉ. रॉय यांच्या आयुष्यांतील एका निराळ्याच विभागास अचानकपणें सुरुवात झाली. रशियन क्रांतीनंतर सर्व राष्ट्रांचे डोळे या कामगारक्रांतीकडे लागून राहिले यांत आश्चर्य नाहीं. युरोपांत राहणाऱ्या हिंदी क्रांतिकारकांना व तरुणांनाहि या क्रांतीच्या यशानें दिपवून टाकलें. रशियासंबंधानें अद्भुतरम्य कल्पना निरनिराळ्या लोकांच्या डोक्यांत उत्पन्न होऊं लागल्या. कॉ. रॉय यांच्या वाढत्या

लोकप्रियतेबद्दल व प्रत्यक्ष लेनिनशीं झालेल्या दोस्तीबद्दल कांहीं क्रांतिकारकांच्या मनांत असूया उत्पन्न झाली आणि हीच स्थिति कोणत्याहि चळवळीचा नाश होण्यास पुरेशी असते. एकमेकांनीं एकमेकांच्या आणा-शपथा घेऊन एखादी चळवळ स्वार्थत्यागपूर्वक उभारावयाची, त्या चळवळीला गोड फळें येण्याचीं चिन्हें दिसूं लागतात न लागतात तोंच मत्सर, द्वेष, असूया या दुर्गुणांनीं प्रमुख पुढाऱ्यांच्या डोक्यांत ठाणें देऊन बसावयाचें व अशा रीतीनें ज्यांनीं आपल्या स्वार्थत्यागानें, व दीर्घ परिश्रमानें प्राणांचीहि पर्वा न करतां दिवसाची रात्र व रात्रीचा दिवस करून चळवळीची जोपासना केली, त्यांच्यामधील व्यक्ति-द्वेषानेंच शेवटीं त्या चळवळीचा नाश झाला तर तें दृश्य किती भयानक असेल बरें ! असे प्रसंग आजपर्यंत अनेक लोकांना निरनिराळया वेळीं व निर-निराळया व्यवसायांत आलेले असतील. कॉ. रॉय यांच्या आयुष्यांत निराळे अनुभव यावयास सुरुवात झाली असें जें आम्हीं वर म्हटलें आहे तें याच व्यक्तिगत मत्सराला उद्देशून म्हटलेलें आहे. कॉ. रॉय यांच्या आयुष्यांत मनुष्य-स्वभावाच्या स्वार्थी व द्वेषमूलक भावनांनीं आतांपर्यंत अत्यंत घातुक परिणाम घडवून आणले आहेत. परंतु दुर्दैवानें आज त्या सर्व गोष्टी वाचकांस सादर करतां येणें शक्य नाहीं.

**व्यक्तिद्वेषास सुरुवात**

कॉ. रॉय यांची लोकप्रियता रशियांतहि वाढूं लागली युरोपांत वावरणाऱ्या कांहीं तरुण हिंदी क्रांतिकारकांना वाटलें, कीं रशियांतील अफाट संपत्तीचा फायदा कॉ. रॉय यांना मिळत असून त्यांतील एक पैहि त्यांच्या वांट्यास येत नाहीं. रशियन सोन्याच्या लालसेनें कांहीं तरुणांचें मन द्विधा झालें. त्यांनीं बर्लिन शहरीं एक बैठक भरवून मॉस्को येथें लेनिनकडे पाठविण्यासाठीं आपल्यातर्फे कांहीं प्रतिनिधींची निवड केली व त्याप्रमाणें ते निघाले. मॉस्को येथें उतरल्यावर या मंडळींनीं लेनिनची भेट घेण्याची इच्छा प्रदर्शित केली. लेनिनची भेट त्या वेळच्या धामधुमीच्या काळांत मिळणें अत्यंत कठीण होतें. रशियन राज्यक्रांतीचा प्रमुख पुढारी बुखारीन याची त्या तरुणांनीं भेट घ्यावी असें लेनिननें सुचविलें. परंतु दुय्यम पुढाऱ्यांच्या भेटीनें या तरुणांचें समाधान होणें शक्य नव्हतें. त्यांनीं लेनिनची भेट

होण्याविषयीं हट्ट धरला व शेवटीं भेटीचा योग एकदां जुळून आला. भेटीमध्यें बोलणें करण्यासाठीं जे दोन मुद्दे या प्रतिनिधींनीं लेनिनपुढें ठेविले ते असेः—एक हिंदी स्वातंत्र्याच्या चळवळीकरितां वर्तमानपत्रासाठीं दहालक्ष डॉलरची मदत मिळावी व दुसरा कॉ. रॉय यांच्या प्रतिनिधित्वासंबंधीं चौकशी करण्यांत यावी. कॉ. रॉय यांच्या लोकप्रियतेविषयीं हेवा उत्पन्न झाल्यामुळेंच या दोन मागण्या करण्यांत आल्या.

**लेनिनचें सडेतोड उत्तर**

या मागण्यांचा उद्देश लेनिनच्या चटकन लक्षांत आला, व त्याचें लेनिनला आश्चर्यहि वाटलें नाहीं. हिंदी स्वातंत्र्याच्या प्रश्नाला चालना मिळेल अशा कोणत्याहि मागणीला लेनिनचा पाठिंबा होता. मात्र, खरोखरच चळवळीचें काम इमानें-इतबारें झालें पाहिजे असें लनिनचें म्हणणें पडलें. दोन्ही मागण्यांचा विचार करून लेनिन म्हणाला, “ रशियाजवळ पैशाचा ढीग लागला अशी का तुमची समजूत आहे ? हिंदी स्वातंत्र्याचा लढा हा आमच्या लढ्याचा एक भागच आहे व त्यासाठीं माझें शक्तिसर्वस्व खर्चं करण्यास मी तयार आहे. मात्र एक गोष्ट मी आपणांस स्पष्ट रीतीनें सांगू का ? कोणतेंहि राष्ट्र परकीय सत्तेपासून केवळ पैशाच्या मदतीनें स्वतंत्र होऊं शकत नाहीं. स्वातंत्र्याच्या युद्धाकरितां जनतेची संघटना हा एकच मार्ग आहे. आपण येथें आलांत हें पाहून मला आनंद झाला. रशियन क्रांति कशी झाली, व तिला कोणकोणत्या अवस्थेंतून जावें लागलें तें नीट समजावून घ्या; त्याचा बारकाईनें अभ्यास करून व त्याप्रमाणें शिक्षण घेऊन परत हिंदुस्थानांत गेल्यावर जनतेची संघटना करण्याच्या मार्गास लागा, हें माझें आपणांस सांगणें आहे, आतां मी दुसऱ्या मुद्द्याकडे वळतों. दुसरा मुद्दा जो आपण उपस्थित केला आहे, तो शुद्ध मत्सरानें उत्पन्न झाला आहे असें मला वाटतें. कॉ. रॉय यांच्या प्रतिनिधित्वासंबंधानें मीं शंका कां घ्यावी ? ज्याला आपला जीव वांचविण्यासाठीं मेक्सिकोमध्यें जावें लागलें व ज्यानें तेथील कम्युनिस्ट पक्ष स्थापन करून थोड्याच अवधींत तेथील लोकांचें अलोट प्रेम संपादन केलें, असे कॉ. रॉय हे वसाहतींतील जनतेचे प्रतिनिधि नव्हेत तर मग कोण प्रतिनिधि, हें मला तरी समजत नाहीं. रॉय यांच्याशिवाय दुसऱ्या कोणालाहि

प्रतिनिधि मानण्यास माझी ना नाहीं, व अशा मनुष्याशीं कॉ. रॉय हेहि स्वतः आपलेपणानें वागतील याबद्दलहि मला तिळमात्र संशय नाहीं. मात्र त्यानें आपलें प्रतिनिधित्व आपल्या कर्तबगारीनें सिद्ध केलें पाहिजे. कॉ. रॉय यांना मी चांगलें ओळखतों व माझें त्यांच्याविषयींचें मत बदलणें अगदीं अशक्य आहे."

वरीलप्रमाणें उत्तर देऊन कॉ.रॉय यांच्या प्रतिस्पर्ध्यांना वाटाण्याच्या अक्षता लावण्यांत आल्या. पण लेनिननें त्याच क्षणीं या तरुणांची तेथेंच व्यवस्था करण्याबद्दल, आपल्या हाताखालच्या अधिकाऱ्यांना 'हुकूम' दिला. आमचे हे क्रांतिवादी तरुण मॉस्को येथें कांहीं दिवस राहिले. रशियांतील तो काळ स्वस्थतेचा नव्हता. त्या वेळीं रशियांत राहून शिक्षण घेणें म्हणजे कॉलेजांतील बोर्डिंगांत राहून अभ्यास करणें नव्हतें. रशियांत संपत्तीचा पूर वाहत आहे ही आमच्या या तरुण क्रांतिकारांची कल्पना क्षणार्धांत पार वितळून गेली. नुकतेच कामगार-क्रांतींत यशस्वी झालेले रशियन कामगार व शूर शिपाई ट्राट्स्कीसारख्या खंद्या लढवय्याच्या हाताखालीं शत्रूंशीं झुंज खेळण्यांत गुंतले होते. रशिया हा चैनीचा देश नाहीं हें या तरुणांना त्या वेळीं कळलें व त्याचा परिणाम आमच्या तरुण मित्रमंडळीवर झाला. कोणी आपली येथें नीट व्यवस्था होत नाहीं, आमची काळजी घेत नाहीं, अशी कुरबूर करण्यास आतां या क्रांतिकारकांनीं सुरुवात केली. आपण आपले युरोपांत अगर दुसरीकडे कोठें तरी जावें असा सुज्ञ विचार त्यांच्या डोक्यांत येऊं लागला. लेनिनला ही गोष्ट कळल्याखेरीज राहिली नाहीं. लेनिननें पूर्ण विचार करून ताबडतोब रशियन हद्दीच्या बाहेर या तरुणांना धाडण्याची व्यवस्था केली. आमच्या या तरुणांच्या सत्त्वपरीक्षेचीच ही वेळ होती. दुर्दैवानें या परीक्षेला हे तरुण उतरले नाहींत. रशियन लोकांना क्रांति यशस्वी करण्याकरितां किती यातना सहन कराव्या लागल्या असतील याची कल्पना या तरुणांना आतां आली. लेनिनच्या सांगण्याप्रमाणें हे तरुण युरोपांत परतले, व आपण क्रांतियुद्ध जिंकण्यास असमर्थ आहोंत हें त्यांनीं पर्यायानें मान्य केलें असें म्हटल्यास चालेल. कॉ. रॉय हे रशियांत आले त्या वेळीं रशियांतील काळ शांततेचा नव्हता. जरी क्रांति यशस्वी झालेली होती तरी रशियन कामगार-शेतकऱ्यांचें लक्ष परकीय शत्रु व अंतर्गत व्यवस्था या दोन गोष्टींकडे वेधलें होतें. मार्क्सनें वर्णन केलेली सामाजिक क्रांति लेनिननें रशियांत यशस्वी

करून दाखविली होती. विचार व आचार यांचा समन्वय करून दाखविण्यास क्रांतिकारकांना तीस-चाळीस वर्षे अहोरात्र परिश्रम करावे लागले.

**रशियन पूर्वेतिहास**

१९०५ मध्यें रशियांत दुसऱ्या निकोलस राजानें डयूमा नांवाची, लोकांना थोड्याफार सवलती देणारी, राज्यघटना अमलांत आणली होती. ही राज्यघटना फार वेळ टिकणें शक्य नव्हतें. आपल्या आसपास इतर देशांतून प्रजासत्ताक राज्यव्यवस्था अमलांत आणली जात आहे हें रशियन लोकांना दिसत होतें. महायुद्धाच्या कालांत तर लोकांचा असंतोष क्षणोक्षणीं वाढत होता. १९१७ सालांत या असंतोषाला चांगलीच वाचा फुटली. १९१७ सालच्या फेब्रुवारी व मार्च या महिन्यांत लोकप्रक्षोभापुढें बादशहाला नमावें लागलें. निकोलस बादशहाची अनियंत्रित राज्यसत्ता कोलमडून पडली व निकोलसला रशियांतून पलायन करणें भाग पडलें. या धामधुमीच्या काळांत केरेन्स्की यांच्या नेतृत्वाखालीं कामचलाऊ सरकार स्थापन करण्यांत आलें. हें सरकार म्हणजे लोकांच्या पसंतीचें होतें असें मुळींच नाहीं; परंतु लेनिननें या सरकारला विरोध केला नाहीं. जी राजकीय प्रगति झाली होती तिचें प्रतिबिंब थोड्या-फार अंशानें या नवीन घटनेंत दिसून येत होतें. नवीन स्थापन झालेलें सरकार हें रशियन जनतेचें कल्याण करूं शकणार नाहीं, राजकीय सत्तेच्या दृष्टीनें तें पोकळ आहे, हें लोकांना कळण्यास फार उशीर लागला नाहीं व जसजशी जनतेची तयारी वाढत गेली, तसतसा या नवीन सरकारचा पोकळपणा रशियन शेतकरी आणि कामकरी यांच्या नजरेंत येऊं लागला. 'कामचलाऊ सरकार' फोल व टाकाऊ आहे आणि त्याच्या जागीं कामकरी सत्तेची स्थापना करणें आवश्यकच नव्हे तर अपरिहार्य आहे हें रशियन जनतेच्या लवकरच ध्यानांत आलें. "आमच्या मागण्या मान्य करा, आम्हांला भाकरी पाहिजे, जें सरकार आमच्या नैसर्गिक मागण्या पुऱ्या करीत नाहीं त्याच्याकरितां आम्ही लढून प्राणार्पण करण्यास तयार नाहीं" असा रोखठोक जबाब केरेन्स्कीला जनतेकडून मिळाला. "आमच्या मागण्या मान्य करा, नाहीं तर अधिकार-

त्याग करा ” अशी घोषणा थोड्याच वेळांत रशियन जनतेनें केली; केरेन्स्कीचें कामचलाऊ सरकार कांहीं करूं शकत नाहीं हें लोकांस कळून चुकलें.

**कामगार-क्रांतीचा विजय**

इकडे जनता मात्र अस्थिर झालेली होती. “ क्रांतिकारकांचा बोल्शेव्हिक पक्ष आतांपर्यंत जनतेसमोर फारसा आला नव्हता. हा पक्ष आपलें काम फार सावधगिरीनें करीत होता. बहुजनसमाजाची नाडी या पक्षानें बरोबर ओळखली होती. एकीकडे लोक अस्थिर झालेले आणि दुसरीकडे सरकार निष्क्रिय व नेभळें बनलेलें! या संधीचा फायदा घेऊन बोल्शेव्हिक पक्षानें छातीठोकपणानें आपली योजना जनतेसमोर मांडली व ‘केरेन्स्की सरकार’च्या ऐवजीं सोव्हिएट्सच्या हातांत सत्ता घेण्याचा बोल्शेव्हिकांनीं बिगूल फुंकला. या आणीबाणीच्या काळांत केरेन्स्की किती वेळ टिकाव धरणार बरें! चार दोन महिन्यांच्या आंतच रशियांतील सत्ता लोकसत्तात्मक अशा ‘सोव्हिएट्सच्या’ ताब्यांत आली व या अचानक झालेल्या क्रांतीनें जगाचे डोळे दिपून गेले. बोल्शेव्हिकांनीं स्थापन केलेली सत्ता हें आंतरराष्ट्रीय कामगार-संस्थांना मोठें गूढ वाटतें. जनतेच्या मागण्यांसाठीं अहोरात्र खटपट करणें, साध्या मागण्या मिळविण्यासाठीं जे झगडे करावे लागतात त्यांचें पुढारीपण घेऊन जनतेचा विश्वास संपादन करणें, आणि अत्यंत आणीबाणीच्या वेळीं जनतेपुढें विशिष्ट कार्यक्रम ठेवून तो अमलांत आणण्याचा निश्चित मार्ग दाखविणें या कामगिरीच्या जोरावरच रशियांत बोल्शेव्हिक पक्ष अधिकारारूढ झाला व हेंच त्या पक्षाच्या यशाचें मर्म आहे. राज्ययंत्र हस्तगत केल्यावर रशियांतील शेतकरी, कामकरी व सैनिक यांच्या तांतडीच्या मागण्या ताबड-तोब पुऱ्या करण्यास नवीन सरकारनें सुरुवात केली, व त्याचबरोबर इतर राष्ट्रांच्या स्वातंत्र्याला धक्का न लावण्याचा आपला निश्चयहि त्यांनीं जाहीर केला. तसेंच, ज्या देशावर परकीयांचें आक्रमण चालू आहे, अगर साम्राज्यशाहीच्या मगरमिठींत जीं राष्ट्रें सांपडलीं आहेत त्यांना स्वातंत्र्य मिळवून देण्याच्या कामीं रशिया केव्हांहि मदत करण्यास तयार आहे ही गोष्ट बोल्शेव्हिकांनीं जगजाहीर करून टाकली.

आपली समाजक्रांतीची भूमिका जगाला स्पष्ट रीतीनें सांगितल्यावर अंतर्गत व्यवस्थेकडे बोल्शेव्हिकांचें लक्ष लागलें. जुनी घटना मोडून पडली खरी, परंतु तेवढ्यानें क्रांतीचें कार्य संपलें असें नाहीं. आतां या पुढें विधायक कार्यास सुरुवात करणें भाग होतें व त्या दिशेनें रशियांतील बोल्शेव्हिक पुढाऱ्यांनीं कार्यास प्रारंभ केला. रशियांतील बोल्शेव्हिकांनीं लोकशाही धुळीस मिळविली असे आरोप करणारांनीं भांडवलशाही राष्ट्रांतून ज्या राज्य-घटनेला लोकशाही हें गोंडस नांव देण्यांत येतें ती लोकशाही लोकहिताचा एकहि कार्यक्रम अमलांत आणूं शकत नाहीं; जनतेच्या भाकरीचा प्रश्न ती सोडवूं शकत नाहीं व समाजांतील बेकारीचें भूतहि ती गाडूं शकत नाहीं हें ध्यानांत ठेवावें. घटना लोकशाही व सत्ता भांडवलशाही अशी मात्र स्थिति युरोपांतील यच्चयावत् प्रजासत्ताक राष्ट्रांत आहे व होती. अशी वस्तुस्थिति असतांना रशियांतील कामगार व शेतकरी यांनीं अल्पकाळपर्यंत आपली अनियं-त्रित सत्ता स्थापन केली, तर तिचा डांगोरा पिटण्यांत काय बरें अर्थ आहे! इंग्लंडांतील कॉमन्स सभा, फ्रेंच देशांतील चेंबर ऑफ डेप्युटीजची सभा, अगर अमेरिकेची सेनेट इत्यादि राज्यघटना, या वरील व्याख्येप्रमाणें भांडवल-शाही सत्तेचीं माहेरघरें आहेत हें आतां त्या देशांतील जनतेला अगदीं स्पष्ट दिसूं लागलें आहे. तीन अगर पांच वर्षांनीं एकदां 'मत' देण्यास जाणें म्हणजे लोकशाही राज्यघटना नव्हे. देशांतील जनतेच्या हिताचा एखादा कार्यक्रम अमलांत आणण्यास तीन अगर पांच वर्षांनीं एकदां दिलें जाणारें मत उपयोगीं पडत नाहीं; किंवा प्रजासत्ताक स्वरूपाच्या राजकीय संस्थाहि प्रत्यक्ष कार्य करूं शकत नाहींत व तसा हट्ट जर त्या लोकसभा धरतील, तर लोकशाहीच्या बुरख्याखालीं दडलेला भांडवलशाहीचा राक्षस एकदम त्या लोकशाहीस धुळीस मिळवतो, हें इटली व जर्मनी येथील फॅसिस्ट सर्वाधि-कारशाहीकडे पाहिलें म्हणजे वाचकांना चांगलें कळून येईल.

**फॅसिझममधील लोकशाही**

मृत्युशय्येवर पडलेल्या भांडवलशाहीचें 'फॅसिझम्' म्हणजे शेवटचे आंचके आहेत. तसेंच, लोकशाहीच्या गोंडस नांवाला भुललेल्या जनतेच्या भोळसटपणामुळेंच हा फॅसिझमचा राक्षस आज युरोप खंडांत अकांडतांडव

करीत आहे ही गोष्ट इतिहासानें सिद्ध झालेली आहे. इटलीचा मुसलेनी अगर जर्मनींतील हिटलर यांनीं भाषणस्वातंत्र्यास केव्हांच मूठमाती देऊन टाकली आहे. भांडवलशाहीचा उघड उघड पाठपुरावा करून साम्राज्यवादी राष्ट्र म्हणून जगावें अशी त्या राष्ट्रांची आज मनीषा आहे. हिंदुस्थान, चीन, पॅलेस्टाइन, ॲबिसीनिया या देशांतील लोकांची पिळणूक करून आपली साम्राज्यतृष्णा तृप्त करणें हें या राष्ट्रांचें धोरण आहे. 'मत-स्वातंत्र्य', 'भाषणस्वातंत्र्य', 'सभा-स्वातंत्र्य' हें या फॅसिस्ट सर्वाधिकारशाहीनें फक्त भांडवलवाल्यांकरितांच राखून ठेविलें आहे. कामगारवर्गाच्या हिताच्या दृष्टीनें खरें 'मत-स्वातंत्र्य', 'भाषण-स्वातंत्र्य' व 'सभा-स्वातंत्र्य' आज इटली व जर्मनी येथें आहे काय? मुळींसुद्धां नाहीं. उलट, रशियांत कोणतें मत-स्वातंत्र्य व सभा-स्वातंत्र्य आहे? भांडवलशाही समाजरचनेला पाठिंबा देणाऱ्यांना रशियांत मज्जाव आहे, पण बहुजन समाज शेतकरी, कामकरी यांच्या हिताच्या कोणत्याहि प्रश्नासंबंधीं अगर कार्यक्रमा-विषयीं रशियांतील कामकरी-शेतकरीवर्गाला जितकें 'मत-स्वातंत्र्य', 'भाषण-स्वातंत्र्य आणि सभा-स्वातंत्र्य आहे तितकें जगांत दुसरीकडे कोठेंहि नाहीं, या गोष्टीस भांडवलशाही राष्ट्रांतील प्रख्यात लेखक व राजकारणी आतां मान्यता देऊं लागले आहेत. आज रशियांत जुन्या पद्धतीचीं पाळेंमुळें खणून निघालीं आहेत, उत्पादन-साधनावरील खाजगी हक्क जाऊन तेथें बहुजन समाजाची मालकी प्रस्थापित झालेली आहे; समाज-हिताच्या आड येणाऱ्या प्रत्येक घटकाचा विध्वंस करण्यांत आला आहे, हें जरी खरें असलें तरी साम्यवाद या शब्दाच्या शास्त्रीय व मूळ कल्पनेप्रमाणें आज रशियांत साम्यवाद अमलांत आला आहे असें मात्र म्हणतां येत नाहीं. समाजांत साम्यवाद अमलांत आणतांना अनेक पायऱ्या चढून जावयाच्या असतात. त्याप्रमाणें एकेक पायरी वर चढून जाण्याचें कार्य मोठ्या कुशलतेनें आणि धीमेपणानें आज रशियानें केलें आहे इतकेंच! रशियांत लोकशाही तत्त्वानुसार १९३७ सालीं जी राज्यघटना अमलांत आली आहे तीवरून खऱ्या लोकशाही तत्त्वानुसार रशियन समाज कसा झपाट्यानें पुढें पाऊल टाकीत आहे हें चांगलें लक्षांत येतें; असो.

**रशियावर इतर राष्ट्रांची स्वारी**

रशियन कामगारांनीं व शेतकऱ्यांनीं राजसत्ता हातीं घेतली व लोकमतानुवर्ती समाजपद्धतीचा पाया घातला. परंतु युरोपांतील इतर राष्ट्रें रशियाला थोडींच स्वस्थ बसूं देणार होतीं! साम्यवादांतच आपलें मरण आहे हें भांडवलशाही राष्ट्रांना पूर्वींच कळून चुकलें होतें. रशियासारख्या देशांतील कामगारांनीं राज्ययंत्र हस्तगत करून नवीन समाजव्यवस्था स्थापन केली हें उघड्या डोळ्यांनीं पाहत असतांना इतर देशांतील कामगार आणि शेतकरी स्वस्थ बसतील हें शक्य नाहीं हें जाणून इतर राष्ट्रांनीं रशियाला स्वस्थता लाभूं द्यावयाची नाहीं असा निश्चय केला. झारच्या अमदानींतील कांहीं भांडवलदारांना व लष्करी अंमलदारांना हाताशीं धरून, कामगारांची सत्ता हाणून पाडण्याचा डाव युरोपांतील राष्ट्रांनीं रचला. क्रांतीच्या कालांत पराभूत झालेले व हातची सत्ता गमावून बसलेले बडे भांडवलवाले, अमीर-उमराव, लष्करी अंमलदार, या कामगार-क्रांतीचा पाडाव करण्यास सज्ज झाले.

या वेळीं रशियाला वाटेल त्या मार्गानें मिळणारी मदत हवी होती. अल्पस्वल्प मदतीचीहि रशियन कामगारांना जरूरी होती. कारण त्या वेळीं कामगारक्रांति टिकवून धरणें हेंच एक आद्यकर्तव्य त्यांस वाटत होतें. कॉ. रॉय हे या वेळीं रशियांत होते. केवळ स्वस्थ बसून राहणें हें कॉ. रॉय यांच्यासारख्या क्रांतिकारकास आत्मघातकीपणाचें वाटलें व कामगार-क्रांति टिकविण्यासाठीं रशियन कामगारांच्या खांद्याशीं खांदा लावून शत्रूशीं लढण्यास सिद्ध झालें पाहिजे असें कॉ. रॉय यांनीं ठरविलें व त्याप्रमाणें त्यांनीं आपल्या कार्यास धडाडीनें प्रारंभ केला. थोड्याच दिवसांत रॉय हे आपल्या कर्तबगारीनें 'रेड आर्मी'च्या एका तुकडीचे कमांडर बनले व मॉस्को शहरांतील सोव्हिएटच्या कार्यकारी मंडळावरहि त्यांची नेमणूक करण्यांत आली.

रशियांतील कामगार-क्रांतीच्या ज्वाला युरोपांतील इतर देशांतहि पसरल्या व थोड्याच अवकाशांत जर्मनीच्या कैसर बादशहांना देश सोडून पळून जावें लागलें. ऑस्ट्रियाचे तुकडे तुकडे होऊन तेथें लोकशाही राज्यपद्धति अस्तित्वांत

आली. हंगेरीमध्येंहि कामगारक्रांतीचा उठाव झाला पण तो जितका यशस्वी व्हावा तितका झाला नाहीं. इतर राष्ट्रांतील समाजवादी पक्षांनीं आपलें धोरण व मार्ग स्पष्ट न ठेवल्यामुळें आलेल्या संधीचा फायदा त्या पक्षांना घेतां आला नाहीं, ही दुर्दैवाची गोष्ट होय. शेवटपर्यंत हे पक्ष भांडवलशाहीपासून मिळणाऱ्या फायद्यांत व सुखसोयींत आनंद मानीत होते.

**सेकंड व थर्ड इंटरनॅशनल संस्था**

रशियांतील क्रांतीनें जगांतील कामगारांत नवचैतन्य उत्पन्न झालें खरें, परंतु त्या जागृतीचा फायदा घेऊन कामगारवर्गाला अचूक मार्ग दाखविण्याचें कार्य तेथील राजकीय पक्षांना करतां आलें नाहीं. 'सेकंड इंटरनॅशनल' या नांवाची सनदशीर मार्गाचा अवलंब करणारी कामगारांची आंतरराष्ट्रीय संस्था जगांतील मवाळ अशा कामगार संस्थांनीं स्थापिलेली होती. परंतु या मध्यवर्ती संस्थेकडून व्हावें तसें कार्य होत नव्हतें. इंग्लंडमधील ब्रिटिश मजूरपक्ष आणि युरोपांतील 'सोशल डेमोक्रॅटिक पक्ष' यांच्या सहकार्यानें चाललेली ही संस्था कोणत्याहि तऱ्हेचा प्रभावी आणि निश्चित असा मार्ग जगांतील कामगारांना दाखवूं शकली नाहीं. रशियन राज्यक्रांतीनंतर युरोपांतील कामगार पक्षांत दुफळी माजली. जहाल गट, कामगारक्रांतीचा जयघोष करीत होते, तर मवाळ गट कोणत्याहि जहाल कार्यक्रमांस विरोध करीत होते. कामगारपक्षांत जहाल-मवाळ असे भेद पाडल्यावर जहाल गटांनीं आपल्या स्वतंत्र कम्युनिस्ट संस्था स्थापन केल्या ! कामगारवर्गातील जहाल संस्थांचें एकीकरण करणें या वेळीं अगत्याचें होतें.

अशा या परिस्थितींतच 'थर्ड इंटरनॅशनल' या नांवाच्या कामगारांच्या मध्यवर्ती संस्थेचा लेनिनच्या नेतृत्वाखालीं रशियांत जन्म झाला. जगांतील जहाल गटांनीं या संस्थेचें मनःपूर्वक अभिनंदन केलें. लेनिन यांनीं पुढाकार घेऊन या आंतरराष्ट्रीय क्रांतिकारक कामगार-संस्थेची स्थापना केली. ही संस्था स्थापन करण्याच्या कामीं कॉ. रॉय हेहि एक प्रमुख होते. 'थर्ड इंटरनॅशनल'चें ध्येय, धोरण व कार्यक्रम ठरविण्यांत कॉ. रॉय यांचें बऱ्याच मोठ्या प्रमाणांत अंग होतें हें आतां जगाला माहीत झालेलें आहे. या संस्थेची अगदीं पहिली आंतरराष्ट्रीय सभा १९१९ च्या मार्च महिन्यांत मॉस्को येथें भरली. सभेच्या

निरनिराळ्या कार्यक्रमांत व ठरावांतील चर्चेत कॉ. रॉय यांनीं मुख्य भाग घेतला होता. साहजिकच या संस्थेच्या कार्यकारी मंडळावर कॉ. रॉय हे निवडून आले. अध्यक्षांच्या यादींत त्यांचें नांव निवडलें गेलें. राजकीय खात्याकरितां एक स्वतंत्र कमिटी निवडण्यांत आली, त्या कमिटींत लेनिन, ट्रॉट्स्की, बुखारीन व दुसरे कांहीं सोव्हिएट पुढारी निवडले गेले होते, त्यांत कॉ. रॉय यांचीहि निवड झाली कॉ. रॉय यांच्यासारख्या हिंदी क्रांतिकारकाची 'थर्ड इंटरनॅशनल'च्या राजकीय विभागांत निवड होणें व त्यांना लेनिन आणि ट्रॉट्स्की यांच्या बरोबरीनें काम करण्याची संधि मिळणें यावरून फार थोड्या अवधींत आपल्या बुद्धिमत्तेनें, कर्तबगारीनें, स्वार्थत्यागानें आणि निश्चयी धोरणानें कॉ. रॉय यांनीं लेनिनसारख्या असामान्य क्रांतिकारक पुढाऱ्यावर केवढी विलक्षण छाप पाडली असली पाहिजे हें ध्यानांत येतें. क्रांतिकारक म्हणवून घेत आणि रशियांतील सोन्याकडे आशाळभूत नजरेनें पाहत पाहत आमचे कांहीं हिंदी तरुण कोठें गटांगळ्या खात पडले होते कोणास टाऊक !

कॉ. रॉय यांनीं लेनिनच्या सहकार्यानें हिंदी राजकीय प्रश्नाबाबत एक प्रबंध या वेळीं लिहिला. हिंदी राजकीय प्रश्नांची यांत सांगोपांग चर्चा करण्यांत आली होती. हिंदुस्थानांतील कम्युनिस्टांनीं तेथील राजकीय लढ्यांत कोणतें धोरण अंमलांत आणावयाचें याचें स्पष्ट दिग्दर्शन त्यांत केलें होतें. १९२० सालच्या आंतरराष्ट्रीय परिषदेंत हा प्रबंध मान्य करण्यांत आला. पुन्हा १९२२ सालच्या चौथ्या परिषदेंतहि याच प्रबंधाला पुष्टि देण्यांत आली. कम्युनिस्ट इंटरनॅशनलची दुसरी कॉंग्रेस भरण्यापूर्वी त्या सभेकरितां म्हणून लेनिननें वसाहतींच्या प्रश्नावर एक प्रबंध लिहिला होता. त्यावर लेनिन यांनीं कॉ. रॉय यांचें मत विचारलें. बऱ्याच महत्त्वाच्या गोष्टींवर रॉय यांचा लेनिनशीं मतभेद झाल्यामुळें रॉय यांनीं याच विषयावर नवीन स्वतंत्र प्रबंध लिहून आपला मतभेद दर्शविला. कॉंग्रेसमध्यें दोन्ही प्रबंध पुढें मांडण्यांत आले व त्यावर पुष्कळ वादविवादहि झाला. लेनिनसारख्या विश्वविख्यात व अनुभवी क्रांतिकारकाशीं ह्या तरुण पोरानें मतभेद दाखवावा याचें जमलेल्या प्रतिनिधींना आश्चर्य वाटलें. सरतेशेवटीं दोन्ही प्रबंध मान्य करण्याची शिफारस स्वतः लेनिननें कॉंग्रेसला केली. दोन्ही प्रबंध

तात्पुरते मान्य करण्यांत आले, व पुढें म्हणजे १९२४ सालीं पांचव्या कॉंग्रेसनें कॉ. रॉय यांचा दृष्टिकोन पूर्णपणें मान्य केला. १९२२ सालीं प्रसिद्ध झालेल्या 'इंडिया इन् ट्रॅन्झिशन' या पुस्तकांत रॉय यांनीं हा दृष्टिकोन विस्तारानें मांडला आहे. १९१९ ते १९२८ पर्यंत म्हणजे 'थर्ड इंटरनॅशनल' च्या जन्मापासून सतत आठ वर्षें कॉ. रॉय हे या कामगार क्रांतिकारक संस्थेचे प्राण होते. महत्त्वाच्या प्रश्नांत कॉ. रॉय यांचें मत अगोदर घेण्यांत येई. चर्चेंत व वादविवादांत रॉय हे नेहमीं पुढाकारच घेत असत. या आठ वर्षांच्या काळांत तुर्कस्थान, इराण, चीन, हिंदुस्थान या देशांतील कम्युनिस्ट चळवळीला वळण देण्याचें महत्त्वाचें काम कॉ. रॉय यांनीं स्वीकारलेलें होतें. नऊ वर्षेंपर्यंत कॉ. रॉय हे 'थर्ड इंटरनॅशनल'चे एक आधारस्तंभ म्हणून समजले जात.

---

# १० रशियन तुर्कस्थानास भेट

मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें कॉ. रॉय यांनीं कांहीं दिवस रशियांत वास्तव्य केलें व त्यानंतर म्हणजे १९२० सालीं ते बोरोडिन, काराखान आणि सॅफरॉव्ह यांच्या समवेत रशियन तुर्कस्थानांत येण्यास निघाले. रशियन व अफगाणिस्थान या देशांच्या सरहद्दीवर राहून हिंदुस्थानांतील परिस्थितीची चांचणी करणें हें काम या मंडळाकडे होतें. रशियन तुर्कस्थानांतील सोव्हिएट सत्ता अधिक बळकट व टिकाऊ करण्याचें कामहि या मंडळावर सोंपविण्यांत आलें होतें.

याच सुमारास हिंदुस्थानांत स्वातंत्र्याच्या चळवळीची लाट उसळली होती. मुसलमानांचीं पवित्र ठिकाणें मक्का व मदीना यांवर ब्रिटन स्वारी करणार अशा समजुतीनें त्या पवित्र जागांचें संरक्षण करण्यासाठीं कांहीं मुसलमान तरुण स्वदेश सोडून मुसलमानी देशांत येऊं लागले होते. पवित्र ठिकाणांचें संरक्षण करणें हें आद्य कर्तव्य असें त्यांस वाटलें. काबूलमध्यें पाय ठेवल्यावर या मुसलमान तरुणांच्या डोळयांत अंजन पडलें. या वेळीं अफगाणिस्थानांत राजे अमानुल्ला हे राज्य करीत होते. हिंदुस्थानांतून येणाऱ्या या लोकांचें काय करावयाचें हा प्रश्न दत्त म्हणून अमानुल्ला यांच्यासमोर उभा राहिला. अमानुल्लांनीं अगदीं स्पष्ट रीतीनें या तरुणांना परत हिंदुस्थानांत जाण्यास सांगितलें व धार्मिक पवित्र ठिकाणावर ब्रिटन स्वारी करणार वगैरे सर्व हूल व वायफट गप्पा आहेत हें अमानुल्लांनीं या मुसलमान तरुणांना नीट पटवून दिलें. हे सर्व तरुण पंजाब व उत्तरहिंदुस्थानचा कांहीं भाग येथून आलेले होते. अमानुल्लांनीं जो सल्ला दिला त्या योगानें या तरुणांचा हिरमोड झाला. ते हिंदुस्थानला परत जाण्यास तयार होईनांत यांपैकीं बरेचसे तरुण सुशिक्षित होते. अमानुल्ला यांनीं ते परत जात नाहींत असें पाहून त्यांना त्रासहि देण्यास कमी केलें नाहीं. तेव्हां मात्र त्यांच्यापैकीं

कांहींजण हिंदुस्थानांत परत आले. कांहींनीं रशियन तुर्कस्थानचा मार्ग धरला. वाटेंत कांहींना सशस्त्र अफगाण दरोडेखोरांनीं पकडलें, पण त्यांच्या सुदैवानें ही बातमी कॉ. रॉय यांच्या कानांवर गेल्यामुळें कॉ. रॉय यांनीं लागलीच सैन्य पाठवून त्यांची सुटका केली व त्यांना रशियन तुर्कस्थानांत परत आणलें. रशियन तुर्कस्थानांत कॉ. रॉय यांनीं कांहीं दिवस वास्तव्य केल्यावर ताशकंद येथें त्यांनीं एक लष्करी शाळा काढली होती तेथेंच या तरुणांनीं राहावें असा रॉय यांनीं त्यांना सल्ला दिला. लष्करी शाळेला जोडून 'इंडिया हाउस' म्हणून एक वसतिगृह काढण्यांत आलें होतें. तेथें हे सर्व तरुण कांहीं दिवस राहिले. रॉय स्वतः या हिंदी तरुणांची फार काळजी घेत असत.

### हिंदुस्थानांतील कम्युनिस्ट चळवळीस सुरुवात

कॉ. रॉय यांच्याशीं जसजसा या तरुणांचा सहवास वाढूं लागला, तसतशीं त्यांच्या डोक्यांतील धार्मिक कल्पनांचीं कोळिष्टकें पार झाडून निघालीं. राजकीय स्वातंत्र्याच्या लढ्याची स्पष्ट अशी कल्पना त्यांना आतां येऊं लागली; व परत हिंदुस्थानांत गेल्यावर कोणत्या मार्गानें पाऊल टाकावयास पाहिजे याचा चांगला धडा कॉ. रॉय यांच्या सहवासांत रशियन तुर्कस्थानांत त्यांना मिळाला. कांहीं तेथें लष्करी शिक्षण घेऊन तरबेजहि झाले. पुढें ताशकंद येथील 'लष्करी शाळा' व 'इंडिया हाउस' बंद करणें भाग पडल्यामुळें हिंदी तरुणांना पुढील शिक्षण देण्याचें कार्य करणें कॉ. रॉय यांना शक्य झालें नाहीं. तथापि मॉस्को येथील 'ईस्टर्न युनिव्हर्सिटी' म्हणजे पौर्वात्य विद्यालयांत या तरुणांना शिक्षण देण्याची रॉय यांनीं सोय केली. मॉस्कोमधील 'ईस्टर्न युनिव्हर्सिटी' या संस्थेचें नेतृत्व कॉ. रॉय यांच्याकडेसच होतें. रशियांत थोडे दिवस घालविल्यावर हे तरुण हिंदुस्थानांत परतूं लागले. रॉय यांच्या सांगण्याप्रमाणें हिंदुस्थानांतील राष्ट्रीय स्वातंत्र्याचा लढा चालविण्याचें शिक्षण या तरुणांना मिळालेलें होतें. प्रथम कॉ. फजली हुसेन व त्यानंतर कॉ. उस्मानी हिंदुस्थानांत येऊन दाखल झाले.

हिंदुस्थानांत आल्याबरोबर त्यांनीं ताबडतोब कार्याला सुरुवात केली. बहुजनसमाजाला शिक्षण देऊन त्यांना स्वातंत्र्याच्या लढ्यांत खेचण्याचें कार्य मोठ्या मेहनतीचें व कुशलतेचें असतें. विशिष्ट ध्येयानुसार सर्वस्व

अर्पण करण्याची तयारी असलेली तरुण मंडळीच तें करूं जाणे. लेच्यापेच्यांचें तें काम नव्हे; बहुजनसमाजाच्या जागृतीचें काम हें राष्ट्रीय लढ्याचा आत्मा आहे व हें कार्य करीत असतांना वर्षानुवर्ष हिंदुस्थानांत चरत असलेली ब्रिटिश साम्राज्यशाही स्वस्थ बसून ही चळवळ चालूं देणार होती असें थोडेंच आहे! सुरुवातीच्या काळांत कॉ. रॉय यांच्या हाताखालीं तयार झालेले दोन कार्यकर्ते मुझफर अहमद व उस्मानी यांनीं कम्युनिस्ट चळवळीचा हिंदुस्थानांत पाया घातला. त्या वेळीं हळूहळू कम्युनिस्ट चळवळीला अधिकाधिक कार्यकर्ते मिळूं लागले. कम्युनिस्ट चळवळीला हिंदुस्थानांत सुरुवात झाली, याची कल्पना हिंदुस्थान सरकाला यावयास वेळ लागला नाहीं. १८१८ च्या तिसऱ्या रेग्युलेशन कायद्याप्रमाणें कांहीं तरुणांना सरकानें त्या वेळीं अटक करून तुरुंगांत डांबून टाकलें.

---

# ११ युरोपांतून हद्दपारी

रशियन तुर्कस्थानांत कांहीं दिवस काढून व तेथें आलेल्या हिंदी तरुणांना योग्य तें शिक्षण देऊन परत हिंदुस्थानांत पाठविल्यावर रॉय हे पुन्हा रशियांत परतले व तेथील कार्यकर्त्यांचा विचार घेऊन यापुढें रॉय यांनीं युरोपांत वास्तव्य करावें असें ठरविण्यांत आलें व त्याप्रमाणें रॉय यांनीं युरोपांत जाण्याचा निश्चय केला. युरोपांत राहावयास व शिकण्यास येणाऱ्या विद्यार्थ्यांना व क्रांतिकारकांना भेटण्याचा रॉय यांचा खरा उद्देश होता. युरोपांत येणाऱ्या हिंदी तरुणांना व लोकांना कसें व कोठें भेटतां येईल याविषयीं ते सारखा विचार करीत होते. कांहीं हिंदी विद्यार्थि शिक्षणाकरितां युरोपांतच येतात, कांहीं व्यापाराकरितां युरोपला भेट देतात, कित्येक राजकरणी पुढाऱ्यांच्या भेटी होण्याचा योग यावयाचा म्हणजे युरोपांतच. या सर्व वस्तुस्थितीचा दूरवर विचार करून कॉ.रॉय यांनीं आपला मुक्काम युरोपांत नेण्यांत दूरदर्शीपणा दाखविला होता. कॉ. रॉय हे रशियांतून निघून स्वित्झर्लंडमधील 'झूरिच' या गांवीं प्रथम उतरले व तेथून हिंदुस्थानविषयक राजकीय चळवळीचीं सूत्रें त्यांनीं हलविण्यास सुरुवात केली. हिंदी प्रश्नाबद्दल सांगोपांग विचार करून बरोबर अचूक व निश्चित राजकीय ध्येय व धोरण आंखणें फार जरूर होतें. म. गांधींच्या नेतृत्वाखालीं हिंदी राष्ट्रीय चळवळीचा गाडा अडखळत अडखळत पुढें चालला होता. १९२० च्या पूर्वीची कॉंग्रेस व तदनंतरची कॉंग्रेस यांमधील फरक जनतेला स्पष्ट रीतीनें दाखविणें जितकें जरूर व आवश्यक, तितकेंच पुढील लढ्यांत पाऊल टाकतांना कोणकोणते खांचखळगे आडवे येतील, कोणते मार्ग अडचणीचे, त्याज्य व टाकाऊ म्हणून सोडून द्यावे लागतील, याचें निदान शास्त्रशुद्ध व चिकित्सक पद्धतीनें व्हावयास हवें होतें. युरोपांतील वास्तव्यांत कॉ. रॉय यांनीं याच गोष्टींचा विचार करून हिंदी राजकीय प्रश्नावर प्रकाश पाडणारें, मूलग्राही, तत्त्वप्रधान व ऐतिहासिक सिद्धांतांचा

सांगोपांग विचार करणारें असें वाङ्मय लिहिण्यास सुरुवात केली. आर्थिक व राजकीय प्रश्नांची सांगोपांग चर्चा कॉ. रॉय यांनीं या कालांत लिहिलेल्या ग्रंथांत विशद रीतीनें केलेली आहे. १९२० ते १९२२ या दोन वर्षांच्या कालांत हिंदुस्थानविषयक अशीं सहा पुस्तकें कॉ. रॉय यांनीं लिहिलीं; 'हिंदी राजकीय प्रश्न', 'असहकारितेचे बारा महिने', 'असहकारितेनंतर', 'राजकीय पत्रें', 'आपणांस कशाची गरज आहे?', 'हिंदुस्थानचा संधिकाल', वगैरे सहा पुस्तकें व प्रबंध कॉ. रॉय यांच्या लेखणींतून उतरले असून ऐतिहासिक जड-वादाच्या दृष्टीनें त्यांत केलेली हिंदी राजकीय लढ्याची मीमांसा व चिकित्सा इतर दुसऱ्या ग्रंथांतून क्वचितच पाहावयास मिळेल. " India in Transition " हा कॉ. रॉय यांचा ग्रंथ राजकीय चळवळी करणाऱ्या विद्यार्थ्यांना मार्गदर्शक तर होईलच, पण इतर राजकारणी व हिंदी प्रश्नांचा आस्थापूर्वक अभ्यास करणाऱ्या थोर इतिहासकार, अर्थशास्त्रज्ञ आणि समाजशास्त्रज्ञांनाहि हा ग्रंथ प्रमाणभूत असा झालेला आहे.

**रॉय यांचें लेखनसामर्थ्य**

मार्क्सवादाच्या दृष्टिकोनांतून हिंदुस्थानच्या इतिहासाचें व आधुनिक राजकीय चळवळींचें पृथक्करण केलेलें हें पहिलेंच पुस्तक, असा जगांत त्या पुस्तकाचा लौकिक आहे. ब्रिटिश अमदानीपूर्वी हिंदुस्थानची राजकीय व आर्थिक परिस्थिति कशी होती, त्या वेळीं हिंदुस्थानांतील जनतेंत सरंजामशाही पद्धतीचें प्राबल्य असल्यामुळें राष्ट्रीयत्वाच्या कल्पनेचा उदय कां होऊं शकला नाहीं, मार्क्सच्या ऐतिहासिक विकासवादाप्रमाणें व्यापारीवर्गाची भरपूर प्रगति झालेली असतांना भांडवलशाही समाजपद्धति अस्तित्वांत यावयास पाहिजे होती, ती ऐनवेळीं हिंदुस्थानांत ब्रिटिश सत्तेचें प्राबल्य झाल्यामुळें कशी येऊं शकली नाहीं, वगैरे मुद्द्यांचें सूक्ष्म विवेचन रॉय यांनीं त्या पुस्तकात केलेलें आढळतें. तसेंच, त्या वेळीं हिंदुस्थानांत भरपूर हिंदी भांडवल असून तत्कालीन भांडवलदार-वर्ग देशांत मोठ्या प्रमाणावर उद्योगधंदे सुरू करून औद्योगिक, आर्थिक व सामाजिक क्रांति घडवून आणण्यास समर्थ असतांना, केवळ ब्रिटिश व्यापाराला संरक्षण व उत्तेजन देण्यासाठीं ब्रिटिश साम्राज्यशाहीनें हिंदी कारागिरांचा नायनाट करून हिंदी उद्योगधंद्याची केलेली गळचेपी व

त्यामुळें येथील व्यापारी वर्गाची व कारागिरांची झालेली दुर्दशा यांचें वास्तव चित्र या ग्रंथांत पाहावयास सांपडतें. उदरनिर्वाहाचे व द्रव्यार्जनाचे वरील मार्ग बंद झाल्यामुळें व्यापारी वर्गास पुन्हा शेतीकडे कशी धाव घ्यावी लागली व तेंहि नीट न जमल्यामुळें त्यांनीं आपल्या भांडवलाच्या साहाय्यानें जमिनीच्या क्रयविक्रयाचा धंदा कसा आरंभिला व त्या योगें हिंदी व्यापारी वर्गच शेतकऱ्यांच्या पिळणुकीस कसा कारणीभूत झाला व त्यांतच ब्रिटिशांनीं जाणूनबुजून केलेला जमीनदारी पद्धतीचा अवलंब आणि त्या मुळें शेतकऱ्यांची झालेली पिळणूक व दुर्दशा वगैरे अनेक विषयांचें मार्मिक विवेचन या ग्रंथांत केलें आहे.

अशा रीतीनें हिंदुस्थानांतील प्रारंभीच्या ब्रिटिश अमदानीची मार्मिक छाननी करून कॉ. रॉय यांनीं अलीकडील राजकीय घडामोडीचा त्याच पुस्तकांत विचार केला आहे. प्रारंभीं ब्रिटिशांना आपले अधिकारी आणि हिंदी जनता यांच्यामधील व्यवहार सुरळीतपणें चालविण्यास दुवा म्हणून उपयोगी पडणाऱ्या देशी सुशिक्षितांची भासलेली गरज व ती पूर्ण करण्याकरितां ब्रिटिशांनीं आंखलेली शिक्षणाची योजना, सुशिक्षितांत उत्पन्न केलेलें नोकरीचें आकर्षण इत्यादि घडामोडींची साग्र हकीकत देऊन, त्यांतूनच पुढें उत्पन्न झालेली कॉंग्रेसची चळवळ, तिचें पूर्वीचें सनदशीर स्वरूप वगैरे राजकीय इतिहासाचा विचार त्याच ग्रंथांत केला असून, पुढें हिंदी राष्ट्रीय चळवळीची कसकशी प्रगति होत गेली, त्यानंतर लवकरच झालेल्या जागतिक महायुद्धाचे तिच्यावर काय काय परिणाम झाले, महायुद्धानंतर ब्रिटिश साम्राज्यशाहीला नाइलाजानें हिंदी उद्योगधंद्यांस संरक्षण व उत्तेजन द्यावें लागल्यामुळें हिंदी भांडवलाची कशी वाढ झाली, उद्योगधंद्यांच्या वाढीबरोबर तिचा अपरिहार्य परिणाम म्हणून कामगारवर्गाच्या लहानमोठ्या संघटना निर्माण होऊन त्यांच्या मागण्यांचें कॉंग्रेसच्या कार्यक्रमांत कसकसें प्रतिबिंब पडत गेलें, इत्यादि गोष्टींची सांगोपांग व मुद्देसूद माहिती दिली आहे. नंतर स्वातंत्र्यासाठीं राष्ट्रानें केलेला महात्माप्रणित सत्याग्रहसंग्राम व त्या संग्रामाचें वर्ग-कलहांत रूपांतर होऊं नये म्हणून कॉंग्रेसचे चालू असलेले प्रयत्न इत्यादि गोष्टींचा उल्लेख करून कॉ. रॉय यांनीं हिंदी राजकीय सद्यःस्थितीचें विवेचन

इतक्या शास्त्रशुद्ध, व चिकित्सक पद्धतीनें केलें आहे, कीं या ग्रंथास हिंदी राजकीय विषयावर लिहिलेल्या ग्रंथांत पहिलें स्थान मिळेल यांत मुळींच शंका नाहीं.

हा ग्रंथ प्रसिद्ध झाल्याबरोबर नुसत्या जर्मनींत त्याच्या तीन आवृत्ति निघून जवळ जवळ ३०००० प्रती खपल्या व जगांतील जवळ जवळ सर्व प्रमुख भाषांत त्यांचीं भाषांतरेंहि झालीं. हिंदुस्थानांतहि या पुस्तकाच्या अनेक प्रती आल्या, पण सरकारनें त्या जप्त केल्यामुळें, त्याचा जितका प्रसार व्हावा तितका झाला नाहीं, ही दुर्दैवाची गोष्ट होय. असा हा अपूर्व ग्रंथ लिहून कॉ. रॉय यांनीं आपल्या प्रखर बुद्धिमत्तेच्या तेजानें जगाचे डोळे दिपविले आहेत; व हिंदुस्थानच्या जनतेस अचूक मार्ग दाखविण्याचेंहि कार्य केलें आहे. ज्यांना खात्रीच करून घ्यावयाची असेल त्यांनीं कॉ. रॉय यांचा हा ग्रंथ एकदां तरी वाचून पाहावा अशी आमची विनंति आहे.

या काळांत रॉय यांचें लिखाण अखंड चालू होतें. तीन वर्तमानपत्रें त्यांच्या संपादकत्वाखालीं चालू होती. लंडन, पॅरिस, झूरिच, बर्लिन वगैरे युरोपांतील प्रमुख शहरांतून त्यांनीं अनेक मासिकें व वर्तमानपत्रें चालू केलीं होतीं. 'व्हॅनगार्ड', 'ॲडव्हान्स गार्ड', 'इंडियन मासेस' हीं त्या वेळीं रॉय यांनीं चालविलेलीं प्रमुख वर्तमानपत्रें होत. या पत्रांतून हिंदी प्रश्नांवर सांगोपांग चर्चा होत असे. या वर्तमानपत्रांचा वाचकवर्ग अफाट पसरला होता व हिंदुस्थानांतील जहालमतवादी तरुण व परदेशांतील हिंदी विद्यार्थि हीं वर्तमानपत्रें अत्यंत आवडीनें वाचीत असत. दुर्दैवानें हीं मासिकें, पत्रकें व वर्तमानपत्रें सरकारनें जप्त करून टाकलीं. कानपूर व मिरत या दोन खटल्यांत कॉ. रॉय यांच्या या विविध लिखाणांतील उतारे पुरावे म्हणून दाखल करण्यांत आले होते. १९२६ मध्यें प्रसिद्ध झालेलें कॉ. रॉय यांचें 'हिंदी राजकारणाचें भवितव्य' हें हिंदी भाषेंत लिहिलेलें पुस्तकहि सरकारनें लगेच जप्त केलें.

हिंदुस्थानांतील राष्ट्रीय चळवळीला मदत करणें, तसेंच इतर वसाहतींतील जनतेच्या स्वातंत्र्याच्या लढ्याचें पुढारीपण घेणें, हेंच धोरण रॉय यांनीं आपल्यापुढें ठेवलें होतें. आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळीचे प्रणेते या नात्यानें त्यांच्याकडे कम्युनिस्ट चळवळीचें नेतृत्व आलें व तें कर्तव्य त्यांनीं उत्तम

रीतीनें बजाविलें. कॉ. रॉय यांच्या कार्याचा परिणाम इतका झाला होता, व युरोपांतील भांडवलशाही राष्ट्रांना त्यांची इतकी दहशत बसली होती, कीं युरोपांतील बहुतेक राष्ट्रांनीं आपलें शेवटचें 'हद्दपारी'चें शस्त्र रॉय यांच्यावर उगारलें व एकामागून एक—स्वित्झर्लंड, स्वीडन, नॉर्वे, हॉलंड, जर्मनी, बेल्जम, फ्रान्स व इतर कित्येक राष्ट्रांतून वास्तव्य करण्यास व प्रवास करण्यास कॉ. रॉय यांना बंदी करण्यांत आली. भांडवलशाही राष्ट्रांना रॉय यांच्या कर्तबगारीबद्दल वाटणाऱ्या दहशतीचें व कार्यकौशल्याचें हें शिफारसपत्रच होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**रॉय-मॅक्डोनाल्ड सामना**

रॉय यांना आंतरराष्ट्रीय राजकारणांत किती वरच्या दर्जाचें स्थान होतें हें इंग्लंडमधील सार्वत्रिक निवडणुकीच्या वेळीं दिसून आलें. १९२४ सालीं इंग्लंडमधील सार्वत्रिक निवडणुकीच्या वेळीं मि. रॅम्से मॅक्डोनाल्ड यांच्याविरुद्ध रॉय यांस कम्युनिस्ट पार्टीतर्फे उभें करण्यांत आलें होतें. निवडणुकी झाल्यानंतर मि. मॅक्डोनाल्ड हे निवडून आले व पुढें ते इंग्लंडचे मुख्य प्रधान बनले.

इंग्लंडमधील समाजवादी चळवळीचा पुरस्कार करीत करीत, कामगारांमध्यें आपलें आसन स्थिर केल्यावर, एकदम कामगार-चळवळीचा विश्वासघात केल्याचें मि. मॅक्डोनाल्ड यांच्यासारखें दुसरें उदाहरण इतिहासांत क्वचितच मिळेल ! अधिकारपदावर गेल्यावर मि. मॅक्डोनाल्ड हे साम्राज्यसंरक्षणाची भाषा बोलूं लागले व इतिहासघटना अशी विचित्र, कीं निवडणुकींत प्रतिस्पर्धी म्हणून उभ्या असलेल्या उमेदवाराला म्हणजे कॉ. रॉय यांना, मॅक्डोनाल्ड यांच्या हुकमान्वयें पॅरिसला अटक करण्यांत आली. कानपूर कटाच्या खटल्यांतील मुख्य आरोपी म्हणून कॉ. रॉय यांना फ्रेंच हद्दींत पकडण्यांत आलें. वास्तविक हें कृत्य आंतरराष्ट्रीय न्यायदानाच्या कायद्याविरुद्ध होतें. पण साम्राज्यसंरक्षणापुढें, व्यक्तिस्वातंत्र्य, न्याय व हक्क यांचा काय पाड ! फ्रेंच सरहद्दीवरून रॉय यांस पकडून नेत असतां त्यांनीं फ्रेंच पोलिसांच्या हातावर तुरी देऊन पलायन केलें.

मॅक्डोनाल्ड यांची कारकीर्द हिंदुस्थानांत चिरस्मरणीय झालेली आहे. सोशॅलिस्ट म्हणवून घेणारा इंग्लंडचा मुख्य प्रधान जेव्हां हिंदुस्थानांतील कॉंग्रेसमधील व कामगार-चळवळींतील कार्यकर्ते आणि साम्राज्यविरोधी लढा करणारे तरुण यांच्यावर कायद्याचें हत्यार चालवून त्यांच्या चळवळीची खच्ची करण्यास पुढें सरसावला त्या वेळीं मॅक्डोनाल्ड यांच्या समाजवादी चळवळीचें खरें स्वरूप बाहेर पडलें व मग 'हेच का ते मि. मॅक्?' असा प्रश्न प्रत्येकाच्या तोंडीं झाला असल्यास त्यांत नवल तें काय! मि. मॅक्डोनाल्ड यांच्या कारकीर्दीवर सणसणीत टीका करणारें—मि. मॅक्डोनाल्ड यांचें अंतरंग बाहेर पाडणारें—असें एक अनावृत पत्र त्या वेळीं कॉ. रॉय यांनीं प्रसिद्ध केलें होतें. त्यांत त्यांनीं मॅक्डोनाल्ड यांच्या वर्तनाबद्दल खरपूस टीका केली होती.

रॉय यांच्या या वरील पत्रास, जगांतील राजकीय वाङ्मयांत बरेंच वरच्या दर्जाचें व चिरस्मरणीय स्थान प्राप्त झालें आहे.

---

# १२ नेहरू पितापुत्रांची भेट

कॉ. रॉय यांना रशिया हाच काय तो आधार होता. कॉ. रॉय यांना दुसरी 'मातृभूमि' नव्हती. वसाहतींतील लोकांचें रक्तशोषण करून स्वतः संपन्न होण्याचे आतांपर्यंत चालू असलेले साम्राज्यवादी राष्ट्रांचे चाळे, दलित जनता व तिचे कैवारी कॉ. रॉय हे यापुढें चालू देण्यास मुळींच तयार नव्हते. त्यामुळें रॉय यांना अज्ञातवासांत बरेच दिवस काढावे लागले. युरोपांतील बहुतेक सर्व राष्ट्रें रॉय यांना पकडण्याकरितां डोळ्यांत तेल घालून टपलेलीं होतीं. इतकें रॉय यांचें अस्तित्व त्या देशांतील सरकारला भयप्रद वाटत होतें. एखाद्या राष्ट्रांत पाऊल टाकावें तर तेथील सरकारनें एक तुरुंग तरी दाखवावा, नाहीं तर दुसऱ्या देशांत तरी रवानगी करावी. बरें, तेथें तरी स्वस्थता ? ती कशाला ! तेथील सरकारनेंहि उठावें, रॉय यांना उचलावें व परदेशांत नेऊन सोडून द्यावें, असा प्रकार अनेक वेळां झाला. रॉय यांना स्वस्थता म्हणून मिळणें शक्यच नव्हतें. राजकीय कैदी म्हणूनहि त्यांस मानावयास युरोपांतील राष्ट्रें तयार नव्हतीं. वास्तविक, एखाद्या देशांतील राजकीय पुढाऱ्यास दुसऱ्या देशांत राहण्यास मोकळीक असावी व त्या राष्ट्रानें त्या व्यक्तीचें संरक्षण करावें असा आंतरराष्ट्रीय कायदा आहे व लोकशाही राष्ट्रांनीं अशा रीतीनें राजकीय कैद्यांना आपल्या देशांत संरक्षण दिल्याचीं उदाहरणें आतांपर्यंत अनेक घडलेलीं आहेत; परंतु रॉय यांच्या बाबतींत सर्वच कांहीं निराळें ! रॉय यांच्या वास्तव्यावर आलेली ही गदा सहजासहजीं आलेली नव्हती. तर ब्रिटिश सरकार व युरोपांतील सुधारलेलीं राष्ट्रें यांच्यामध्यें गुप्त करार झाला असल्यामुळें, जाणूनबुजून त्यांना हद्दपार करण्यांत येत होतें. फक्त एकच देश रॉय यांना आपले म्हणून समजत होता व तो देश म्हणजे रशिया होय. पॅरिस येथें पोलिसांनीं पकडल्यानंतर, पोलिसांच्या हातून निसटून रॉय आले ते थेट रशियांत येऊन थडकले. अज्ञात-

वासांत असतांना रॉय यांची चळवळ थोडी थंडावली होती.' तरी सुद्धां त्यांनीं गुप्त रीतीनें प्रवास करीत करीत, अनेक हिंदी पुढाऱ्यांच्या गांठीभेटी घेतल्याच. मॉस्कोहून थेट युरोपांत कोठें तरी जावें, तेथें कोणाची भेट घ्यावयाची असेल ती घ्यावी व परत पलायन करावें असा या काळांतील त्यांचा कार्यक्रम ठरल्यासारखा होता. अनेक हिंदी पुढाऱ्यांचीं या काळांत कॉ. रॉय यांनीं भेट घेतली. युरोपांत आल्यावर कोणाहि हिंदी राष्ट्रभक्तास रॉय यांच्या भेटीचा मोह व्हावा, इतकी रॉय यांनीं आपल्या कर्तबगारीनें कीर्ति संपादन केली होती. मौलाना महमदअल्ली, पंडित मोतिलाल, पंडित जवाहरलाल, श्रीनिवास अय्यंगार, कामगार कार्यकर्ते श्री. बखले, श्री. कल्लपा वगैरे पुढाऱ्यांनीं कॉ. रॉय यांची युरोपांत भेट घेतलेली आहे.

१९२७ सालीं पं. मोतिलालजी आपले पुत्र पं. जवाहरलाल यांच्याबरोबर युरोपच्या दौऱ्यावर असतांना त्यांनीं रशियाला भेट दिली. रशिया म्हणजे मोठ्या कुतूहलाचें ठिकाण आहे, असें त्या वेळीं सर्वच लोकांना वाटत होतें. पण दलित राष्ट्रांतील जनतेला रशिया म्हणजे आंतरराष्ट्रीय क्रांतिकारकांचें माहेरघर असेंच वाटत होतें. रॉय यांच्यासंबंधीं पं. मोतिलालजींना फारच आदर वाटत असे. हिंदी राष्ट्रीय चळवळीसंबंधानें आपण कॉ. रॉय. यांच्याशीं मनमोकळेपणानें चर्चा व विचारविनिमय करावा असा पं. मोतिलालजींचा मानस होता. जर संधि मिळाली तर कांहीं केल्या ती वायां जातां उपयोगी नाहीं या निश्चयानें मॉस्को शहरीं नेहरू पितापुत्र आले. पं. मोतिलाल व पं. जवाहरलाल यांचा रेडस्क्वेअरमध्यें रशियन सरकारतर्फें जाहीर सन्मान करण्यांत आला. रॉय हे त्या वेळीं नुकतेच मॉस्कोला आले होते. मॉस्को शहरीं आल्याबरोबर पं. मोतिलालजी व पं. जवाहरलाल यांनीं रॉय यांची भेट घेतली. भेटींत कोणत्या विषयाची चर्चा झाली तें जरी आतां कळणें शक्य नसलें तरी महत्त्वाच्या हिंदी राजकीय प्रश्नाबाबत कॉ. रॉय यांच्याशीं झालेली चर्चा ऐकून दोघांहि नेहरू पितापुत्रांना फारच समाधान वाटलें असें म्हणतात.

# १३ चिनी राज्यक्रांतीच्या रणक्षेत्रांत

आतां आपण कॉ. रॉय यांच्या राजकीय जीवनाच्या उत्तरार्धाकडे वळणार आहों. कॉ. रॉय यांच्या राजकीय जीवनांत पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग पाडण्याचें मुख्य कारण म्हणजे रशियांत गेल्यापासून कम्युनिस्ट इन्टरनॅशनलचे एक मुख्य आधारस्तंभ म्हणून जगप्रसिद्ध क्रांतिकारकाची त्यांनीं एकदां भूमिका घेतली व त्या कार्यांत आयुष्याची आठ-नऊ वर्षे घालविल्यानंतर कम्युनिस्ट इन्टरनॅशनल सोडून जाण्याचा त्यांच्यावर प्रसंग आला, म्हणून या कालखंडाचे दोन भाग करणें अपरिहार्य आहे. कॉ. रॉय यांनीं चीन देशांतील क्रांतीच्या कालांत जें कार्य केलें व ज्यामुळें मतभेदास हळूहळू वाचा फुटूं लागली त्या वेळेपासून कॉ. रॉय यांच्या आयुष्याच्या उत्तरार्धाला सुरुवात झाली असें म्हटलें, तर तें चुकीचें होणार नाहीं.

**चीनची माहिती**

चीन देश हा पृथ्वीवरील लोकसंख्येनें व क्षेत्रफळानें अफाट असा एक देश आहे. या देशाचें क्षेत्रफळ ४० लक्ष चौरस मैल असून लोकसंख्या ५० कोटी आहे. म्हणजे जगाच्या लोकसंख्येपैकीं $\frac{१}{४}$ लोक एकट्या चीनमध्यें राहतात. १८९४ सालापासून या देशाची लचकेतोड साम्राज्यवादी राष्ट्रें करीत असून मँच्यूरिया, मंगोलियाचा भाग, तिबेट, सिनकिंग हे भाग परकीय राष्ट्रांच्या ताब्यांत तर आहेतच; पण परकीय राष्ट्रांनीं या नाहीं त्या निमित्तानें कांहीं कांहीं मुख्य बंदरांवर निरनिराळे हक्क प्रस्थापित केलेले आहेत. मँच्यूरिया तर जपाननें पूर्वीच गिळंकृत केला. मंगोलियाच्या भागाबद्दल चीन व मँच्यूरिया यांमध्यें वारंवार झगडे चालू असतात. तिबेटवर खरा ताबा ब्रिटनचा आहे. सियानकिंग या प्रांताला चिनी तुर्कस्थान असें म्हणतात व खरोखर हा प्रांत चीनचा; परंतु मध्य-आशियांतील रणभूमि, अशी या प्रांताची स्थिति झालेली आहे. चीन देश हा

मोठमोठ्या अशा बारा प्रांतांचा झालेला आहे; व हे प्रांत कित्येक वर्षांपासून आपापल्या विशिष्ट राज्यपद्धतीनें अस्तित्वांत आले आहेत.

चिनी शेतकरी हा कांहीं केल्या आपली जागा अगर जमीन सोडण्यास तयार नसतो, याचें कारण ही वर्षानुवर्षें चालत आलेली पूर्वापार रूढि हेंच होय. चिनी शेतकऱ्याचें कुटुंब हा पूर्वापार रूढीबद्ध असा एक बलिष्ठ घटक आहे. कसलींहि संकटें, कितीहि हालअपेष्टा आल्या तरी चिनी गृहस्थ हा आपली रूढि सोडण्यास तयार होत नाहीं. चीनची संस्कृति अतिप्राचीन आहे याबद्दल मतभेद नाहीं. इतकेंच नव्हे, तर प्राचीन काळीं ही संस्कृति वरिष्ठ दर्जाची होती याबद्दलहि शंका नाहीं. जातिविषयक कल्पना या समाजांत पाहिल्यापासूनच नाहींत. त्यामुळें कोणत्या जातीचा अगर दर्जाचा मनुष्य कोणत्या अधिकारपदावर आरूढ होईल हें हमखास सांगतां येणार नाहीं. चिनी सुशिक्षित गृहस्थाची अगर एखाद्या लष्करी अंमलदाराचीहि तीच गत. जातिविषयक अगर वंशविषयक अशा कल्पना चिनी संस्कृतींत दृढमूल झालेल्या नाहींत ही अतिशय महत्त्वाची गोष्ट आहे. संस्कृतिविषयक लखोटेबंद अशा जाती नसल्याकारणानें धार्मिक बाबतींतहि चिनी समाज अत्यंत सहिष्णु असा आहे. चिनी समाज, धर्म व संस्कृति हीं मोठीं विचार करण्याजोगीं व अभ्यसनीय आहेत. चीन देशाच्या एकीकरणाला धार्मिक मतभेद आडवे येत आहेत असें मुळींच नाहीं. चीनमधील बहुतेक सर्व लोक बौद्ध धर्म पाळतात 'टाइझम' व 'कान्फ्यूशियानिझम' या दोन पंथांचे अनुयायी चीनमध्यें मोठ्या प्रमाणांत आहेत. पण ह्या दोन पंथांपैकीं कान्फ्यूशियानिझम पंथांत आचारविषयक भाग फारच थोडा आहे. त्यांत आचारापेक्षां विचारालाच जास्त प्राधान्य आहे. धर्मपंथ आचारावर भर देतो, तर तत्त्वज्ञान हें विचारावर जास्त भर देतें. बौद्ध धर्म, मुसलमानी धर्म व ख्रिश्चन धर्म हे जसे मुख्यतः आचारप्रधान पंथ आहेत तशी कान्फ्यूशियानिझमची गोष्ट नाहीं. बौद्ध धर्म आणि टाइझम या दोन धर्मपंथांतून तांत्रिक विधि आणि कर्मठ आचार यांची भरपूर रेलचेल असलेली दिसून येते. भावनेची तीव्रता यामध्यें जवळ जवळ शून्यच. धार्मिक मतभेद हे चिनी गृहस्थाच्या राजकीय व सामाजिक आचारविचारांत फारसे आडवे येत नाहींत. इतकेंच नव्हे, तर

आपल्याला आश्चर्य वाटण्यासारखीं परिस्थिति चीनमध्यें पाहावयास मिळतें. एकच इसम निरनिराळ्या धर्मपंथांचें आचरण करतांना व त्याप्रमाणें वागतांना आढळतो. जपानमध्येंहि जवळ जवळ अशीच स्थिति आहे असें म्हणतात. धर्माच्या औपचारिक व कृत्रिम आचारांना अजीबात फाटा दिलेला असा देखावा चीन व जपानमध्यें दिसतो, व त्यांचे परिणाम त्या लोकांच्या राजकीय व सामाजिक चळवळींवरहि झालेले दिसतात. चीनमध्यें २ कोट मुसलमान व ४० लक्ष ख्रिश्चन लोंकांची वस्ती आहे.

**चीनच्या आक्रमणास सुरुवात**

चीनच्या अंतर्गत कारभारांत इतर राष्ट्रांचा पाय पडला नसता, तर चीनची प्रगति हां-हां म्हणतां झाली असती. आपल्या मालाला कायमचें मिळणारें चीनचें गिऱ्हाईक व चीन देशांतील खनिज संपत्तीची विपुलता, यांच्या मोहानें युरोपांतलीं राष्ट्रें, जपान व अमेरिका यांच्या तोंडाला पाणी सुटून त्यांनीं आपलें भांडवल चीनमध्यें गुंतविण्यास अठराव्या शतकांत सुरुवात केली. हळूहळू या राष्ट्रांची चीन ही मोठी बाजारपेठ बनली व त्यामुळें चीनच्या स्वतंत्र प्रगतीचा मार्ग एकदां खुंटला तो कायमचाच! परकीय लोक चीनमध्यें आले ते ठरलेल्या पाऊलवाटेनेंच आले. मागसलेल्या लोकांना सुधारण्याकरितां म्हणून, अमेरिकेच्या मिशनरी लोकांनीं आपलें चंचूगवाळें एकदां चीन देशांत टाकल्यावर, त्यांनीं पाय पसरण्यास सुरुवात केली. त्यांच्या मागून त्यांचे भाईबंद गोत-गोतावळ्यासह आपलें भांडवल घेऊन चीनमध्यें स्थायिक झाले आणि अशा रीतीनें सुधारणेच्या व ज्ञानसंवर्धनाच्या नांवाखालीं चीनमध्यें परकीय भांडवलाचा कायमचा प्रवेश झाला. हळूहळू राजकीय हक्कांचाहि प्रश्न उद्भवलाच. राजकीय हक्कांखेरीज भांडवल सुरक्षित कसें राहणार! आपल्या हक्कांवर आपल्या लोकांखेरीज दुसरें कोण देखरेख करणार? आपल्या राजकीय हक्कांच्या संरक्षणाच्या नांवाखालीं परकीय राष्ट्रांनीं चीनमधील महत्त्वाचीं व्यापारी बंदरें व शहरें गिळंकृत करण्यास प्रारंभ केला.

प्रथमतः चीननें प्रतिकाराचा प्रयत्न केला पण व्यर्थ. शेवटीं साम, दाम, दंड व भेद या उपायांचा अवलंब करण्यांत आला, पण त्याचाहि कांहीं उपयोग झाला नाहीं. चीनचें सर्वांत महत्त्वाचें हॉंगकॉंग हें बंदर १८४१ सालामध्येंच

ब्रिटिशांनीं आपल्या ताब्यांत घेतलें. दक्षिण चीनमधील 'क्वांग-चौ-वान' हा भाग १८९८ मध्यें फ्रेंचांनीं ९९ वर्षांच्या कराराच्या नांवाखालीं घशाखालीं घातला. जपाननें तर चीनची लचकेतोड सारखी चालविलीच आहे. शांघाय बंदरासारखें दहा लक्ष लोकसंख्या असलेलें चीनचें नाक परकीयांच्या ताब्यांत असून, तेथील राज्यव्यवस्थाहि चीनशिवाय इतर परकीय राष्ट्रांच्या संमतीनेंच चालली आहे. चीनमधील कित्येक बंदरांवर परकीयांना निरनिराळेच स्वतंत्र असे हक्क आहेतच. महायुद्धानंतर चीनला कांहीं हक्क परत मिळाले असले तरी, आपली बाजारपेठ कायम टिकवून धरण्यासाठीं, जीं जीं महत्त्वाचीं ठाणीं परकीयांच्या हातांत आहेत; अगर जे जे महत्त्वाचे हक्क त्यांनीं स्थापन केलेले आहेत ते नाहींसे झालेले नाहींत. अशा रीतीनें चीनची कुतरओढ गेल्या पाऊणशें वर्षांपासून चालू आहे. इतकेंच नव्हे तर चीन हा देश सर्वस्वीं परकीयांच्या ताब्यांत जातो कीं काय, अशी भीति सध्यां उत्पन्न झालेली आहे. जगांतील राष्ट्रांचा कमकुवतपणा पाहून, जपाननें तर एकेक प्रांत हस्तगत करीत करीत उत्तर चीन जपानच्या निशाणाखालीं आणण्यासाठीं लढाईलाहि सुरुवात केली आहे. युरोपांतील औद्योगिक प्रगतीनंतर पाश्चात्य संस्कृतीचा प्रभाव हळूहळू चीनवरहि दिसूं लागला. मोठमोठ्या कारखान्यांत तयार होणारा माल चीन देशांतील खेड्यापाड्यांतील कानाकोपऱ्यांत पोंचूं लागला. पूर्वीं अस्तित्वांत असलेले हस्तव्यवसायाचे छोटे छोटे धंदे, नवीन तऱ्हेनें निपज होणाऱ्या मालापुढें टिकाव धरूं शकले नाहींत. जगांतील इतर राष्ट्रांमधून जी समाजक्रांति झपाट्यानें होत होती तितक्या वेगानें चीनमध्यें समाजक्रांति होणें शक्य नव्हतें व इतर राष्ट्रांच्या वर्चस्वामुळें तर, चीनच्या नैसर्गिक प्रगतीची चांगलीच गळचेपी झाली होती, मात्र चीनचें पाऊल औद्योगिक प्रगतीच्या मार्गानें थोडेंथोडें पुढें पडूं लागलें होतें. औद्योगिक प्रगतीला सुरुवात झाल्यामुळें चीनमध्यें कारखान्यांत राबणारा कामगार-वर्ग तयार होत होता. नुसता वर्ग निर्माण होत होता असें नव्हे, तर त्या वर्गाचें लढाऊ तत्त्वज्ञानहि चिनी कामगार-वर्ग शिकूं लागला.

### को-मिंग-टांगचा जन्म : राजकीय चळवळीस सुरुवात

परिस्थितीनुरूप कामगार व शेतकरी हा वर्ग चळवळीचीं साधनें शोधूं लागला. राजकीय क्रांतीची अंधुक अशी भावना या समाजांत संचारूं

लागली. चिनी शेतकरी-कामकाऱ्यांचीं दुःखें युरोप-अमेरिका येथून शिक्षण घेऊन आलेल्या तरुणांच्या चळवळीनें चवाठ्यावर मांडलीं गेलीं. क्रांतिकारक स्वरूपाचा स्पष्ट असा कार्यक्रम जनतेसमोर नसल्यामुळें, लोकांची राजकीय लढ्याची तयारी व्हावी तशी झाली नाहीं. होतां होतां, को-मिंग-टांग नांवाच्या राष्ट्रीय स्वातंत्र्याकरितां चळवळ करणाऱ्या संस्थेचा जन्म झाला. प्राथमिक अवस्थेंत को-मिंग-टांग म्हणजे राष्ट्रीय प्रश्नावर वादविवाद करणारें 'चर्चा-मंडळ' एवढाच त्याचा अर्थ होता. फार तर एखाद्या वेळीं सभा करावी, कधीं चर्चा करावी, कधीं कधीं वादविवाद घडवून आणावे यापलीकडे को-मिंग-टांगच्या कार्यक्रमाची उडी गेली नाहीं. युद्धपूर्व-कालापर्यंत ही राष्ट्रीय संस्था बाल्यावस्थेंत होती. युद्धोत्तरकालीं मात्र राष्ट्रीय सभेचा प्रवाह वाढत चालला, व या राष्ट्रीय सभेला सुसंघटित पक्षाचें स्परूप एकदां प्राप्त झालें. आतां मात्र राष्ट्रीय लढ्याचा पवित्रा बदलला व राष्ट्रीय सभेचें स्वरूपहि बदललें. को-मिंग-टांगच्या नेतृत्वाखालीं जनतेच्या चळवळीचा पाया रोवला गेला या संस्थेचें पुढारीपण अद्यापि जरी प्रतिगामी व स्वार्थी अशा लोकांकडे होतें, तरी या संस्थेच्या निशाणा-खालीं व शिस्तीखालीं चिनी जनता एकत्रित होत होती हें मात्र खरें. 'बाक्सर बंडा'च्या रूपानें चिनी जनतेच्या राष्ट्रीय आकांक्षांची चुणूक दिसून आली. राष्ट्रीय लोकसत्ताक स्वराज्याच्या चळवळीची ती नांदीच होती असें म्हणण्यास कांहींहि हरकत नाहीं.

१९११ मध्यें मॅच्यू घराण्याचा अस्त होऊन लोकसत्ताक राज्य चीनमध्यें स्थापन झालें. चीनच्या स्वातंत्र्याच्या इतिहासांत डॉ. सन्-यत्-सेन यांचें नांव अजरामर झालेलें आहे. डॉ. सन-येत्-सेन यांचें अमेरिकेंत उच्च दर्जाचें शिक्षण झालेलें होतें. त्या शिक्षणाचा परिणाम त्यांच्या पुढील आयुष्यावर झालेला आहे. युद्धपूर्वकालांत जपाननें आपल्या साम्राज्यशाही धोरणाला पौर्वात्य संस्कृतीचें गोंडस नांव दिलें होतें. पाश्चिमात्य राष्ट्रांच्या मगरमिठींतून पौर्वात्य राष्ट्रांची सोडवणूक करणें हें आपलें ध्येय आहे अशी घोषणा जपाननें करण्यास त्या वेळीं सुरुवात केली व त्याचा इष्ट असा परिणामहि झाला. त्या सुमारास बहुतेक सर्व पौर्वात्य राष्ट्रें युरोपियन राष्ट्रांच्या साम्राज्यशाहीच्या

पंजाखालीं सांपडलेलीं होतीं व या परिस्थितीचा फायदा घेऊन आपल्या स्वतःच्या आक्रमणाच्या धोरणास जपाननें दिलेलें स्वरूप पुष्कळशा पौर्वात्य राष्ट्रांना पटलें. जपान हें राष्ट्र युरोपियन राष्ट्रांप्रमाणें साम्राज्यवादी राष्ट्र आहे हें जगास व विशेषतः चिनी जनतेला कळावयास थोडा अवधि लागणार होता. जपानच्या या हुलकावणीला डॉ. सन्-यत्-सेनसारखा मुत्सद्दीहि फसला. जपानच्या धोरणाला प्रारंभीं डॉ. सन्-येत्-सेन यांनीं न कळत पाठिंबा दिला. महायुद्धानंतर व व्हर्सेलिसच्या तहानंतर चिनी जनतेस जपानच्या साम्राज्यशाही धोरणाचा वीट येऊन तेथील शेतकरी, कामकरी आणि विद्यार्थि यांनीं जपानी मालावर बहिष्कार टाकून जपानविरुद्ध रणशिंग फुंकलें व अखिल जनतेचा त्यास पाठिंबा मिळाला. आतांपर्यंत एक चर्चा-मंडळ म्हणून समजल्या जाणाऱ्या को-मिंग-टांग या संस्थेला राजकीय पक्षाचें महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें व डॉ. सन्-यत्-सेन यांनीं त्या पक्षाचें पुढारीपण घेऊन चीनमधील चळवळ जोरांत सुरू केली.

१९१९ या सालांत चिनी जनतेकडून क्रांतिकारक चळवळीला चांगला पाठिंबा मिळाला. पेकिंग येथें अस्तित्वांत असलेलें सरकार कोलमडून पडलें, को-मिंग-टांगच्या शाखा प्रांताप्रांतांतून निघूं लागल्या, कामगारवर्गानें आपल्या मागण्यांकरितां ठिकठिकाणीं संप करून ते यशस्वी रीतीनें लढविले. चीन हा देश रशियापासून फार दूर नाहीं. याच सुमारास रशियांत कामगार-क्रांति झाली व त्यामुळें चीनलाहि नवजीवन प्राप्त झालें. साहजिकच शेतकरी व कामगार-वर्गाच्या लढ्यालाहि नवीन वळण लागूं लागलें. या राष्ट्रीय संस्थेची संघटना नवीन ध्येयानुसार व्हावयास पाहिजे असें रशियन प्रतिनिधींना वाटलें. १९२० सालीं, 'कम्युनिस्ट इंटरनॅशनल' या क्रांतिकारक संस्थेची सभा भरून त्यांत महत्त्वाचा निर्णय करण्यांत आला. 'साम्राज्यशाहीशीं लढा करीत असतांना व एकीकडे कामगारांची संघटना करीत असतांना त्याचबरोबरच राष्ट्रीय स्वातंत्र्यासाठीं धडपडणाऱ्या जनतेशीं सहकार्य करण्याचें धोरण कम्युनिस्टांनीं आंखलें पाहिजे' असा ह्या निर्णयाचा आशय होता. या निर्णयानुसार चीनमधील कम्युनिस्ट पक्षानें को-मिंग-टॅाग या चिनी राष्ट्रीय संस्थेबरोबर ऐक्याचें धोरण स्वीकारलें. इतकेंच नव्हे तर, राष्ट्रीय

स्वातंत्र्याच्या चळवळींत को–मिंग–टांगच्या निशाणाखालीं कम्युनिस्ट पार्टीच्या सभासदांनीं काम केलें पाहिजे असेंहि त्यांच्यावर बंधन घालण्यांत आलें.

**कम्युनिस्ट चळवळीस सुरुवात**

मूलभूत हक्क मिळविण्यासाठीं जनता झगडूं लागली, कीं लब्धप्रतिष्ठित व बड्या लोकांचें आसन डळमळूं लागतें. तरुणांना 'अत्याचारी', 'क्रांतिकारक' 'अव्यवहार्य', 'विध्वंसक' अशीं विशेषणें देण्यास सुरुवात होते. तशीच स्थिति या वेळीं चीनच्या राजकारणाची होती. डॉ. सन्-यत्-सेनसारख्या पुढाऱ्या-लाहि या बड्या ऐतखाबू धेंडांनीं 'कम्युनिस्ट' म्हणून नांवें ठेवण्यास कमी केलें नाहीं. कम्युनिस्ट व को-मिंग-टांग ही राष्ट्रीय सभा यांच्या-मध्यें ऐक्य झालेंच पाहिजे व जगांतील पिळल्या गेलेल्या जनतेचा रशिया हाच खरा मित्र आहे अशी डॉ. सन्-यत्-सेन यांची ठाम समजूत झालेली होती. जमीनदार, भांडलवाले, लष्करी अधिकारी, हे एकीकडे; मध्यम वर्गीय तरुण, हातावर पोट भरणारे कारागीर व लहान लहान दुकानदार, शेतकरीवर्ग व कामगार वर्ग एकीकडे; असे उघड उघड पक्षभेद को-मिंग-टांगमध्यें दिसण्यास सुरुवात झाली. कम्युनिस्टांबरोबर सहकार्य करण्यास चिनी बहुजन समाज या वेळीं तयार होता; परंतु कम्युनिस्टांचें प्रत्यक्ष पुढारीपण मानण्यास मात्र ते तयार नव्हते. चीनमधील कम्युनिस्टांनीं आपलें एकांतिक धोरण सोडून दिल्यामुळें चिनी राजकीय लढ्यांत इष्ट तो फरक घडून आला. अशा तऱ्हेचें अचूक धोरण ठरविण्यांत कॉ. रॉय यांचेच प्रयत्न मुख्यतः कारणीभूत झाले. कम्युनिस्ट इन्टरनॅशनल ही मध्यवर्ती संस्था स्थापन होण्यापूर्वीं कॉ. रॉय हे चीनमध्यें दोन-तीन वेळां जाऊन आल्यामुळें व डॉ. सेन यांच्याशीं त्यांचा दाट परिचय झाला असल्यामुळें कॉ. रॉय यांना चीनच्या परिस्थितीची चांगली कल्पना आलेली होती. कॉ. रॉय यांच्या बिनचूक धोरणामुळें चीनमध्यें एकीकडे कम्युनिस्ट पार्टी बळकट होत होती, तर दुसरीकडे राष्ट्रीय स्वातंत्र्याचा लढा लढणारी को-मिंग-टांग ही संस्था अधिक संघटित, लढाऊ व जहाल बनत चालली होती. याचा प्रत्यक्ष परिणाम कँटन येथें दिसून आला. चिनी भांडवल-

वाल्यांनीं जनतेच्या मागण्यांना विरोध दर्शविल्याबरोबर मध्यमवर्ग, शेतकरी व कामकरी यांच्या सहकार्यानें कँटन येथें लोकशाहीप्रधान अशा क्रांतिकारक स्वरूपाचें सरकार लोकांनीं स्थापन केलें. तें थोड्याच वेळांत इतकें बलाढ्य होऊं शकलें, कीं हाँगकाँगकडून ब्रिटिशांनीं केलेल्या हल्ल्यालाहि त्यांनीं जुमानलें नाहीं. स्वातंत्र्याकरितां बलिदान करण्याचा जनतेचा उत्साह सारखा वाढत होता. शेतकरीसंघ भराभर स्थापन होऊं लागले. कारखान्या-कारखान्यांतून कामगार संघटित होऊं लागले. कम्युनिस्ट पार्टीच्या सभासदांची संख्या साठ हजारांपर्यंत गेली. कम्युनिस्ट पार्टीच्या नेतृत्वाखालीं व देखरेखीखालीं काम करणाऱ्या तरुण संघांची संख्या वाढूं लागली. चीनमधील २० लक्ष संघटित कामगार कम्युनिस्टांचें नेतृत्व पतकरण्यास एका पायावर तयार होते. शेतकरी समाजाची संघटना वाढतां वाढतां, ७० लक्ष शेतकरी एका निशाणाखालीं एका आवाजानें, एका निश्चयानें लढण्यास तयार झाला ही कांहीं लहान सहान गोष्ट नव्हे. चिनी राष्ट्रीय लढ्याची भूमिका स्पष्ट समजावून घेऊन सर्वव्यापी असा अचूक कार्यक्रम आंखल्यामुळें चिनी जनतेंत एवढी तयारी करतां आली व याचें बहुतेक सर्व श्रेय कॉ. रॉय यांच्या बिनचूक धोरणाला आहे यांत शंका नाहीं.

**ट्रॉट्स्की, रॉय व बोरोडिन**

आतांपर्यंत चिनी इसम म्हणजे परकीयांना कःपदार्थ वाटत असे. आतां तोच चिनी इसम छाती पुढें काढून, पुढें पाऊल टाकीत टाकीत साम्राज्यशाहीशीं टक्कर देण्यास तयार झाला होता. अज्ञान, भीति व साशंकता यांच्याऐवजीं धैर्य, निश्चय व कर्तृत्व हे गुण चिनी जनतेंत दृग्गोचर होऊं लागले. को-भिंग-टांगच्या निशाणाखालीं राष्ट्रीय स्वातंत्र्यासाठीं लढत लढत; परंतु कम्युनिस्टांच्या तत्त्वज्ञानानें व संघटनाचातुर्यानें निर्भय व कुशल बनलेली अशी ही चिनी जनता दोन वर्षांच्या अल्पावधींत फारच पुढें गेली. चीनमधील कम्युनिस्ट पक्षाचीं सूत्रें कॉ. बोरोडिन यांच्या हातीं होतीं व आतां परिस्थिति अशी येऊन ठेपली, कीं कांहीं तरी निश्चित व निर्णायक असा कार्यक्रम आंखलाच पाहिजे होता. जहाल मतवाद्यांना आतां माघार घेतां येणें शक्य नव्हतें. आतांपर्यंत खांद्याला खांदा लावून आलेले जहालमतवादी चाचरूं लागले.

धोरणांत निश्चितता उरली नाहीं. पुढील घटका कशी उजाडेल याची धास्ती उत्पन्न झाली. महत्त्वाचा निर्णय घेण्यासाठीं म्हणून १९२६ च्या नोव्हेंबर महिन्यांत मॉस्कोला 'कम्युनिस्ट इंटरनॅशनल'च्या कार्यकारी मंडळाची सभा तातडीनें बोलावण्यांत आली. कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या मंडळांत कॉ. रॉय यांनीं स्वतः चीनसंबंधाचा महत्त्वाचा ठराव मांडला. सोव्हिएट सत्ता स्थापण्याची घोषणा करून को-मिंग-टांगशीं उघड उघड विरोध करण्याचें धोरण ट्रॉट्स्कीप्रभृति जहालांनीं पुढें मांडलें तर बोरोडिनसारख्या प्रसिद्ध कम्युनिस्ट पुढाऱ्याच्या नेतृत्वाखालीं चालणाऱ्या चीनमधील पक्षानें संपूर्ण शरणागतीचें धोरण स्वीकारलें. या प्रश्नावर वादविवाद होऊन, अखेरीस कॉ. रॉय यांच्याच ठरावाला मान्यता देण्यांत आली. देशांतील जमिनीवर राष्ट्राची मालकी प्रस्थापित करण्याचें धोरण त्या वेळीं कॉ. स्टॅलिन यांनाहि पसंत नव्हतें असें म्हणतात. दोन परस्परविरोधी अशा कार्यक्रमांपेक्षां परिस्थितीनुसार आपलें धोरण आंखणें हें अशा आणीबाणीच्या प्रसंगीं अत्यंत जरूर होतें. वूहण प्रांतांतील सत्ता जहाल व या वेळच्या जहाल मताच्या लोकांच्या हातांत होती. त्या सत्तेला कम्युनिस्टांचा पाठिंबा होता. सरकारला मदत करून त्यांच्या साहाय्यानें को-मिंग-टांगमधील प्रतिगामी पुढाऱ्यांना एकदांचें कायमचें हाकलून देण्याचें कम्युनिस्टांनीं धोरण ठेवावें असाच ठराव कम्युनिस्ट इंटरनॅशनलनें केला व हाच तो कॉ. रॉय यांचा महत्त्वाचा ठराव होय.

**रॉय यांचें चीनमध्यें गुप्तपणें आगमन**

१९२५ मध्यें डॉ. सन्-यत्-सेन यांच्या मृत्यूनंतर को-मिंग-टांगमध्यें मवाळ व स्वार्थी अशा पुढाऱ्यांची भरती होऊं लागली. त्यांचें निष्क्रिय धोरण जनतेला पसंत पडणें शक्य नव्हतें. शेतकरीक्रांतीची वेळ येऊन ठेपली होती. डॉ. सन्-यत्-सेन यांच्या मृत्यूनंतर चँग-कै-शेक या चिनी पुढाऱ्याच्या हातांत को-मिंग-टांगचीं सूत्रें जाऊं लागलीं व हळूहळू चँग-कै-शेक हाच प्रतिगामी गटाचा पुढारी बनूं लागला. चँग-कै-शेकच्या पुढारीपणाखालीं असलेला प्रतिगामी गट नष्ट करावयाचा असेल तर शेतकरीक्रांतीची घोषणा करून तें करतां येईल असें कॉ. रॉय यांचें मत होतें. चीनमधील कम्युनिस्ट पक्षाच्या धोरणांतील चलबिचल पाहून

रशियांतील कम्युनिस्ट पार्टीचे जनरल सेक्रेटरी कॉ. स्टॅलिन यांनीं स्वतः कॉ. रॉय यांना शक्य तितक्या लवकर चीनमध्यें जाण्यास सांगितलें व त्याप्रमाणें कम्युनिस्ट इंटरनॅशनलचे एकमेव प्रतिनिधि म्हणून रॉय यांनीं चीनला जाण्याची तयारी केली. रॉय यांच्या प्रयाणाची तयारी फारच गुप्तपणें झाली. विमानाच्या संरक्षणाखालीं एका स्वतंत्र जहाजांत कॉ. रॉय हे रशियन किनाऱ्यावरून निघाले. ही बातमी चीनमधील ब्रिटिश अधिकाऱ्यांना कशी लागली कोण जाणे ! पण ही बातमी चीनमध्यें पसरली खरी. समुद्रप्रवासांत अर्ध्या वाटेंतच रॉय यांना बिनतारी संदेशानें निरोप पोंचविण्यांत आला कीं, ठरल्याप्रमाणें चिनी बंदराच्या धक्क्याला बोट लावूं नका. हा संदेश मिळतांक्षणींच रॉय यांना दुसऱ्या बोटींत चढविण्याची व्यवस्था करण्यांत आली. ज्या जहाजानें रॉय चीनमध्यें येणार हें ब्रिटिश अधिकाऱ्यांना कळलें होतें तें जहाज ब्रिटिशांनीं तपासून पाहिलें परंतु रॉय हे केव्हांच त्यांतून फरारी झाले होते, असें त्यांच्या नजरेस आलें. कॉ. रॉय हे मात्र रात्रीं ठराविक वेळीं अचानक रीतीनें चीनमध्यें येऊन दाखल झाले.

**रॉय व बोरोडिन यांचा मतभेद**

चीनमधील कम्युनिस्ट पक्षाच्या धोरणाचीं सूत्रें मुख्यतः 'बोरोडिन' हेच हलवीत असत. चीनमधील कम्युनिस्ट पक्षाला कम्युनिस्ट इंटरनॅशनल या मध्यवर्ती संस्थेचें धोरण मान्य करणें भाग होतें. तथापि चीनमधील कम्युनिस्ट पक्षाच्या पुढाऱ्यांनीं मात्र तें धोरण अमलांत न आणण्याचाच जणूं काय निश्चय केला होता. याला बोरोडिन हे मुख्यत्वें करून कारणीभूत होते. जुन्या धोरणालाच चिकटून राहण्याचा बोरोडिन यांचा हट्ट असे. "राष्ट्रीय सैन्याचे अधिकारी हे जमीनदार वर्गांतून पुढें आलेले लोक आहेत, त्यांचा शेतकरीक्रांतीला पाठिंबा मिळणें तर शक्य नाहींच, परंतु जर आपण शेतकरी क्रांतीचें निशाण उभारलें तर राष्ट्रीय सरकारविरुद्ध सैनिक असा झगडा सुरू होण्याचा संभव आहे" अशा अर्थाची तार बोरोडिन यांनीं कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या कार्यकारी मंडळाला धाडली व माझा तुमच्या कार्यक्रमाला विरोध आहे असेंहि स्पष्ट रीतीनें बजाविण्यास त्यांनीं त्या वेळीं कमी केलें नाहीं. लष्करी अधिकारी व सैनिक

या दोघांमधील असलेला सामाजिक फरक बोरोडिनच्या लक्षांत आला नाहीं. सैनिक हे कोठून आले! ते कांहीं लष्करी अधिकाऱ्यांप्रमाणें समाजांतील वरिष्ठवर्गाचे आधारस्तंभ नव्हते. सैनिक हा शेतकरी समाजांतून आलेला. शेतकऱ्यांना शेतीची मालकी मिळाली तर साध्या सैनिकाला तें नको आहे असें थोडेंच आहे! उलट इंटरनॅशनलच्या धोरणाप्रमाणें राष्ट्रीय सैन्यांतील सैनिकांनीं शेतकरीक्रांतीला खात्रीनें पाठिंबा दिला असता. इतकेंच नव्हे तर सैनिकांना शेतकरीक्रांति हवीच होती. एकीकडे चीनमधील कम्युनिस्ट पार्टीचे धरसोडीचें धोरण तर दुसरीकडे को-मिंग-टांगमधील आपमतलबी पुढाऱ्यांचें साम्राज्य-शाहीशीं मैत्री संपादण्याचे चाललेले प्रयत्न या ओढाताणीमुळें राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्याऐवजीं क्रांतिविरोधी लोकांना मात्र चांगलेंच फावलें.

१९२७ मध्यें रॉय हे कँटन येथें आले. त्यांनीं एकंदर परिस्थितीचा आढावा घेतला. चँग-कै-शेकविरुद्ध चढाई करण्यास कम्युनिस्ट चाचरत होते हें रॉय यांच्या लक्षांत आलें. चँग-कै-शेक यांनीं जहाल कार्यकर्त्यांवर मोहीम काढण्यासाठीं कंबर कसली, चीनमधील क्रांतिविरोधी गटाबरोबर व परकीय साम्राज्यशाहीबरोबर चँग-कै-शेक हा मित्रत्वाची भाषा गुप्तपणें करीत होता. जपानी वकिलांच्या चँग-कै-शेकशीं गुप्त भेटी होऊं लागल्या. साम्राज्यशाही-बरोबर दोन हात करण्यासाठीं शांघायमधील कामगारवर्ग तयार करीत असतांना चँग-कै-शेकच्या हाताखालील सैनिक हात जोडून उभे राहिले. ‘को-मिंग-टांग’मधून कम्युनिस्टांची हकालपट्टी करणें येवढेंच ध्येय चँग-कै-शेकचें होतें. कम्युनिस्ट, कामगार व शेतकरी पक्ष यांना अगोदर हाकलून लावा, नाहीं तर तुमचें राष्ट्रीय सरकार आम्ही नष्ट करूं अशी वूहण प्रांतांतील सरकारला धमकी देण्यापर्यंत चँग-कै-शेकची मजल गेली. को-मिंग-टांग-मधील क्रांतिविरोधी गट, को-मिंग-टांगभोंवतालचें आपले पाश अधिक दृढ करीत होता. आणि अशाच आणीबाणीच्या वेळीं कम्युनिस्ट पार्टीचे पुढारी कॉ. बोरोडिन व कॉ. रॉय यांच्या धोरणांत फरक पडत चालला. चँग-कै-शेक यांच्या धोरणाला तोडीस तोड देणें जरूर होतें. चँग-कै-शेकच्या आत्मघातकी धोरणाचा पाडाव करावयाचा असेल तर चीनमधील शेतकरीक्रांतीच्या उठावाची तयारी करणें व को-मिंग- टांगमधील

संधिसाधु पुढाऱ्यांविरुद्ध बंड उभारणें हाच एक मार्ग होता. को-मिंग-टांगशीं विरोध पत्करून सुद्धां हें कार्य करावें असें स्पष्ट रीतीनें चिनी कम्युनिस्ट पक्षापुढें व क्रांतिकारक तरुणांपुढें कॉ. रॉय यांनीं आपलें धोरण ठेविलें.

**रॉय यांचा दुसरा प्रयत्न**

चीनमधील कम्युनिस्ट पक्ष या वेळीं अत्यंत बलवान् होता. चीनमधील राष्ट्रीय पक्षास सांगेल तें धोरण मान्य करावयास लावण्याची ताकद या वेळीं या पक्षांत होती. पण ' कोणत्याहि शेतकरीक्रांतीचा कार्यक्रम आंखणें म्हणजे को-मिंग-टांग या राष्ट्रीय संस्थेला विरोध करण्यासारखें आहे, कॉ. रॉय यांचें धोरण म्हणजे को-मिंग-टांगमधून फुटून निघण्याचें धोरण होय' असें रडगाणें कम्युनिस्ट पक्ष गात राहील. बोरोडिन व रॉय यांच्यामधील मतभेद तीव्र होत चालले. यांतून कांहीं तरी मार्ग काढण्यासाठीं कॉ. रॉय यांनीं मॉस्को येथें पत्रव्यवहार केला. दुर्दैवानें कॉ. रॉय यांना मॉस्कोहून निश्चित असें उत्तर आलें नाहीं. 'नरो वा कुंजरो वा' अशा स्वरूपाचें तें उत्तर होतें. बोरोडिन व रॉय या दोघांच्याहि म्हणण्यास त्या उत्तरांत मान्यता देण्यांत आली होती. एकाच वेळीं दोन परस्परविरोधी धोरणांनीं कार्य करणें कसें शक्य आहे हें मॉस्कोमधील पुढाऱ्यांना समजलें नाहीं, दुसरें काय ? कॉ. बोरोडिन हे शेतकरीक्रांतीला पाठिंबा देत नाहींत व कम्युनिस्ट पक्षाचीं सूत्रें तर त्यांच्या हातीं; हें पाहून कॉ. रॉय यांनीं दुसऱ्यांदा एक उपाय सुचविला. त्यांचें म्हणणें असें होतें, कीं को-मिंग-टांगला उद्देशून एक जाहीर पत्रक काढावें व त्यांत को-मिंग-टांगनें आतांपर्यंत कसकशा घोडचुका केल्या व को-मिंग-टांगच्या पुढाऱ्यांनीं क्रांतिविरोधी चळवळीला कशी मदत केली याचा पाढा त्या जाहीरनाम्यांत वाचावा व केवळ कम्युनिस्टांच्या पुढारीपणाखालीं येण्यासाठीं जनतेला हाक देऊन सार्वत्रिक क्रांतीचा उठाव करावा. असा एकच मार्ग सध्यां आपल्यास मोकळा आहे असें कॉ. रॉय यांनीं चीनमधील कम्युनिस्ट पक्षाला सांगितलें. केवळ जाहीरनामा काढून भागण्यासारखें नव्हतें, तर जनतेसमोर तसाच प्रत्यक्ष व्यावहारिक कार्यक्रम ठेवणें जरूर होतें.

**मतभेदामुळें रॉय यांचें रशियांत प्रयाण**

मार्शल ब्लूचर नांवानें जे सेनापति आज प्रख्यात आहेत त्यांचें मूळचें नांव मि. गॅलन असें असून, ते त्या वेळीं चीनमध्यें होते. कॉ. गॅलन हे मूळचे रशियांतील लोखंडी कारखान्यांत काम करणारे कामगार. चीनमधील राष्ट्रीय सैन्याची संघटना करणारे कॉ. गॅलन प्रमुख असून, लष्करी हालचालीं करण्यांत त्यांचें नांव अजरामर असें झालेलें आहे. अशा या जगप्रसिद्ध लष्करी सेनापतींनीं कॉ. रॉय यांच्या धोरणास पाठिंबा दिला. प्रत्यक्ष कम्युनिस्ट पक्षांतील-हि अनेक प्रसिद्ध पुढाऱ्यांनीं रॉय यांचें धोरण मान्य केलें. खुद्द रशियांतील राजकीय पुढाऱ्यांकडूनहि कॉ. रॉय यांच्या कार्यक्रमास संमति मिळाली. इतकें असून सुद्धां बोरोडिन हूं कां चूं करीना. सर्व सत्ता बोरोडिन यांचे हातीं. कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या सूचनांचा विचार करण्यासहि बोरोडिन व त्यांचें साथीदार तयार नव्हते. या सर्व अनिश्चित परिस्थितीचा फायदा मात्र क्रांतिविरोधी गटांना चांगला घेतां आला. कामगारसंघ, भाषणस्वातंत्र्य, संघस्वातंत्र्य, व लेखनस्वातंत्र्य यांवर एकदम धाड आली. संपाला नुसती सहानुभूति दाखविणें हें राष्ट्रीय सरकार सहन करीना. परकीय साम्राज्यवाद्यांप्रमाणें राष्ट्रीय सरकार चिनी जनतेला तिरस्कारानें वागवूं लागलें. इतकी चिनी जनतेच्या क्रांतिकारक चळवळीची वाताहत झाली. आपलें धोरण अमलांत आणलें जावें म्हणून रॉय यांनीं जिवाचें रान केलें. परंतु त्याचा कांहींहि उपयोग झाला नाहीं. बोरोडिन याच्या हातांत कम्युनिस्ट पक्षाचीं सर्व सूत्रें आणि पैशाची पिशवी; त्यामुळें रॉय यांना कितीहि पाठिंबा मिळत असला, तरीहि बोरोडिन याच्या विरोधामुळें रॉय यांचे विचार, कार्यक्रम व धोरण हीं निष्फळ ठरलीं. रॉय यांनीं आतां मात्र शेवटचा व निकराचा प्रयत्न करण्याचें ठरविलें. बोरोडिन हा आपलाच हेका चालवीत आहे व त्याला हलवितां येणें शक्य नाहीं हें पाहिल्यावर कॉ. रॉय यांनीं एकदां शेवटचा प्रयत्न म्हणून अशी एक तडजोड सुचविली, कीं 'रॉय, बोरोडिन व गॅलन' या तिघांनीं संयुक्त जबाबदारीवर चॅंग-कै-शेक यांच्याविरुद्ध मोहीम सुरू करावी म्हणजे धोरण, कार्यक्रम व कृति यांमध्यें एकसूत्रीपणा तरी राहील. चीनमध्यें होणाऱ्या कम्युनिस्टांच्या पीछेहाटीस पायबंद

बसेल. गॅलन हा तर चीनमधील प्रख्यात योद्धा व उत्कृष्ट संघटनाकुशल असा लष्करी सेनापति. राष्ट्रीय सरकारनें क्रांतिविरोधी धोरण स्वीकारलें त्याला अगोदरपासूनच विरोध करणें जरूर आहे असें गॅलनचें म्हणणें होतें व गॅलन यांचा रॉय यांना पूर्णपाठिंबा असे. अगदीं शेवटचा प्रयत्नहि सफल होण्याची आशा नाहीं व बोरोडिन हा कांहीं केल्या आपलें धोरण सोडण्यास तयार नाहीं असें दिसतां क्षणींच रॉय हे गॅलन यांच्याबरोबर रशियास परत जाण्यास निघाले.

इकडे चीनमध्यें असा प्रकार झाला, कीं क्रांतिकारक चळवळीचा बींमोड करण्याचा चँग-कै-शेक यांनीं विडा उचलला. एक वेळचा कम्युनिस्टांचा सहकारी चँग-कै-शेक हा परकीय साम्राज्यवाद्यांचा दोस्त बनून कम्युनिस्टांची कत्तल करण्याचा त्यानें सपाटा चालविला. को-मिंग-टांगमधील जहाल मतवादी सभासद, क्रांतिकारक कामगार व शेतकरी यांची सर्रास कत्तल करण्यांत आली. इतकेंच काय, पण केशकर्तन करणाऱ्या तरुण चिनी मुली या कम्युनिस्ट आहेत असें समजून त्यांनाहि यमसदनास पाठविण्यास चँग-कै-शेकनें मागेंपुढें पाहिलें नाहीं. चिनी क्रांतिकारक चळवळीचा शोचनीय असा हा पहिला भाग येथें संपला.

एकीकडे चिनी जनता शेतकरी-क्रांतीकरितां उत्सुक झाली असतां, अनिश्चित धोरणामुळें कम्युनिस्ट पक्षाला या क्रांतीचें पुढारीपण घेतां आलें नाहीं; तर तिकडे त्याच वेळीं चँग-कै-शेक हा परकीय सत्तेशीं संगनमत करून क्रांति-विरोधी चळवळीचा पाया मजबूत करीत होता. निश्चित धोरण आंखलें असतें तर चीनच्या इतिहासाचा रंग अजीबात पालटतां आला असतां; परंतु बोरोडिन याच्या अट्टाहासामुळें तसें झालें नाहीं ही दुर्दैवाची गोष्ट आहे. चीनमधील कम्युनिस्टांच्या चळवळीची जी वाताहत झाली, तिचा परिणाम जगाच्या कामगार-चळवळीवर झाला. विशेषतः साम्राज्यविरोधी चळवळीचें आगर बनलेल्या वसाहतींतील जनता दुःखी व कष्टी झाली. चिनी राष्ट्रीय सैन्याचे आधारस्तंभ गॅलन व इतर बरेच कम्युनिस्ट पुढारी यांच्या समवेत कॉ. रॉय हे १९२७ च्या सप्टेंबर महिन्यांत रशियांत परत आले.

**आजारीपणामुळें जर्मनींत रवानगी**

रशियांत परत आल्यावर, रॉय यांनीं प्रथम दोन गोष्टी केल्या. याच सुमारास हिंदी कम्युनिस्ट कार्यकर्त्यांचें एक मंडळ रशियांत आलें होतें. त्यांनीं हिंदी राजकीय प्रश्नांसंबंधीं बरीचशी माहिती गोळा करून, ती इंटरनॅशनलपुढें ठेवली. या बाबतींत अधिक चौकशी करण्याकरितां एक कमिशन नेमण्यांत येऊन, त्या कमिशनच्या शिफारशींच्या अनुरोधानें कॉ. रॉय यांना एक ठराव तयार करण्यास सांगण्यांत आलें. त्याप्रमाणें सदर ठराव करण्याचें पहिलें काम कॉ. रॉय यांनीं केलें. दुसरें काम म्हणजे रशियांत आल्याबरोबर चीनमधील हकीकतीसंबधानें समग्र माहिती देणारें पत्रक काढणें हें होय. कॉ. रॉय यांनीं लिहिलेलें हें चीनसंबंधाचें पत्रक कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या मध्यवर्ती मंडळानें रशियन भाषेंत प्रसिद्ध केलेलें आहे.

आतांपर्यंत चाललेल्या अनेकविध चळवळी, तुरुंगांतील हाल आणि विशेषतः चीनमध्यें पडलेल्या कामाचा ताण यांमुळें रॉय यांची प्रकृति फारच बिघडली. आजारानें त्यांस घेरलें व कानाच्या दुखण्यानें आणखी त्यांत भर पडली. मॉस्को येथें रॉय यांच्या कानावर शस्त्रक्रिया करण्यांत आली. तरी दुखणें बरें होण्याचें चिन्ह दिसेना, उलट आजार वाढतच चालला; म्हणून उपचारासाठीं कॉ. रॉय यांना विमानमार्गानें ताबडतोब जर्मनींत पोंचविण्यांत आलें.

## १४ सन १९२९ नंतर कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या धोरणांत बदल व त्याचे परिणाम

कॉ. रॉय हे आजारीपणामुळें जर्मनींत जाऊन राहिले होते, हें मागील प्रकरणांत आलेंच आहे. कानाचें दुखणें बरें होण्याचें लक्षण दिसेना. अखेरीस सुप्रसिद्ध जर्मन तज्ज्ञ प्रो. कोब्रॅक यांनीं कॉ. राय यांच्या कानावर दुसऱ्यांदा शस्त्रक्रिया केली आणि त्यामुळें त्यांना आराम वाटूं लागला. याच वेळीं सहाव्या जागतिक परिषदेला मॉस्को येथें सुरुवात झालेली होती. कॉ. रॉय यांना या परिषदेला हजर राहणें शक्यच नव्हतें. जगांतील सर्व देशांतील चळवळीचा आढावा घेऊन, त्यावरून पुढील धोरण ठरविण्यासाठीं, १९२८ सालची ही सहावी जागतिक परिषद भरविण्यांत आली होती. ही परिषद फारच महत्त्वाची ठरली. जगांतील निरनिराळ्या भागांतील प्रतिनिधि या वेळीं हजर होते. चीनमधील राष्ट्रीय स्वातंत्र्याचा लढा चालूच होता व कॉ. रॉय व गॅलन यांचा बोरोडिन यांच्याबरोबर झालेला मतभेद व त्या लढ्याची झालेली वाताहत ही ह्या परिषदेंत सर्व प्रतिनिधींच्या डोळ्यांसमोर होती. चीनमधील परिस्थितीनें सर्वांनाच एक प्रकारची खिन्नता आलेली होती व अशा परिस्थितींत या जगप्रसिद्ध जागतिक परिषदेस सुरुवात झाली. आज कित्येक वर्षें वसाहतींतील चळवळीसंबंधानें थर्ड इंटरनॅशनलनें कॉ. रॉय यांचीं मतें पूर्णपणें मान्य केलीं होतीं. १९२२ सालीं जें एक निश्चित धोरण आंखण्यांत आलें, त्यालाहि कॉ. रॉय हेच कारणीभूत होत. या परिषदेंत हिंदी प्रश्नावर चर्चा झाली. हिंदी प्रश्नांवर कॉ. रॉय यांनीं जे विचार प्रदर्शित केले त्याबद्दल या परिषदेंत बरीच टीका होऊन कॉ. रॉय ह्यांच्याविरुद्ध असलेल्या कांहीं आपमतलबी लोकांना रॉय यांचा सूड उगवण्याची चांगली संधि मिळाली. त्यांच्या गैरहजेरीचा फायदा घेऊन कांहीं जहाल म्हणविणाऱ्या कम्युनिस्टांनीं रॉय यांच्या लिखाणावर मवाळपणाचें

तर्कट रचलें. यांपैकीं कांहीं टीकाकार तर पुढें साम्राज्यशाहीचे हस्तक निघाले, ही गोष्ट वेगळी. कॉ. रॉय यांच्याविरुद्ध व्यूह रचण्यास रॉय यांच्या गैरहजेरीमुळें अधिकच चालना मिळाली. जागतिक परिषद भरण्याच्या अगोदर, कांहीं दिवसांपासून बऱ्याच हिंदी तरुणांनीं मॉस्कोला तळ ठोकला होता. रॉय यांच्या गुन्ह्यासंबंधीं पुरावा तयार करण्याचें काम त्यांनीं आपल्या शिरावर घेतलें होतें. पण मौज अशी कीं, या मंडळींनीं जो रिपोर्ट तयार केला होता त्या रिपोर्टाला आधारभूत अशी माहिती रॉय यांच्या India in Transition या पुस्तकांतूनच घेतलेली होती.

**रॉय-विरोधी कट**

हिंदुस्थानांत कामगार-क्रांति होण्यासारखी परिस्थिति असून, हिंदी कम्युनिस्टांच्या हातांत एकंदर क्रांतीचीं सूत्रेंहि होतीं; परंतु या क्रांतीला जर कोणी आडवें आलें असेल, तर ते कॉ. रॉय हे होत. 'रॉय यांना बाजूला काढा व क्रांतीचा रस्ता खुला करा' असा हिंदी परिस्थितीबद्दल या तरुणबहाद्दरांनीं रिपोर्ट केला. दुर्दैवानें कॉ. रॉय हे त्यांच्याविरुद्ध आणलेल्या आक्षेपांना उत्तर देण्यास तेथें नव्हतें. कानाच्या दुखण्यामुळें औषधोपचारासाठीं ते जर्मनींत गेलेले होते. इंग्लंडमधील पोलीसखात्याचे हस्तकहि या टीकाबहाद्दरांत पुढें निघाले ही गोष्ट निराळी. रॉय हे आजारी नसते तर या टीकेला त्यांनीं खात्रीनें उत्तर देऊन टीकाकारांचीं तोंडें बंद केलीं असतीं.

रॉय यांच्या मताबद्दल बरीच भवति न भवति होऊन शेवटीं त्यांचें म्हणणें आंतरराष्ट्रीय परिषदेंत अमान्य करण्यांत आलें. ब्रिटिश साम्राज्यशाही हिंदुस्थानांत हळूहळू साम्राज्यांतर्गत स्वराज्य देत जाणार असा रॉय यांचा अभिप्राय असल्याबद्दल कॉ. कुसनिन नांवाच्या एका प्रतिनिधीनें उघड उघड आरोप केला. रॉय हे साम्राज्यशाहीचे हस्तक आहेत ते हिंदी भांडवलवाल्यांचे दोस्त बनले आहेत, असे एक ना दोन—तोंडाला येतील ते आरोप कॉ. कुसनिन यांनीं कॉ. रॉय यांच्यावर केले. इकडे चीनमध्यें कम्युनिस्टांच्या झालेल्या पीछेहाटीमुळें आणि बोरोडिनशीं झालेल्या मतभेदामुळें, फंटाळून परत येण्याचा

कॉ. रॉय यांना आलेला प्रसंग, व दुसरीकडे हिंदी कामगार-क्रांतीचीं भडक रंगांत रंगविलेलीं चित्रें आणि रॉय यांना दूर सारा असा या तरुणांनीं रॉय-विरोधी काढलेला सूर या सर्व गोष्टींचा व्हावयाचा तोच परिणाम झाला.

आजपर्यंत वर्षानुवर्षे ज्यांच्या मताला व विचारांना लेनिनसारख्या पुढाऱ्यांनीं मान दिला व ज्यांचीं मतें आणि विचार हे या जागतिक परिषदेला मान्य झाले होते, त्या कॉ. रॉय यांच्या विचारसरणीला या सहाव्या जगप्रसिद्ध परिषदेंत कायमचा खो देण्यांत आला. रॉय यांच्या धोरणावर नापसंतीचा शिक्कामोर्तब करण्यांत आला. नवीन धोरणाप्रमाणें वसाहतीमधील कम्युनिस्ट चळवळींना अगदीं नवीन वळण देण्यांत आलें व त्याचे परिणाम काय झाले ते चीन व हिंदुस्थान या देशांतून आज आपण पाहत आहोंच.

**नवीन धोरणाचा प्रारंभ**

या सहाव्या जगप्रसिद्ध परिषदेंत कोणतें धोरण स्वीकारलें गेलें, याची थोडी कल्पना येण्यासाठीं दोन-चार उदाहरणें देणें गैरवाजवी होणार नाहीं. हिंदी राष्ट्रीय सभा ही भांडवलवाल्यांची वर्गसंस्था असल्यामुळें ती क्रांति-विरोधी आहे; तेव्हां कॉंग्रेसमध्यें कम्युनिस्टांनीं न राहतां, हिंदी कम्युनिस्टांनीं आपली स्वतंत्र साम्राज्यविरोधी संस्था उत्पन्न करावी, कामगारसंघांतूनहि कम्युनिस्टांनीं अंग काढून घेऊन, कम्युनिस्टांच्या नेतृत्वाखालीं चाललेले स्वतंत्र कामगारसंघ स्थापन करावेत अशा तऱ्हेचा उपदेश हिंदी कम्युनिस्टांना देण्यांत आला. त्याचा परिणाम म्हणजे बहुजनसमाजापासून कम्युनिस्ट फटकून निघाले व साम्राज्यशाही-विरोधी लढ्यास कमकुवतपणा आला.

१९२९ च्या मार्च महिन्यांत हिंदुस्थानांतील सुप्रसिद्ध असा मीरत कटाचा खटला सुरू झाला व त्यांत बरेचसे कम्युनिस्ट पुढारी अडकले गेले. मागें राहिलेल्या कम्युनिस्टांनीं कॉंग्रेस-विरुद्ध प्रचार करण्यास सुरुवात केली. जागतिक परिषदेनें आंखून दिलेल्या धोरणाचा हा परिणाम होता. कॉंग्रेस ही क्रांतिविरोधी संस्था आहे, हें मत त्या वेळीं मोठ्या आवेशानें जनतेपुढें मांडलें जाई. पं. जवाहरलाल नेहरू यांनीं याच सुमारास 'इंडिपेन्डन्स ऑफ इंडिया लीग' ही संस्था स्थापन केली होती. एकीकडे या संस्थेला विरोध चालू होता'

तर दुसरीकडे जहाल क्रांति-वादी तरुणांना काँग्रेसविरुद्ध प्रचार करण्याबद्दल पद्धतशीर शिक्षण देण्याचें काम चालू होतें. गोलमेज परिषद व सायमन कमिशन यांच्या निषेधार्थ हिंदी लोकांना 'सोव्हिएट' स्थापन करण्याचा आदेश कम्युनिस्टांनीं दिला. १९२८ सालचा मुंबई गिरणी-कामगारांचा प्रचंड संप संपतो न संपतो तोच, पुन्हा १९२९ मध्यें मुंबई गिरणी-कामगारांना संपावर आणण्यांत आलें, व दुर्दैवानें मुंबईची अत्यंत बलाढ्य अशी कामगार-संघटना कायमची मोडून गेली. रोजच्या आर्थिक मागण्या मागण्याकरितां संप करणारे कामगार हे सामाजिक क्रांतीचे सैनिक होत, अशी भ्रामक कल्पना त्या वेळीं हिंदी कम्युनिस्टांनीं करून घेतली.

## परदेशांतील चळवळींवर झालेला परिणाम

इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी या देशांतहि हीच परिस्थिति होती. केवळ अंधानुकरण करावयाचें म्हणून करावयाचें इतकेंच. तेथेंहि कामगारसंघांत फूट पाडून आपल्या नेतृत्वाखालीं चालणारे स्वतंत्र क्रांतिकारक कामगार-संघ स्थापन करण्यास सुरुवात झाली. पण याचा परिणाम काय झाला? युरोपांतील कामगार आजपर्यंतच्या पुढाऱ्यांचें जोखड फेकून देण्यास तयारच नव्हते. कामगारांचा विश्वास संपादन करण्याचें काम स्वतंत्र कामगारसंघ स्थापन करून होण्यासारखें नव्हतें, हें या आमच्या कम्युनिस्टांच्या लक्षांत आलें नाहीं. कामगार-संघाच्या बाहेर राहिल्यामुळें स्थानिक संस्था व विधिमंडळें यांतून फारच थोडे कम्युनिस्ट निवडून येऊं शकले. जगांतलि निरनिराळ्या राष्ट्रांतून कम्युनिस्ट सभासदांच्या संख्येला सारखी ओहोटी लागली. सहाव्या परिषदेंत आंखलेल्या नवीन धोरणाला पूर्वीच्या नांवाजलेल्या कम्युनिस्टांचा विरोध होता.

हें नवीन धोरण आत्मघातकी आहे, यानें आपण कोणत्याहि देशांत यशस्वी रीतीनें सामाजिक क्रांति घडवून आणूं शकणार नाहीं अशी शहाणपणाची सूचना प्रत्यक्ष लेनिनच्यां कांहीं सहकाऱ्यांनींहि दिली. परंतु त्याचा कांहीं परिणाम होईल असें चिन्ह दिसेना व कितीहि प्रयत्न केले तरी, नवीन आंखलेल्या धोरणांत फरक होण्याचें चिन्ह दिसेना. अखेरीस या मतभेदाचें पर्यवसान विरोधांत झालें व विरोधाचा परिणाम म्हणजे

पक्षविन्मुखता. साहजिकच कित्येक कम्युनिस्ट पुढाऱ्यांनीं कम्युनिस्ट ऑपोझिशन म्हणून स्वतंत्र रीतीनें संघटना करून नवीन धोरण आखण्याचें ठरविलें.

कॉ. रॉय हे या वेळीं जर्मनींत होते. त्यांनीं पाठविलेल्या प्रबंधांतील कार्यक्रम व धोरण सहाव्या जागतिक परिषदेला मान्य न झाल्याकारणानें तिसऱ्या इंटरनॅशनलच्या कार्यकारी मंडळावर त्यांची फेरनिवडणूक झाली नाहीं. थर्ड इंटरनॅशनलच्या स्थापनेपासून आतांपर्यंत म्हणजे ९ वर्षें, कॉ. रॉय यांनीं या जागतिक संस्थेच्या कार्यकारी मंडळावरील एक मानाची जागा विभूषित केलेली होती.

रॉय हे सच्चे कम्युनिस्ट असल्यामुळें त्यांनीं जवळ जवळ एक वर्ष या नवीन धोरणाविरुद्ध ब्रहि उच्चारला नाहीं. कल्पना अशी, कीं अनुभवानें हे लोक शहाणे होतील व मग डोळे उघडल्यावर तरी मार्क्स-लेनिनच्या खऱ्या व्यावहारिक डावपेचांचें मर्म ओळखून मग पूर्वपदावर येतील; परंतु तसें कांहींच चिन्ह दिसेना. नवीन चुकीचें धोरण सोडून देण्यास लावणें म्हणजे दगडाला पाझर फोडण्याइतकें अशक्य आहे, असें लवकरच सर्वांच्या नजरेस आलें. जर्मनींतील कम्युनिस्ट पक्षांतहि नवीन धोरणामुळें मोठी उलथापालथ झाली. युरोपांतील कोणत्याहि राजकीय पक्षापेक्षा जर्मनींतील कम्युनिस्ट पक्ष फारच सुसंघटित व कर्तृत्ववान् असा होता. कामगारवर्गावर त्या पक्षाइतका दुसऱ्या कोणाचाच ताबा नव्हता. असें असतांना सुद्धां या नवीन धोरणामुळें सर्वच गाडें बदललें.

आत्यंतिक जहाल अशा नवीन धोरणाला अनुसरून, १ मे १९२९ रोजीं बर्लिनमधील कामगारांना उद्देशून, सार्वत्रिक बंडाची घोषणा करण्यांत आली. बर्लिन शहरांतील स्ट्रासा या कामगारवस्तीच्या भागांतून कांहीं थोडे लोक या घोषणेबरोबर सशस्त्र बाहेर पडले. परिणाम असा झाला, कीं पोलिसांनीं गोळीबार करून चाळीस कामगारांना यमसदनास पाठविलें. वास्तविक या प्रकारानंतर कामगारक्रांतीची घोषणा करणाऱ्या पक्षाला किती तरी पाठिंबा मिळावयास पाहिजे होता, पण तें बाजूलाच राहिलें. दुसऱ्या दिवशीं या चाळीस शूर कामगारांची प्रेतयात्रा निघाली व जेव्हां ही प्रेतयात्रा कामगारवस्तींतून जाऊं लागली त्या वेळीं, लाखों लोकांनीं या वीरांचें दर्शन घ्यावयास

पुढें यावयास पाहिजे होतें; पण तसें न होतां कांहीं थोड्याशा कामगारांखेरीज सर्व कामगारवर्गानें त्या प्रेतयात्रेंत भागहि घेतला नाहीं. यावरून एक गोष्ट मात्र सिद्ध झाली ती ही कीं, नवीन धोरण व्यावहारिक व वस्तुस्थितीचा अभ्यास करून आंखलेलें नव्हतें, तर तो भ्रामक कल्पनेंत भराऱ्या मारणाऱ्या कांहीं फाजील जहाल अशा लोकांच्या कल्पनेचा खेळ होता.

**वसाहतींतील चळवळीवर झालेले परिणाम**

जेथें अत्यंत बलाढ्य असा कम्युनिस्ट पक्ष आहे तेथें, म्हणजे खुद्द जर्मनींत, अशा रीतीनें कामगारक्रांतीची वाताहत झाली; तर चीनमध्यें त्याहूनहि वाईट अशी परिस्थिति झाली. स्वतंत्र कामगारसंघ स्थापन करावेत अशा तऱ्हेचा उपदेश हिंदी कम्युनिस्टांना या वेळीं देण्यांत आला. चीनमध्येंहि 'सोव्हिएट' सत्ता स्थापन करण्याचें आत्यंतिक असें धोरण आंखण्यांत येऊन, त्याकरितां सशस्त्र बंडाची उठावणी करण्याचा आदेश देण्यांत आला. या धोरणाचा चीनच्या राजकारणावर परिणाम झाला व चँग-कै-शेक यांनीं राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या नांवाखालीं कम्युनिस्टांचा धुव्वा उडविला व अनन्वित अत्याचार करून चिनी साम्राज्यविरोधी लढ्याची कायमची खच्ची केली. चीन व हिंदुस्थान वसाहतींतून आखण्यांत आलेलें धोरण हें परिस्थिति पाहून ठरविण्यांत आलें नव्हतें हें मात्र इतिहासावरून आतां सिद्ध झालेलें आहे.

**कामगारक्रांति युरोपांत फसण्याचीं कारणें : रॉय यांचें मत**

या ६ व्या आंतरराष्ट्रीय परिषदेपर्यंत प्रत्येक राष्ट्रांतील परिस्थितीचा पूर्ण अभ्यास करून; व त्या ठिकाणच्या सामाजिक अवस्थेचा विचार करूनच मग पाऊल पुढें टाकण्याचें हें धोरण कम्युनिस्टांनीं अमलांत आणलें होतें. रशियांतील कामगारक्रांतीनें जगांतील दलित जनतेला नवजीवन प्राप्त झालें होतें व महायुद्धानें आर्थिक अरिष्टांत सांपडलेल्या युरोपियन राष्ट्रांतून असंतोषाचा वारा जोरानें वाहत होता. रशियन राज्यक्रांतीनें काय काय सामाजिक स्थित्यंतर झालें व युरोपियन राष्ट्रांत कम्युनिस्ट क्रांति होत नाहीं असें दिसून आल्यावर, त्याचाहि उलट परिणाम रशियावर काय झाला याचें वर्णन कॉ. रॉय यांनीं आपल्या एका लेखांत सुंदर रीतीनें केलें असल्यामुळें त्या लेखाचा कांहीं भाग देण्याचा मोह अनावर होणें साहजिक आहे.

कॉ. रॉय म्हणतातः—“रशियन क्रांतीनंतर युरोपांतील निरनिराळ्या देशांतूनहि कामगारक्रांति होईल अशी शंभर टक्के आशा उत्पन्न झाली होती. दुसऱ्याच वर्षी जर्मनींतील अनियंत्रित राजसत्ता ढासळून पडली, तर ऑस्ट्रियांतहि राजसत्तेचे तुकडे तुकडे उडाले. हंगेरीमध्यें तर प्रत्यक्ष कामगारक्रांतीचें रणशिंग फुंकलें गेलें. इतकें सगळें झालें, परंतु क्रांति यशस्वी होऊन कामगार-सत्ता स्थापन होण्याचें चिन्ह कोठेंच दिसेना. जर्मनीमध्यें प्रजासत्ताक राज्यपद्धति स्थापन करण्यापलीकडे या क्रांतीची मजल गेली नाहीं. राजसत्ता गेली खरी, परंतु लगेच भांडवलशाहीनें सैनिकांच्या मदतीनें सरकारी राज्ययंत्र कसें तरी चालूं ठेवलेंच होतें. रशियानें जर्मनीबरोबर ‘ब्रेस्टलिटोव्हस्क’ येथें तह घडवून आणल्यामुळें रशियन कामगारक्रांतीच्या पदरांत यशाचें माप पडलें. पण त्याचबरोबर जर्मनींतील कामगारक्रांतीलाहि थोडाबहुत धक्का बसला; नाहीं असें नाहीं. हा तह हें दुय्यम असें कारण मिळालें खरें. कारण म्हणजे जर्मनींतील भांडवलवाल्यांनीं ‘सोशल डेमोक्रॅट्स’ व जमीनदारवर्ग यांच्या सहकार्यानें डळमळीत असलेला राज्ययंत्राचा डोलारा सावरून धरण्याची पराकाष्ठा केली व हें करण्यास त्यांना वरील तहानें चांगली संधि मिळाली. युरोपांतील इतर कोणत्याहि देशापेक्षां जर्मनीमध्यें कामगारांच्या सत्तेला अनुकूल अशी परिस्थिति होती. ध्येय व धोरण निश्चित असलेला असा कामगारांचा क्रांतिकारक पक्ष जर्मनींत नव्हता असेंहि नाहीं. सोशल डेमोक्रॅट पक्षांतहि स्पार्टाकस म्हणून जहाल मतवादी होतेच व ते रशियन बोल्शेव्हिक लोकांपेक्षां रेसभरहि कमी नव्हते. जर्मनींत ‘लेनिन’सारखा पुढारी नव्हता हें म्हणणें मार्क्सिस्ट म्हणवणाऱ्या लोकांना तरी शोभत नाहीं; कारण सामाजिक क्रांतीहि थोर पुरुषांमुळेंच होते. असें खरा मार्क्सिस्ट मानीत नाहीं व तें मत इतिहासाला धरूनहि नाहीं. योग्य परिस्थिति असती तर लेनिनचें काम जर्मनींत रोझा लक्झेंबर्ग यांनीं करून दाखविलें असतें, कोणी सांगावें! हंगेरींतील क्रांति फसली याचें खरें कारण योग्य नेता नव्हता हें नव्हे, तर परकीय सैन्याच्या आक्रमणामुळें व हंगेरींतील शेतकरी समाजाचा क्रांतीला सक्रिय पाठिंबा नसल्यामुळें हंगेरींत अपयश आलें. बव्हेरियांतहि तीच गत झाली व अशा रीतीनें जगक्रांतीचा डाव त्या वेळीं हुकला तो हुकला.

" जर्मनीमध्यें मात्र कामगारक्रांतीला अनुकूल अशी परिस्थिति होती. महा-युद्धांतील पराभवामुळें जर्मनीची आर्थिक घडी पूर्णपणें विस्काळित झाली होती. कामगारवर्ग हवालदिल होऊन गेला होता. त्याचप्रमाणें जर्मनींतील शेतकरी-वर्गालाहि आर्थिक पेचामुळें नक्को नक्कोसें झालें होतें; परंतु जर्मन सैनिक मात्र कोणतीच हालचाल करण्याचें चिन्ह दिसेना. जर्मन क्रांतीमधील ही उणीव कशानें भरून काढावी हा महत्त्वाचा प्रश्न होता. रशियांत कामगारक्रांति यशस्वी झाली होती. या यशस्वी क्रांतीमुळें रशियांत फार मोठा लढाऊ काम-गारवर्ग निर्माण झाला असल्याकारणानें, त्या वर्गाच्या मदतीनें जर्मनीमधील उणीव भरून काढली पाहिजे, अशी कल्पना मनांत येणें साहजिक होतें व ही शक्यता इंग्लंडसारख्या साम्राज्यवादी राष्ट्रांना तेव्हांच दिसली. रशियन क्रांती-मुळें दोस्तराष्ट्रांचें धाबें दणाणून गेलें होतेंच. त्यांनींहि ही संधि बरी आहे असें पाहून रशियावर आक्रमण करण्याचा बेत केला व एकंदर ११ राष्ट्रांनीं एकजुटीनें रशियावर स्वारी केली.

१९२० च्या सुमारास रशियन कामगार-सत्तेची परिस्थिति फारच बिकट झाली असल्याकारणानें व त्याच सुमारास वार्साजवळ रशियन लाल सैन्याचा पराभव झाल्यामुळें, रशियन कामगारक्रांतीला अगदीं नवीनच वळण मिळालें; व जागतिक क्रांतीच्या प्रवाहाला तेथेंच विराम देणें रशियन मुत्सद्द्यांना भाग पडलें. रशियानें आपल्यापुरतें पाहावें, जगक्रांतीकडे लक्ष देण्याची ही वेळ नाहीं हा अनुभव त्या वेळीं आला. इतर देशांतून कामगार-क्रांति होऊं शकत नाहीं. बाहेरून कितीहि मदत मिळाली तरी देशांतील अंतर्गत सामाजिक परिस्थिति पूर्णपणें अनुकूल असल्याशिवाय, बाहेरील मदतीचा फारसा उपयोग होत नाहीं, हा धडा क्रांतिकारांना मिळाला. महायुद्धानंतर रशियनक्रांति यशस्वी झाली असतांना व युरोपांतील कामगार-क्रांतीची कल्पना जागच्या जागीं विरून गेली असतांना, युरोपांतील राष्ट्रांत कामगारक्रांति होत नाहीं, हें दिसून आल्या-वर त्याचा जर कोणी असा अर्थ करील, कीं युरोपांत अद्यापहि भांडवलशाही समाजरचनेला वाव होता, तर तसेंहि म्हणणें चुकीचें आहे. युरोपांतील प्रत्येक देशांतून भांडवलशाही समाजरचना थोड्याफार प्रमाणांत मोडकळीस आलेली होतीच व नवीन समाजपद्धतीचा आराखडा कामगारवर्गापुढें तयार होता;

परंतु कोणत्याहि समाजपद्धतीचा प्राण जें राज्ययंत्र तें खिळखिळें होणें व त्या जागीं नवीन राज्ययंत्राची स्थापना करण्याची ताकद नवीन समाजघटकांच्या अंगीं असणें या गोष्टी मात्र युरोपांत त्या वेळीं नव्हत्या. व महायुद्धानंतर कांहीं काल जरी जुनें राज्ययंत्र मोडकळीस आलेलें दिसत होतें, तरी भांडवलशाहीच्या हस्तकांनीं हा डळमळणारा राज्ययंत्राचा डोलारा, या नाहीं त्या उपायानें, सावरून धरण्याची पराकाष्ठा केली. कामगारक्रांतीची भीति वाटून विस्कळित झालेलीं राष्ट्रें ताबडतोब पुन्हा एके ठिकाणीं जमूं लागलीं, व ज्यांच्या साहाय्यामुळें राज्ययंत्र मोडकळीस आलेलें होतें त्यांच्याच मदतीनें जर्मनी व ऑस्ट्रिया हे एका ठिकाणीं येऊन त्यांनीं जर्मनींतील कामगारवर्गाचें पेकाट मोडून टाकलें."

**लेनिनचें नवीन धोरण**

"अशा रीतीनें युरोपांतील प्रमुख अशा राष्ट्रांतून राज्यक्रांति होण्याची आशा पूर्णपणें नष्ट झाल्यावर रशियांतील अंतर्व्यवस्थेचें पुढील धोरणहि ठरल्यासारखेंच झालें. थोर माणसें इतिहास बनवितात हें खरें; परंतु ते नवीन इतिहास बनवीत नाहींत, तर असलेल्या साधनांचा उपयोग करून ते फक्त इतिहासाला नवीन वळण देतात. युरोपियन परिस्थितीचा परिणाम रशियन क्रांतीवरहि झाला, व याची जाणीव लेनिन यांना १९२१ सालींच झाली होती हें उघड दिसतें. कारण ज्याला रशियांतील नवीन आर्थिक योजना म्हणतात व जिच्याबद्दल लेनिन यांना पुन्हा भांडवडशाही पद्धतीकडे येणारा कामगार-क्रांतिकारक असें उपहासानें म्हणण्यांत येतें, ती केवळ आर्थिक पुनर्घटना नसून ती योजना म्हणजे आंतरराष्ट्रीय चळवळीला दिलेलें नवीन वळण होतें. ती रशियापुरती आर्थिक स्वरूपाची योजना नसून, तें कम्युनिस्ट पक्षाचें राजकीय धोरण होतें. अंतिम ध्येयाच्या पूर्तीसाठीं सर्व वर्गांची एकजूट असणें आवश्यक आहे असें आतांपर्यंत थर्ड इंटरनॅशनलचें धोरण होतें. रशियांत क्रांति झाल्याबरोबर तेथें समाजसत्तावाद स्थापन झाला, ही समजूत करून घेणें वेडेपणाचें आहे. समाजसत्तावादाच्या स्थापनेसाठीं, रशियांतील कामगारवर्गांच्या पुढारीपणाखालीं, दलित जनतेनें राज्ययंत्र हस्तगत केलें होतें इतकेंच; व हळूहळू निरनिराळ्या समाजघटकांना समाज-

सत्तावादाच्या कार्याला जुंपणें, व त्या घटनेंत त्यांना समाविष्ट करणें हा या नवीन आर्थिक योजनेचा उद्देश होता."

लेनिनच्या आर्थिक धोरणाचा वरीलप्रमाणें कॉ. रॉय यांनीं व्यापक अर्थ केलेला आहे. लेनिन यांनीं नवीन आर्थिक धोरण स्वीकारून जो आंतरराष्ट्रीय धोरणांत बदल केला, तो बदल व तें नवीन धोरण १९२१ ते १९२८ पर्यंत थर्ड इंटरनॅशनलचें अधिकृत धोरण असें समजण्यांत येत होतें. प्रजासत्ताक राज्यपद्धति स्थापन करण्यासाठीं कामगारवर्गाचा विश्वास संपादन करणें हें त्या वेळेपासून कम्युनिस्ट वर्गाचें धोरण होतें, व त्याकरितां मवाळ गटाच्या दडपणाखालीं असलेल्या कामगारसंघांमधून कम्युनिस्टांनीं काम करूनच तें साधतां येणें शक्य होतें एरव्हीं नाहीं. १९२१ ते २८ पर्यंत आंखलेल्या व्यापक अशा धोरणानें कामगारवर्गांतील अगदीं खालच्या थरापर्यंत कम्युनिस्टांचा हात पोंहोचला; व त्याच वर्गावर त्याच्या राजकीय मतांचा चांगला पगडा बसूं लागला. फॅक्टरी कमिटी, स्थानिक संस्था, विधिमंडळें यांतूनहि अधिकाधिक कम्युनिस्ट पुढारी निवडून येऊं लागले. १९२१ ते १९२८ च्या काळांत कम्युनिस्ट पक्षाच्या सभासदांची संख्या निरनिराळ्या राष्ट्रांतून अतोनात वाढली होती.

इतकें सर्व डोळ्यांसमोर दिसत असतांना १९२८ सालीं भरलेल्या ६ व्या जागतिक परिषदेंत नवीनच धोरण आंखलें गेलें. सुधारणावादी पुढाऱ्यांच्या नेतृत्वाखालीं असलेल्या कामगारसंघांत काम न करतां केवळ कम्युनिस्ट पुढाऱ्यांच्या नेतृत्वाखालीं चालणाऱ्या स्वतंत्र कामगार-संस्था चोहोंकडे स्थापन करण्यांत आल्या, व लोकशाही तत्त्वाचा पुरस्कार करणाऱ्या राजकीय पक्षाविरुद्ध उघड उघड हल्ले करण्यांत येऊं लागले. अशा रीतीनें १९२८ सालापासून कम्युनिस्टांनीं आपलें धोरण अजीबात बदललें व सगळ्या देशांतील कम्युनिस्टांच्या चळवळीला अगदीं नवीन असें वळण लागलें.

---

## १५ इंटरनॅशनलशीं मतभेद : स्वमतसमर्थन

कॉ. रॉय यांच्या गैरहजेरीचा फायदा त्यांच्या शत्रूंनीं कसा घेतला व त्यांना थर्ड इंटरनॅशनलमधून काढून टाकण्याचे कसकसे प्रयत्न झाले, याची हकीकत मागील प्रकरणांत सविस्तर रीतीनें आलेलीच आहे. आजारी असतांना सुद्धां कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या कार्यकारी मंडळापुढें हिंदी प्रश्नाबाबत त्यांनीं आपलें मत स्पष्ट रीतीनें व विस्तारानें सादर केलें. रॉय यांनीं आपल्या संबंधांत टीकाकारांना सणसणीत उत्तरें तर दिलींच; पण त्याचबरोबर आपल्या विरुद्ध आणलेल्या आक्षेपांचा पोकळपणाहि त्यांनीं सिद्ध करून दाखविला. "भांडवलशाही समाजपद्धति मोडकळीस आली असतांना, साम्राज्यवादी राष्ट्रांचें वसाहतींतील धोरण पूर्वीप्रमाणें राहणें शक्य नाहीं, त्यांत बद्दल होणें अपरिहार्य आहे" असें आपलें स्पष्ट मत त्यांनीं त्या प्रबंधांत निःसंदिग्ध रीतीनें पुढें मांडलें. केवळ वसाहतींमधील धोरणासंबंधींच रॉय यांनीं आपलें मत मांडलें असें नव्हे, तर जगांतील एकंदर कामगार-चळवळीविषयीं त्यांनीं व्यापकपणें विचार केलेला होता. आपल्या डोळ्यांदेखत, जगांतील कामगार-चळवळींचा नायनाट होण्याचा प्रसंग, केवळ चुकीच्या धोरणामुळें येत आहे हें नुसतें पाहत बसणें, कोणत्याहि सच्चा क्रांतिकारकाला योग्य वाटणार नाहीं. आपलें मत, धोरण व कार्यक्रम हे बोलून न दाखविणें म्हणजे कामगार-चळवळीला खच्ची करण्याचें पातक केल्यासारखें होईल याची जाणीव रॉय यांच्या मनाला सारखी टोंचीत होती. शेवटीं रॉय यांनीं आपलीं मतें जगजाहीर करण्याचा निश्चय केला व प्रत्यक्ष चळवळीचा मार्ग आंखला. 'कम्युनिस्ट इंटरनॅशनलवरील संकट' या विषयावर जर्मनींतील कांहीं पत्रांतून त्यांनीं टीकात्मक लेख व निबंध लिहिण्यास सुरुवात केली. थर्ड इंटरनॅशनलमधील या आणीबाणीच्या परिस्थितीला काय काय कारणें झालीं व याला जबाबदार कोण याबद्दलची सांगोपांग चर्चा त्यांनीं या लेखांतून केलेली आहे. जर्मनी-

तील जहाल कम्युनिस्टांनीं १ मे रोजीं कामगारांना सशस्त्र क्रांतीची उठावणी दिली त्याचाहि खरपूस समाचार कॉ. रॉय यांनीं या लेखांतून घेतला.

झालें! वर्तमानपत्रांतून टीकात्मक लेख लिहिल्याचें पातक रॉय यांच्या माथीं लादलें गेलें! आपल्या पक्षाच्या पत्रांतून न लिहितां कम्युनिस्ट मताच्या पण विरोधी मत असणाऱ्या वर्तमानपत्रांतून लेख लिहिण्याचा अक्षम्य असा गुन्हा रॉय यांच्या हातून घडला व त्याचें प्रायश्चित्त म्हणून १९२९ च्या सप्टेंबर महिन्यांत कम्युनिस्ट इंटरनॅशनल या संस्थेमधून रॉय यांची हकाल-पट्टी करण्यांत आली. या संस्थेमधून कॉ. रॉय यांना कां काढून टाकण्यांत आलें, त्याचीं कारणें मात्र अद्यापपर्यंत देण्यांत आलीं नाहींत हें एक मोठें गूढ आहे. केवळ विरोधी धोरण असलेल्या पत्रांतून लेख लिहिले येवढाच मोघम आक्षेप त्यांच्याविरुद्ध घेण्यांत येतो. असो. रॉय यांच्या पराक्रमी व प्रभावशाली अशा जीवनक्रमाची पहिली मजल येथपर्यंत तर येऊन थडकली.

**रॉय यांचें स्वमतसमर्थन**

रॉय यांना थर्ड इंटरनॅशनलमधून काढून टाकण्यांत आल्यावर, आपल्याला कोणत्या कारणाकरितां काढून टाकण्यांत आलें; आपले कोणत्या मुद्दयावर मतभेद झाले व आपलें खरें म्हणणें काय आहे, यासंबंधीं विस्तृत अशी कैफियत त्यांनीं थर्ड इंटरनॅशनलच्या कार्यकारी मंडळाकडे पाठविली. तो लेख महत्त्वाचा असल्यामुळें व कॉ. रॉय यांचे विचार स्वतःच्याच लेखणींतून उतरले असल्यामुळें, त्या लेखांतील महत्त्वाच्या भागाचें भाषांतर मुद्दाम खालीं देत आहों.

“ कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या कार्यकारी मंडळावर माझी निवड झाली नाहीं तेव्हांपासून मी अगदीं निश्चिंत असा स्वस्थ बसून होतों. माझें कांहीं बरेंवाईट होईल ही भीति माझ्या मनाला शिवलीदेखील नाहीं. परंतु कामगारक्रांतीच्या चळवळीचीं सूत्रें दुर्दैवानें ज्या बेजबाबदार पुढाऱ्यांच्या हातीं गेलेलीं आहेत व ज्यांच्या मार्गदर्शकत्वाखालीं या चळवळीचा अजीबात नायनाट होण्याची वेळ येऊन ठेपली आहे, त्या लोकांच्या कर्तृत्वशून्यतेनें मात्र माझ्या मनाला चांगलाच धक्का बसला आहे. होणारी गोष्ट शेवटीं व्हावयाचीच. तेथें ब्रह्मदेव आडवा आला तरी त्याचा काय परिणाम होणार! कॉ. कुसनिन

यांनीं मोठा सभ्यपणाचा आव आणून माझ्याविरुद्ध डाव रचण्यास सुरुवात केली होती व कसेंहि करून माझी थर्ड इंटरनॅशनलमधून हकालपट्टी झालीच पाहिजे, अशी स्थिति (भूमिका) पूर्वींपासून तयार करण्यांत येत होती. माझा गुन्हा केवढा भयंकर! कामगारक्रांतीचा जणू काय मीं घातच केला होता. ज्यांच्या बेजबाबदार वर्तनानें व आत्यंतिक अशा एकांगी धोरणामुळें कामगार-क्रांतीचे युरोपांत धिंडवडे निघत होते, त्या लोकांनीं मजवरच उलटा आरोप करावा व तोहि कोणता?—तर मी जर्मनींतील कम्युनिस्ट पक्षाच्याच परंतु विरुद्ध मतप्रतिपादन करणाऱ्या वर्तमानपत्रांतून लेख लिहिले. केवढा घोर अपराध हा! माझ्या हातून इतका भयंकर अपराध झाल्यावर, कोणता स्वाभिमानी क्रांतिवादी माझ्यासारख्यांशीं सहकार्य करण्यास तयार होईल? अगोदर सगळ्या नाटकाची तालीम झालेली होतीच, आतां फक्त स्टेजवर प्रयोग व्हावयाचाच राहिला होता. कॉ. कुसनिन यांनीं प्रश्न करावयाचा अवकाश, कीं उत्तर ठरलेलें. कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या कार्यकारी मंडळाच्या दहाव्या अधिवेशनप्रसंगीं, हा सगळा प्रकार व्हावयाचा हें जणूं काय ठरून गेल्यासारखेंच होतें. कॉ. कुसनिन यांनीं माझ्या वर्तनाबद्दल आक्षेप घेण्याचा अवकाश, तों एकदम एका कोपऱ्यांतून 'याला फांसावर लटकवा' असा संमतिदर्शक आवाज निघाला. मग आणखी काय पाहिजे? झालें! माझें आजपर्यंतचें कार्य व्यर्थ गेलें! कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या जन्मापासून तिचें पालनपोषण करणारा, व क्रांतिकारक चळवळींत वर्षानुवर्षें प्रत्यक्ष भाग घेणारा मी, एकदम त्या संस्थेचा कट्टा शत्रु बनलों. आतांपर्यंत मी आत्यंतिक जहाल असा गणला जात होतों. मग याच प्रसंगीं एकदम मवाळ कसा झालों हें कॉ. कुसनिन व त्यांचे सहकारी कॉ. लॅसोव्हस्की, कॉ. शुबिन्स यांनाच माहीत! कॉ. मॅनुल्स्की हे तर गर्जना करीतच उठले, कीं 'रॉय हे तत्त्वभ्रष्ट आहेत.' हा सगळा जो नाट्यप्रवेश चालला होता त्यामध्यें माझ्याविरुद्ध महत्त्वाचा व विश्वसनीय असा कांहीं पुरावा आणण्यांत आला होता काय? मुळींच नाहीं. एके काळचा जहाल क्रांतिकारक आज स्वार्थसाधु मवाळ बनला. वीस वर्षें सतत क्रांतियुद्धांत आघाडीवर राहणारा मी, चुटकी-सरशीं क्रांतिविरोधी तत्त्वभ्रष्ट ठरलों. काय हा अधःपात! किती भयंकर शिक्षा

अशा आरोपाला पाहिजे ! पण भयंकर शिक्षा देण्यासाठीं आरोपाची शाबिती तर झाली पाहिजे ? पण तें होण्याचें चिन्ह दिसेना. कॉ. कुसनिन यांना कांहीं तरी कारण द्यावयाला पाहिजेच होतें. जर्मन पत्रांत लेख लिहिले असा पोचट आक्षेप घेऊन तर भागत नाहीं. तेव्हां कॉ. कुसनिन पुढें आले व अखेरीस डोंगर पोखरून त्यांना एक उंदीर सांपडला. " मीं हिंदी भांडवलदारांच्या सहकार्यानें हिंदी स्वातंत्र्याचा लढा लढण्याचा उपदेश केला " असें एक अत्यंत विपर्यस्त व असत्य असें विधान कॉ. कुसानिन यांनीं ठोकून दिलें व कॉ. मॅनुल्स्की यांनीं मला 'क्रांतिविरोधी' किताब देऊन आपलें हें नाटक संपविलें. व वर सांगितल्याप्रमाणें त्या नाटकाचा शेवट होऊन माझ्या आयुष्यांतील महत्त्वाच्या अशा उत्साहपूर्ण जीवनक्रमाला कांहीं काळ विराम मिळाला. असो.

**रॉय यांच्यावरील आरोप**

" मी या एकंदर प्रकाराकडे निराळ्या दृष्टीनें पाहतों. एकंदर कामगार-क्रांतीच्या धोरणाचा विचार केला तर, थर्ड इंटरनॅशनलचीं सूत्रें आज ज्यांच्या हातीं आहेत, त्या पुढाऱ्यांची सध्यांची मनःस्थिति काय आहे हें जाणून घेणें आवश्यक आहे व म्हणून मी माझे विचार स्पष्ट रीतीनें आपल्यापुढें मांडीत आहे."

" सहाव्या जागतिक परिषदेच्या वेळीं एकाएकी माझ्यावर हल्ले होण्यास सुरुवात झाली. माझ्या आजारीपणामुळें मला त्या परिषदेस हजर राहणें शक्य नव्हतें. कॉ. कुसनिन यांचा माझ्यावर एक भयंकर आरोप असा कीं, मी साम्राज्यवाद्यांचा हस्तक बनलों. कां ? तर म्हणे, ब्रिटिश साम्राज्यशाही हिंदी लोकांना हळूहळू स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं मदत करील असें मीं माझ्या निबंधांत प्रतिपादन केलें आहे व म्हणून मला 'Decolonization' या सिद्धांताचा जनक असें शिफारसपत्र कॉ. कुसनिन यांनीं दिलें. पुरावा विश्वसनीय व बळकट असला म्हणजे कसल्याहि आरोपाला कोणीहि भीत नाहीं. कॉ. कुसनिन यांनीं त्यांच्या म्हणण्याच्या पुष्ट्यर्थ जर पुरावे सादर केले असते; तर माझें कांहींच म्हणणें नव्हतें. मी शिक्षेस पात्र झालों असतों, परंतु दुर्दैवाची गोष्ट ही, कीं कोणताहि पुरावा सादर तर करण्यांत आला नाहींच, फक्त

माझ्या संपादकत्वाखालीं चाललेल्या 'व्हॅनगार्ड' व 'मासेस' या वर्तमानपत्रांतून, मीं कामगारक्रांतीच्या बाबतींत सनदशीर मार्गांचा उपदेश करण्यासारखे लेख लिहिले असा माझ्यावर आरोप करण्यांत आला.

'हा सूर्य आणि हा जयद्रथ' असा पुरावा आपल्याला आज मिळणें शक्य आहे. त्या पत्रांच्या फायली आहेत त्या पाहा– डोळे फाडून वाचा व त्यांतील एका तरी लेखांत कॉ. कुसनिन यांच्या म्हणण्याप्रमाणें मीं विधानें केलीं आहेत काय तें मला दाखवा. १९२२ ते १९२८ सालापर्यंत हीं वर्तमानपत्रें माझ्या जबाबदारीवर व माझ्या देखरेखीखालीं चालत होतीं. अर्थात् १९२७ सालच्या पहिल्या आठ महिन्यांतील लिखाणाबद्दल मी जबाबदार नाहीं. कारण त्या वेळीं मी चीनमध्यें होतों. हीं वर्तमानपत्रें त्या वेळीं हिंदी राजकीय प्रश्नांबाबत चर्चा करून मार्ग व धोरण ठरविणारीं अधिकृत पत्रें समजलीं जात होतीं. या काळांत मला क्रांतिविरोधी म्हणणारा एकहि हरीचा लाल निघाला नाहीं. माझ्या धोरणाला व मताला गेलीं पांच वर्षें 'कम्युनिस्ट इंटरनॅशनल'नें उचलून धरलेलें आहे. जर तसें नसतें तर, आज मी आहे या मानाच्या जागेवर तुम्हांला खास दिसलों नसतों. आतां मात्र आमच्या सहकाऱ्यांना एकदम एक नवीन शोध लागला कीं, अरे, हा रॉय साम्राज्यशाहीचा हस्तक आहे! प्रश्न असा, कीं सतत पांच वर्षें माझीं मतें व धोरण थर्ड इंटरनॅशनलला मान्य असतांना जर आतां माझ्यावर साम्राज्यशाहीचा हस्तक व हिंदी भांडवलवाल्यांचा बगलबच्चा असा आरोप करण्यांत येत आहे तर त्याचा सरळ अर्थ इतकाच कीं, आतांपर्यंत 'थर्ड इंटरनॅशनल'पुढें हिंदी प्रश्नाबद्दल चुकीचें धोरण होतें व आतांपर्यंत या जगप्रसिद्ध संस्थेचें कार्य चुकीच्या मार्गानें चाललें होतें. सहाव्या परिषदेचा रिपोर्ट व नवीन आंखलेलें धोरण हेंच जर लेनिनच्या तत्त्वाचें सार समजावयाचें, तर आतांपर्यंत आंखलेले मार्ग व विशेषतः हिंदी प्रश्नांसंबंधीं ठरविलेलें धोरण, लेनिनच्या तत्त्वाविरुद्ध होतें कीं काय असा संशय येतो. व तसें जर म्हणावयाचें असेल, तर मात्र या पापाला मी एकटा धनी नाहीं. माझ्याबरोबर प्रत्यक्ष लेनिन, झिनाविफ, बुखारिन व स्टॅलिन हे माझ्याइतकेच

दोषी व साम्राज्यशाहीचे हस्तक होते असें म्हणावें लागेल. सहाव्या परिषदेंतील ठरावाचा याहून दुसरा कांहीं अर्थ निघूं शकेल असें मला तरी वाटत नाहीं. सहाव्या परिषदेचें धोरण लेनिन यांच्या आजपर्यंतच्या धोरणाविरुद्ध आहे याबद्दल मला तर मुळींच शंका नाहीं व याच कारणाकरितां मीं उघड रीतीनें वरील धोरणाला विरोध केला व त्याचें बक्षीस म्हणजे मी मात्र तत्त्वभ्रष्ट ठरलों व थर्ड इंटरनॅशनलमधून मला कायमचें काढून टाकण्यांत आलें.

**डीकॉलनायझेशन**

जो आरोप माझ्यावर लादण्यांत आला आहे, तो आहे तरी काय व त्याचा अर्थ काय याचा थोडासा खुलासेवार विचार करणें अवश्य आहे. " ब्रिटिश साम्राज्यशाही हिंदुस्थानला हळूहळू स्वराज्याच्या मार्गावर नेणार " असा हा Decolonization चा आरोप माझ्यावर करण्यांत आलेला आहे. या कल्पनेला थोडा पूर्वेतिहास आहे, व तो पाहिल्याखेरीज या शब्दाचें खरें मर्म काय आहे त्याची कल्पना येणार नाहीं. म्हणून मी त्या शब्दाच्या पूर्वेतिहासाकडे वळतों.

मी चीनमध्यें असतांना १९२७ सालीं एक हिंदी गृहस्थ मॉस्कोमध्यें आले. हिंदुस्थानांत औद्योगिक प्रगति झपाट्यानें चालू आहे, अशा अर्थाचा रिपोर्ट त्यांनीं केला. युद्धोत्तरकालीं हिंदुस्थानसारख्या देशांतून मोठ्या प्रमाणांत औद्योगिक क्षेत्रांत प्रगति होणार हें मीं पूर्वींच भाकित केलें होतें.

एकीकडे राष्ट्रीय चळवळींत कामगार व शेतकरी-वर्गाचें प्राबल्य होत जाणें व दुसरीकडे हिंदी भांडवलदारवर्ग आणि साम्राज्यशाही यांचे संबंध दृढ होत जाणें. असा हा दुहेरी परिणाम हिंदी राजकीय क्षेत्रांत या औद्योगिक प्रगतीनें होणार होता, ही सर्वांत महत्त्वाची गोष्ट आहे. राष्ट्राची औद्योगिक प्रगति ही जरी परकीय भांडवलानें झाली, तरी ती कांहीं काळ त्या देशांतील भांडवलवाल्यांना उपकारकच ठरते, अपकारक ठरत नाहीं. देशी भांडवलवाले हे साम्राज्यशाहीशीं दोन हात करण्यास तयार असतातहि; परंतु ही त्यांची लढाऊ वृत्ति राष्ट्रीय स्वातंत्र्यासाठीं किंवा कामगारक्रांतीसाठीं नसून, आपल्या वर्गबंधूंच्या हिताच्या आड परदेशी भांडवलदार येतात म्हणून, त्यांनीं ती धारण केलेली असते. तिच्या मुळाशीं भांडवलशाही वर्गाचा स्वार्थ असतो.

एकदां साम्राज्यशाही अंतर्गत विरोधानें खिळखिळी होण्याच्या मार्गास लागली म्हणजे वसाहतींतील देशांतून औद्योगिक प्रगतीला अडथळा करणें तर दूरच राहो, उलट त्यांना प्रत्यक्ष प्रोत्साहन देण्याशिवाय परकीय भांडवलवाल्यांना दुसरा मार्गच नसतो. याचा परिणाम म्हणजे एकीकडे देशी भांडवलदार आणि परकीय भांडवलदार यांच्यांतील विरोध कमी होत जाऊन, राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या एकजुटींत फूट पडण्यास सुरुवात होतें; आणि देशी भांडवलदार व साम्राज्यशाही यांची एकजूट अधिकाधिक दृढ होण्याच्या मार्गास लागते; व असें झालें म्हणजे राष्ट्रीय चळवळीचा आत्मा जो दलितवर्ग आणि कामगार-वर्ग यांच्याविरुद्ध वसाहतींतील भांडवलशाही व साम्राज्यशाही यांचा अभेद तट उभारलेला आहे असें आपल्या दृष्टीस पडतें. आतांपर्यंत ब्रिटिशांच्या आगमनानें हिंदी भांडवलदारांची मोठ्या प्रमाणांत कुचंबणा होत होती, परंतु युद्धोत्तरकालीं साम्राज्यशाहीला हिंदी भांडवलदारांस आपले भागीदार करण्यासाठीं हात पुढें करावे लागले व त्याचा परिणाम, हिंदी भांडवलदारांना औद्योगिक प्रगतीच्या क्षेत्रांत थोडी तरी मोकळीक मिळाली यांत शंका नाहीं. या एकंदर परिस्थितीचा विचार करून, हिंदी राष्ट्रीय प्रश्नावर अहवाल सादर करण्यासाठीं जें एक स्वतंत्र कमिशन मॉस्को येथें नेमण्यांत आलें होतें, त्या कमिशननें हिंदी राजकीय प्रश्नांवर ठराव करतांना Decolonization या नवीन सिद्धान्ताचा पूर्ण विचार करून त्यावर रिपोर्ट करावा असें कॉ. बुखारिन यांनीं सुचाविलें. Decolonization या शब्दाचा जन्म हा असा आहे, व बुखारिन यांनीं हा शब्द प्रथम उपयोगांत आणलेला आहे. अर्थात् त्यांनीं हा शब्द वापरला म्हणजे त्या शब्दांतील विशिष्ट अर्थाला त्यांनीं मान्यता दिली असें नसून सर्वसाधारण अर्थानेंच त्यांनीं तो शब्द वापरला होता.

### हिंदी राजकीय प्रश्नावरील महत्त्वाचा ठराव

वरील कमिशननें जो रिपोर्ट केला होता त्याच्या अनुरोधानें एक ठराव तयार करण्याचें काम मी चीनमधून परत आल्यावर मला देण्यांत आलें. मीं जो ठराव तयार केला होता, त्या ठरावावरच माझ्या शत्रूंची सर्व भिस्त होती. माझी तत्त्वभ्रष्टता, माझे दोष, गुन्हे—जें काय असेल नसेल तें या ठरावाच्या अनुरोधानें माझ्यावर लादलेलें होतें. हा ठराव म्हणजे माझ्या शत्रूंना मोठें

अस्त्रच मिळाल्यासारखें झालें होतें. हा ठराव पुढें मान्य करण्यांत आला नाहीं हें खरें; पण मी म्हणजे साम्राज्यशाहीचा हस्तक, भांडवलवाल्यांचा दोस्त, कम्युनिस्ट तत्त्वज्ञानापासून च्युत झालेला असा तत्त्वभ्रष्ट ! असे एक ना दोन—अनेक विपर्यस्त आरोप, ज्या ठरावाच्या आधारावर मजवर करण्यांत येत होते तो ठराव तरी त्या वेळीं कां प्रसिद्ध केला नाहीं असा माझा सवाल आहे. माझें अजूनहि असें आव्हान आहे, कीं जर तो ठराव पुढें आला तर मजंवर अनन्वित आरोप करणारांचे चांगलेच दांत पडतील व माझ्यावरील आरोप किती भ्रममूलक, विपर्यस्त व निराधार आहेत हें वाचकांच्या लक्षांत आल्याखेरीज राहणार नाहीं. सर्व ठरावच्या ठराव थोड्या जागेंत येथें देतां येणार नाहीं. कारण तो ठराव टाइप केलेलीं चाळीस पानें भरतील इतका मोठा आहे. म्हणून त्यांतील अत्यंत महत्त्वाचा तेवढाच भाग देऊन मी समाधान मानणार आहे.

" हिंदी प्रश्नाला आधारभूत अशी आर्थिक व औद्योगिक माहिती मीं त्या ठरावांत प्रारंभीं दिली असून युद्धोत्तरकालांत वसाहतींतून साम्राज्यशाहीचें नवीन धोरण कसकसें बदललें, त्याची थोडक्यांत त्या ठरावांत कल्पना आणून दिली आहे व शेवटीं असा निष्कर्ष काढला आहे कीं, ' साम्राज्यशाहीनें या काळांत फारच जपून पाऊल टाकणें जरूर आहे. जर साम्राज्यशाही तसें करूं शकली नाहीं तर युद्धोत्तरकालांतील कठीण प्रसंगांतून ती निभावून जाणें शक्य नाहीं.' हिंदुस्थान म्हणजे आपलें एक चरण्याचें कुरण, असें जें आजपर्यंत ब्रिटिश साम्राज्यशाहीला वाटत होतें, त्याऐवजीं साम्राज्यामधील एक घटक म्हणून इतर वसाहतींप्रमाणें 'डोमिनियन स्टेटस'चा दर्जा हिंदुस्थानला देण्यानेंच आपला टिकाव लागणें शक्य आहे, अशा तऱ्हेची नवीन विचारसरणी ब्रिटिश मुत्सद्द्यांना पटत चालली. हिंदुस्थान हा केवळ जुनाट पद्धतीचा शेतकीप्रधान देश याऐवजीं औद्योगिक प्रगतींत पुढारलेला असा साम्राज्याचा नवीन स्वतंत्र घटक म्हणून पुढें येणें अपरिहार्य होतें. हिंदुस्थान हा देश, या दृष्टीनें संक्रमणावस्थेंत आहे. साम्राज्यशाहीचा टिकाव लागण्यास नवीन मार्ग शोधणें व त्याप्रमाणें पाऊल टाकणें अत्यंत जरूरीचें होतें. युद्धोत्तरकालीं जी संकटपरंपरा ओढवली ती

जुन्या साधनांनीं व मार्गांनीं नाहींशी होणें शक्य नव्हतें. साम्राज्यशाही नवीन मार्ग शोधीत होती. संपत्तीच्या उत्पादनाचे बरेचसे मार्ग आतांपर्यंत बंद होते, ते आतां खुले करण्यांत आले. अशा रीतीनें एकंदर हिंदी राष्ट्राचें आर्थिक धोरण बदलण्यांत आलें. याचा परिणाम असा झाला, कीं हिंदुस्थानचा मुख्य जो शेतकीचा धंदा त्या धंद्यांत क्रांति होण्याची वेळ आली. देशाच्या आर्थिक व्यवहारांत देशी भांडवलदारांचा अधिकाधिक संबंध येऊन त्यांना अधिक भागीदारीहि मिळूं लागली. आर्थिक क्षेत्रांत ही उलढाल होत असतांना राजकीय क्षेत्रांत त्याचें कसें काय प्रतिबिंब पडलें होतें? ब्रिटिश साम्राज्यवाद्यांना युद्धोत्तरकालांत नाइलाजानें ज्या सवलती देणें भाग पडलें, त्यामुळें साम्राज्यशाही नष्ट होण्याचीं बीजें रोवलीं जात होतीं, यांत मुळींच संशय नाहीं. भांडवलदारांना तर सवलती देण्याखरीज दुसरा मार्गच उरला नव्हता. ह्या ज्या सवलती हिंदी भांडवलदारांना मिळाल्या, त्या कांहीं त्यांनीं साम्राज्यशाहीशीं दोन हात करून मिळविल्या होत्या असें मुळींच नाहीं. उलट, रडत-कुथत का होईना, पण नाइलाजानें द्यावी लागणारी अशी ती साम्राज्यशाहीची देणगी होती. हिंदी भांडवलदारांना मिळणाऱ्या सवलतीमुळें ते राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लक्ष्यापासून मात्र दुरावत चालले होते व या परिस्थितीचा राजकीय चळवळीवर परिणाम झाल्यावांचून राहिला नाहीं.”

मीं लिहिलेल्या रिपोर्टांतील महत्त्वाचा म्हणून जो भाग मीं वर दिला आहे, त्यावरून हें स्पष्ट कळून येईल कीं, ‘डिकॉलनायझेशन’ हा शब्द मीं सर्वसाधारण अर्थानें वापरलेला आहे. हिंदी भांडवलदारवर्ग हा एकंदर लोकसंख्येच्या मानानें अत्यल्प असल्याकारणानें त्या वर्गासंबंधींची माझी कल्पना मीं वर विशद केली. ब्रिटिश साम्राज्यशाही ही सर्व हिंदी समाजाकडे सहानुभूतीच्या दृष्टीनें पाहते असें मीं मुळींच म्हटलेलें नाहीं व हिंदी लोकांना साम्राज्यशाहीच्या मदतीनें स्वातंत्र्य मिळेल असें तर नाहींच नाहीं. उलट, भांडवलदारांना सवलती देणें हा एक हिंदी लोकांची पिळणूक करण्याचा अभिनव मार्ग आहे असेंच मीं बजाविलें आहे. आतां मी ‘मला हिंदी भांडवलवाल्यांविषयीं आपलेपणा वाटतो,’ या कॉ. कुसनिन यांच्या आरोपाकडे वळतों. १९२० सालापासून आतांपर्यंतचे

कम्युनिस्ट इंटरनॅशनलचे कागदपत्र व ठराव माझा बचाव करण्यास समर्थ आहेत. वसाहतींतून होणाऱ्या राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या चळवळींत स्थानिक भांडवलदारांकडून कसकसें वर्तन होईल हा प्रश्न जेव्हां वादाकरितां निघाला, त्या वेळीं माझा प्रत्यक्ष लेनिनशींहि मतभेद झाला होता. लेनिन यांनीं या प्रश्नासंबंधीं जे विचार मांडले त्याचबरोबर माझेंहि स्वतंत्र मत दुसऱ्या परिषदेच्या वेळीं नोंदले गेलें होतें. ज्यांना सत्यासत्याचा निर्णयच करून घ्यावयाचा असेल, त्यांनीं माझे त्या वेळचे लेख वाचावेत येवढीच माझी त्यांना विनंति आहे. १९२७ च्या सप्टेंबर महिन्यांत जो प्राथमिक ठराव मीं तयार केला होता, त्यांत मीं स्पष्ट म्हटलें होतें, कीं हिंदी भांडवलदार हा क्रांतिकारक चळवळीच्या आघाडीवर राहणें शक्य नाहीं. केवळ आपल्या देशांतील परिस्थितीकडे बघून नव्हे, तर जागतिक प्रगतीचा विचार केल्यावर, हिंदी भांडवलदारवर्ग हा स्वातंत्र्याच्या लढ्यांत प्रतिगामी ठरणार आहे असें मला दिसून आलें. स्वातंत्र्यासाठीं झगडण्याकरितां तो तयार नाहीं; मग प्रत्यक्ष भाग घेण्याची गोष्टच सोडून द्या.

माझीं मतें इतकीं स्पष्ट असतांना देखील, मी हिंदी भांडवलवाल्यांशीं सहकार्य करण्याची भाषा बोलतों यावरून, मला 'थर्ड इंटरनॅशनल'मधून काढून टाकण्यांत आलें. पण पुढें एक आणखी नवीनच आरोप माझ्याविरुद्ध आणण्यांत आला आणि तो कोणता म्हणाल तर, 'थर्ड इंटरनॅशनल'च्या धोरणाला विरोध करणाऱ्या अशा जर्मन पत्रांत लेख लिहिले. माझ्याविरुद्ध असणाऱ्या अधिकारीवर्गाच्या हातांत आणखी एक साधन मिळालें, त्यांना मीं विरुद्ध पक्षाच्या पत्रांतून लेख लिहिले एवढेंच कारण बस् होतें. मीं लेख लिहिले खरे, पण त्यांत काय लिहिलें होतें हें कोण पाहतो! लेखांतील मथितार्थ काय आहे तें लक्षांत न घेतां केवळ विरुद्ध बाजूच्या पत्रांत लेख लिहिले म्हणून एखाद्याला आपल्या पक्षांतून काढून लावणें हा एक न्यायाचा अजब मासलाच समजला पाहिजे !

सहाव्या परिषदेंत जो एकांगी व घातुक असा निर्णय घेण्यांत आला त्यावर मीं खरमरीत टीका केली. या टीकेला उत्तर देण्याचा कॉ. कुसनिन यांनीं पोकळ प्रयत्न केला. कुसनिन यांच्या या कृतीला प्रयत्न तरी कसा म्हणावा, हेंच मला

समजत नाहीं. कारण माझ्या टीकेला त्यांत उत्तर असेल तर शपथ! उलट, मीं काय म्हटलें होतें याचा विपर्यास मात्र कुसनिन यांनीं भरपूर केला आहे, दुसरें कांहीं नाहीं. माझ्यावर टीका करतांना मी काय म्हणालों, अगर लिहिलें त्याचा उतारा तरी त्यांनीं दाखल करावयाचा होता! पण सर्वच बाजूला राहून गेलें, आणि रॉय याच्या लेखांत मीं अमुक अमुक वाचलें एवढ्यावरच त्यांनीं वेळ मारून नेली.

हिंदुस्थानांत ज्या वेळीं स्वराज्य पक्ष वरिष्ठ कायदेकौन्सिलांत पब्लिक सेफ्टी बिलाविरुद्ध झगडत होता, त्या वेळीं आमच्या कम्युनिस्ट इंटरनॅशनलनें 'स्वराज्य पक्षाचा धिक्कार असो,' 'साम्राज्यशाही नष्ट होवो' अशी घोषणा करण्याचा सपाटा चालविला. जर्मन वर्तमानपत्रांतील लेखांत मीं या अशा चुकीच्या धोरणावर टीका केली. स्वराज्य पक्षाविषयीं त्या वेळीं तरी चुकीचें धोरण ठेवतां उपयोगी नाहीं, हें मीं माझ्या लेखांत दाखविलें. म्हणजे याचा अर्थ असा नव्हे, कीं स्वराज्य पक्ष व कम्युनिस्ट पक्ष हे तत्त्वतः एकच आहेत, अगर स्वराज्य पक्ष हा उद्यां कम्युनिस्ट पक्षाच्या मदतीला धावेल. उलट स्वराज्य पक्षाच्या क्रांतिकारक धोरणाविषयीं मला पहिल्यापासून शंका होती, इतकेंच काय, पण 'कम्युनिस्ट इंटरनॅशनल'मधील लोकांच्या डोक्यांतहि ती कल्पना घोळत होतीच. ही घातक कल्पना नाहींशी करण्यासाठीं, मी स्वतः वर्षानुवर्षें झगडलों हें सर्वांना माहीत असेलच. माझ्या लेखांचे व रिपोर्टांचे उतारे, हेच माझे या वेळीं खरे मदतनीस आहेत व ते इतके सच्चे आहेत, कीं कोणत्याहि भीडमुर्वतीला अगर धाकदपटशाला भिऊन ते मला खास दगा देणार नाहींत. असो!

स्वराज्य पक्षासंबंधानें मूर्खपणाचें व चुकीचें धोरण स्वीकारायचें आणि त्याचें समर्थन तर करतां येत नाहीं. तेव्हां स्वराज्य पक्षाविषयीं भलतीच कल्पना करून घेणारा म्हणून, माझ्याविरुद्ध अकांडतांडव करावयाचें येवढाच मार्ग कुसनिन यास मोकळा होता. 'स्वराज्य पक्षाचे लोक म्हणजे स्वातंत्र्यवादी लोक असें रॉय यांचें म्हणणें आहे' इतकें म्हणण्यापर्यंत या स्वारीची मजल गेली होती. कुसनिन यांच्या लिखाणांत अगर बोलण्यांत यत्किंचित् जरी प्रामाणिकपणाचा अंश असता व राजकीय प्रश्नांवरील वादविवाद प्रामाणिक

आणि निःस्वार्थी अशा उच्च भूमिकेवरून करावे लागतात, याची जर कुसनिनला जाणीव असती तर त्यानें माझ्यावर असे बाष्कळ व पोंचट आरोप केलेच नसते. कारण तसे आरोप करण्यास माझ्या लेखांत किंवा भाषणांत यत्किंचित्‌ही जागा नाहीं व आधार तर नाहींच नाहीं.

माझें, त्या वेळीं असें म्हणणें होतें, कीं केवळ प्रतिपक्षाची निर्भर्त्सना करणारी घोषणा करून, हिंदी भांडवलदारांच्या सनदशीर व संधिसाधु धोरणाचें स्वरूप तुम्ही जनतेला दाखवूं शकणार नाहीं. भांडवलदारांचें स्वार्थी स्वरूप उघड करून दाखविण्याचे मार्ग निराळे आहेत. समाजांतील निरनिराळ्या वर्गांचीं स्थानें कोणतीं तें लक्षांत घेऊन वर्गविग्रहाच्या तत्त्वावरच तुम्ही तें यशस्वी करूं शकाल. राष्ट्रीय लढ्यांत पुढें आलेला असा जो मध्यमवर्ग आहे त्याला बड्या भांडवलदारांच्या संधिसाधु धोरणाचा तिटकाराच असतो. तेव्हां त्या वर्गाचा पाठिंबा घेऊन, भांडवलदारांचें धोरण व मार्ग हे कसे चुकीचे आहेत हें जनतेला दाखविण्याचें उद्दिष्ट, कम्युनिस्टांनीं आपल्या डोळ्यांसमोर ठेवावयास हवें होतें आणि याच महत्त्वाच्या धोरणाच्या व डावपेचाच्या मुद्द्यावर सध्यांच्या कम्युनिस्ट इंटरनॅशनलचे मार्ग चुकीचे आहेत असें माझें मत आहे. परिस्थितीचा विचार न करतां, जनतेला मानवणार नाहीं असें एखादें आत्यंतिक धोरण त्यांच्यासमोर ठेवावयाचें व खरा लढाऊ जो मध्यम वर्ग त्याला मात्र आपल्यापासून दूर लोटावयाचें हें धोरण आत्मघातकीपणाचें आहे असें माझें मत आहे. लेनिनच्या धोरणाचें खरें मर्म जर आपल्याला कळलें असेल, तर पं. नेहरू यांनीं स्थापिलेल्या 'लीग ऑफ इंडिपेन्डन्स' या संस्थेंतूनच सामाजिक क्रांतीचा उठाव करतां येणें शक्य आहे असें आपल्याला पटलें असतें. चीनच्या इतिहासापासून आपण काय शिकलों? चीनपासून जर आपणांस कांहीं शिकण्यासारखें असेल, तर तो हाच महत्त्वाचा धडा आहे, कीं आत्यंतिक व एकांगी धोरण न स्वीकरतां राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्यांत भाग घेऊनच आपण शेतकरी क्रांति करूं शकूं. हिंदुस्थानांतील तरुण-मध्यमवर्ग कामगारवर्गाशीं सहकार्य करण्याच्या इराद्यानें पुढें येत होता व सामाजिक क्रांतीचें कंकण हातीं बांधून, हाच वर्ग पुढें पाऊल टाकीत होता. अशा ऐन आणीबाणीच्या प्रसंगीं हिंदुस्थानांतील नवीन आणि होतकरू

कम्युनिस्टांना आपला एक स्वतंत्र गट तयार करून, क्रांतिवाद घोकत बसण्याचा सल्ला कम्युनिस्ट इंटरनॅशनलनें दिला. माझ्या विरुद्ध कोणी कितीहि ओरड केली, तरी कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या झालेल्या घोडचुका कोण लपवूं शकेल! तरुण मध्यमवर्ग हा क्रांतिवादी नसतो, त्याला सामाजिक क्रांतीची आवश्यकता नसते, असें तर कॉ. कुसनिन-प्रभृतींचें म्हणणें नाहीं ना? मग एकीकडे मध्यमवर्ग क्रांतिवादी आहे असें म्हणावयाचें आणि दुसरीकडे मात्र त्या वर्गाच्या संस्थांतून आपलें अंग काढून घेऊन कामगार-संस्था आणि तरुण मध्यमवर्ग यांच्यामध्यें अभेद्य तट उभारावयाचा हा कोठला शहाणपणा? मी जर कोणत्या महत्त्वाच्या मुद्द्यावर भर दिला असेल, तर तो याच डावपेचाच्या मुद्द्यावर दिला आहे. माझ्या म्हणण्याचा आशय लक्षांत न घेतां, मी मात्र हिंदी भांडवलदारांशीं सहकार्य करण्यासाठीं उत्सुक ठरलों होतों, असा धडधडीत खोटा आरोप माझ्यावर करण्यांत आला ही दुर्दैवाची गोष्ट होय.

दुसरा एक आरोप असा, कीं कम्युनिस्ट तत्त्वाविरुद्ध लोकशाही-प्रधान राज्यपद्धतीचा अवलंब करण्याचा मीं जनतेला उपदेश केला. काय गंमत आहे पाहा! आरोप करतांना त्याचा सबळ व विश्वसनीय असा पुरावा देणें हें अगत्याचें असतें. माझ्याविरुद्ध अशा कोणत्याहि आरोपाच्या समर्थनार्थ कोणताच पुरावा सादर करण्यांत आला नाहीं. माझें अद्यापिहि उघड आव्हानच आहे, कीं जे जे आरोप माझ्यावर करण्यांत येत आहेत, त्यांचा पुरावा माझ्या प्रतिपक्षीयांनीं अजून तरी सादर करावा. माझे लेख, माझीं पुस्तकें, व माझे रिपोर्ट हे तर कोठें नाहींसे झाले नाहींत ना? पण तसें कांहींहि न करतां, केवळ निराधार आरोप करीत सुटणें हा प्रतिपक्षाला नामोहरम करण्याचा सभ्यपणाचा मार्ग नव्हे. मी सहाव्या परिषदेला हजर नसल्या-कारणानें मला माझें म्हणणें त्या वेळीं कॉंग्रेसपुढें मांडतां येणें शक्यच नव्हतें. मागाहून जेव्हां मला त्या परिषदेचे ठराव व इतर माहिती मिळाली त्या वेळीं ताबडतोब मीं विस्तृत असा खुलासा कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या कार्यकारी मंडळापुढें पाठविला. त्या रिपोर्टांत मीं कुसनिनच्या विधानांची खरमरीत हजेरी घेतली होती व सहाव्या परिषदेनें आंखलेल्या धोरणाला माझा असलेलो

विरोध मीं जाहीरहि केला. हें पाहा रॉय यांचें लिखाण किंवा ही पाहा त्यांचीं मतें व त्यांनीं आंखलेलें धोरण असें पुराव्यानिशीं दाखवून मग त्याच्या आधारावर कांहीं आरोप करण्यांत आले, तर कोण कोणाला नांवें ठेवील? जर त्या रिपोर्टांतून माझ्याविरुद्ध आणलेल्या आरोपांना कांहीं आधार मिळत असेल व माझें वर्तन अदूरदृष्टीचें व स्वार्थीपणाचें वाटत असेल, तर त्या रिपोर्टांतील महत्त्वाचा भाग प्रसिद्ध करण्यानेंच सर्व काम भागण्यासारखें आहे. निष्कारण यातायात करण्याची काय जरूरी?

मीं लिहिलेला रिपोर्ट बराच मोठा आहे. तो प्रसिद्ध करण्यासारखीं साधनें आज मजजवळ उपलब्ध नाहींत. तसें करतां आलें असतें, तर या वादांतील महत्त्वाच्या मुद्द्यांचा सोक्षमोक्ष तरी लावतां आला असता. पण तो रिपोर्ट मला प्रसिद्ध करतां आला नाहीं म्हणून, कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या अधिकारारूढ पक्षाला तसें करतां येणार नाहीं असें थोडेंच आहे! मग माझा रिपोर्ट प्रसिद्ध न करण्याचें इंगित तरी काय? हा रिपोर्ट अजीबात दडपून टाकण्याचा त्यांत हेतु आहे, असा कोणी तर्क केला तर तें वावगें होईल काय? मी माझ्या रिपोर्टांत मांडलेला पुरावा व दिलेले आधार व त्यावरून काढलेले सिद्धांत हे खोडतां येणें अशक्य आहे, हेंच रिपोर्ट प्रसिद्ध न करण्याचें एकमेव कारण आहे असें मला वाटतें.

### आरोपांतील विसंगति

माझ्याविरुद्ध केलेले आरोप हे परस्परविरोधी कसे आहेत हें मी आतां दाखवितों.

युद्धोत्तरकालांत भांडवलदारवर्गाला सवलती न देतां युद्धपूर्वकालाप्रमाणें चिरडून टाकण्याचा प्रयत्न करणें, ही गोष्ट साम्राज्यशाहीच्या हिताच्या दृष्टीनें अगदीं विघातक अशी होती व त्या धोरणानें साम्राज्यशाहीच्या डावपेचांत होत चाललेला बदल स्पष्ट करून दाखविणें आणि तदनुरोधानें आपलें राजकीय लढ्याचें पाऊल पुढें टाकण्याबद्दल आगाऊ इशारा देणें, याला कोणी सनदशीर मार्ग म्हणेल तर म्हणो; परंतु मला तसें वाटत नाहीं. मी माझ्या लेखांतून व रिपोर्टांतून, साम्राज्यशाहीच्या डावपेचांत होत चाललेला फरक मीं स्पष्ट करून दाखविला इतकेंच. माझ्या रिपोर्टांची खरी मूलभूत हीच कल्पना

आहे. जो स्वतःला मार्क्सिस्ट म्हणवितो त्यानें परिस्थिति ओळखून प्रत्यक्ष कृति करण्याच्या इराद्यानें पाऊल टाकलें पाहिजे; केवळ शब्दावडंबरानें हुरळून जातां कामा नये. सहाव्या परिषदेंत जर कोणता महत्त्वाचा प्रश्न उत्पन्न झाला असेल तर तो एकच; आणि तो हा कीं, युद्धपूर्वकालीं भांडवलशाहीच्या भरभराटीच्या कालांत जें साम्राज्यशाहीचें धोरण होतें तेंच धोरण युद्धानंतरच्या भांडवलशाहीच्या पडत्या काळांत राहील कीं काय? माझें या प्रश्नाला 'नाहीं' असें अगदीं स्पष्ट व निःसंदिग्ध उत्तर आहे. हा माझा सिद्धांत मीं माझ्या रिपोर्टांत साधार पुढें मांडला आहे. तो महत्त्वाचा रिपोर्ट कोठें गडप झाला हें मला समजत नाहीं. मीं साम्राज्यशाहीच्या धोरणाची दिशा साधार दाखवून दिली, यांत मी हिंदी भांडवलदारांचा बगलबच्चा कसा झालों हें मला तरी समजत नाहीं. जर मी माझ्या निबंधांत स्पष्ट रीतीनें असें म्हणतों कीं, हिंदी भांडवलदारवर्ग हा साम्राज्यशाहीच्या आहारीं जात चाललेला आहे तर त्याच वर्गाशीं सहकार्य करण्यास सांगणारा मी अर्थातच क्रांतिविरोधी असलों पाहिजे. त्यांतून दुसरा काय अर्थ निघणार? सुदैवानें माझ्यावर तरी अद्याप कोणत्याहि जबाबदार माणसानें, मी क्रांतिविरोधी आहे असा आरोप केलेला नाहीं. एकीकडे हिंदी भांडवलदारवर्ग हा साम्राज्यशाहीच्या आहारीं जाणार असें कंठरवानें सांगत असतांना, त्याच वेळीं मी त्या वर्गाशीं सहकार्य करण्यास स्वातंत्र्यवादी हिंदी जनतेस उपदेश करतों, म्हणजे मी एकाच वेळीं दोन परस्परविरोधी असें सिद्धांत मांडतों असें म्हणणें भाग आहे. अर्थात् माझ्या म्हणण्याचा जाणूनबुजून विपर्यास तरी कोणी केला असला पाहिजे, किंवा दोन परस्पर विरोधी सिद्धांत एकाच वेळीं सांगणारा मी वेडा तरी असलों पाहिजे.

माझ्या म्हणण्याचा आशय जर अद्यापहि कोणाच्या ध्यानांत आला नसेल तर त्यांच्याकरितां मला माझें म्हणणें आणखी एकदां स्पष्ट करून दाखविलें पाहिजे. मी त्या वेळीं जें म्हणालों तेंच आतांहि सांगत आहें; व तेंच माझें मत अजूनहि कायम आहे. हिंदुस्थानांतील स्वातंत्र्याचा लढा जर आपणांस यशस्वी रीतीनें चालवावयाचा असेल, तर कम्युनिस्टांनीं बहुजन समाजांत अत्यंत गांजलेला व पिळला जाणारा असा जो वर्ग त्याच्याशीं समरस होऊन, त्या वर्गाची अभेद्य अशी संघटना केली पाहिजे. जनतेपुढें लोकशाही स्वातंत्र्याचा

कार्यक्रम ठेवून त्यांना स्वातंत्र्याच्या लढ्याकरितां तयार राहण्यास आपण सांगितलें पाहिजे; व मग कामगारवर्गाच्या सहकार्यानें शेतकरी समाजाचा सार्वत्रिक कार्यक्रम घेऊन, ब्रिटिश साम्राज्यशाही व त्यांना मदत करणारी हिंदी भांडवलशाही यांच्याशीं एकाच वेळीं दोन हात करावयास तयार राहण्यास त्यांना सांगितलें पाहिजे असें माझें त्या वेळींहि मत होतें व आतांहि आहे.

केवळ शाब्दिक ठराव घेतले तर सहाव्या परिषदेंत झालेल्या ठरावांत मीं सांगितलेल्या धोरणाविरुद्ध कांहीं निराळें सांगितलें आहे असें मला वाटत नाहीं. पण हें धोरण अमलांत कसें आणावयाचें हें सांगतांना मात्र बरोबर ठरावाच्या हेतूच्या अगदीं विरुद्ध असा कम्युनिस्टांना उपदेश करण्यांत आला आहे. सहाव्या परिषदेंतील हा ठराव म्हणजे परस्परविरोधी अशा विधानांचें कडबोळें आहे. मुख्य प्रश्न असा, कीं हिंदी भांडवलदार हा सर्व राष्ट्राचा एक घटक असल्यामुळें त्याचीहि साम्राज्यशाहीकडून पिळणूक होत आहे. असें असतांना तो साम्राज्यशाहीविरुद्ध लढण्यास कां सज्ज होत नाहीं? हिंदी भांडवलदार वर्ग क्रांतिविरोधी कां होत चालला? पूर्वींप्रमाणेंच जर त्या वर्गाची साम्राज्यशाहीकडून पिळणूक होत असेल, व आपल्या वर्गाची स्थिति सुधारणें अशक्य आहे असें त्यास खरोखर वाटत असेल तर तो वर्ग खात्रीनें क्रांति-विन्मुख होणें शक्य नाहीं. या सर्व कोड्याचा उलगडा फक्त एकाच उत्तरानें होतो व तें उत्तर असें, कीं ब्रिटिश साम्राज्यशाही या वर्गाला कांहीं तरी सवलती देत असली पाहिजे व एकंदर देशाच्या पिळणुकीला एकमेक एकमेकांला साहाय्य करीत असले पाहिजेत, दुसरें काय! असो.

मजवर जे आरोप लादण्यांत आले तशा अर्थाचा कोणताहि गुन्हा माझ्या हातून झालेला नाहीं. जर कांहीं झालें असेल तर तें इतकेंच कीं, स्वतंत्र रीतीनें विचार करून आपलीं बनलेलीं मतें बिनदिक्कत लोकांसमोर मांडणें हें पाप मात्र मीं केलें आहे. जोंपर्यंत मी माझ्या तोंडाला खीळ घातली होती, तोंपर्यंत मजवर कोणी तत्त्वभ्रष्टतेचा आरोप केला नाहीं, किंवा थर्ड इंटरनॅशनल-मधून हाकलून लावण्याचीहि भाषा बोलला नाहीं. माझें काय मत आहे, माझा मतभेद कोठें आहे, मी काय म्हणतों, या बाबतींत माझ्याकडून एक चकारशब्दहि बोलला अगर लिहिला जाऊं नये अशी सर्व बाजूंनीं

माझी नाकेबंदी करण्यांत आली होती. जर मीं माझीं मतें लोकांपुढें मांडण्याचें धाष्टर्य केलें नसतें तर कालाच्या अफाट सागरांत मी कधींच गडप होऊन गेलों असतों. परंतु माझें मन मला त्या वेळीं टोचीत होतें. "तूं क्रांतिकारक आहेस ना? तूं कामगार-क्रांतीचा एकमेव सेवक आहेस ना? मग या वेळीं गप्प बसून तूं कामगार-क्रांतीची पीछेहाट करीत आहेस." कांही काहीं वेळीं असे प्रसंग येतात, कीं ज्या वेळीं शिस्तीचें उल्लंघन करणें हेंच अंतिम ध्येयाच्या दृष्टीनें हितकारक व परिणाम-कारक असतें व सच्चा क्रांतिकारक अशा रीतीनें आपण होऊन आपल्या-वर लादलेल्या शिस्तीच्या बेड्या तोडण्यास मागेंपुढें पाहत नाहीं. मीं जेव्हां वर्तमानपत्रांतून माझीं मतें जाहीर केलीं त्या वेळीं याच एका सद्हेतूनें मीं सध्यांच्या इंटरनॅशनलच्या धोरणाविरुद्ध रणशिंग फुंकलें. सहाव्या परिषदेंत पास झालेल्या एकंदर सर्वच ठरावांना माझा विरोध आहे. केवळ हिंदी राजकीय प्रश्नाबाबत माझें मत विरुद्ध होतें असें नाहीं. एखाद्या लहान मुद्द्यावर मतभेद झाला, तर त्यांत फारसें बिघडतें असें नाहीं. कारण आज नाहीं उद्यां, किरकोळ चूक दृष्टीस पडल्यावर, तींत सुधारणा होण्याची आशा तरी असते. परंतु हिंदी प्रश्नाबाबत आंखलेलें धोरण एकंदरच आंतरराष्ट्रीय धोरणाचा एक लहानसा भाग होता. अर्थात् जेथें धोरणासंबंधींच मूलभूत मतभेद झाले तेथें किरकोळ दुरुस्त्या करून ते मिटणें शक्य नसतात व अशा वेळीं मूग गिळून स्वस्थ बसणें आत्मघातकीपणाचें आहे असें मला वाटतें."

वरील आशयाचें आपलें म्हणणें कॉ. रॉय यांनीं कम्युनिस्ट मताच्या पण अधिकृत नसलेल्या अशा वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध केलें.

---

## १६ बदनामीचे प्रयत्न

रॉय यांना कम्युनिस्ट इंटरनॅशनलमधून काढल्याचें वर्तमान कळण्याचा अवकाश, तों जगभर या बातमीचा डंका पिटविण्यांत आला. साम्राज्यवाद्यांना ही एक आनंदाची पर्वणीच लाभली होती. जगांतील भांडवलशाही राष्ट्रांतील व विशेषतः इंग्लंडांतील भांडवलदारांना या बातमीमुळें आनंदाच्या उकळ्या फुटत होत्या. 'लंडन टाइम्स'सारख्या साम्राज्यवादी पत्रानें 'मॉस्कोच्या एजंटाची हकालपट्टी' असे मोठमोठे मथळे देऊन रॉय यांच्यासंबंधींची बातमी आपल्या वर्तमानपत्रांतून जगजाहीर करून टाकली.

केवळ रॉय यांच्या हकालपट्टीची बातमी देऊन साम्राज्यवादी वर्तमानपत्रकारांचें थोडेंच समाधान होणार होतें ! रॉय यांच्यासंबंधानें अत्यंत खोटे, विपर्यस्त व निंदाप्रचुर मजकुरानें भरलेले लेखांमागून लेख लंडन टाइम्समधून प्रसिद्ध होऊं लागले. आपल्या लेखकांची छाप वाचकांवर पडावी व आपले लेख विश्वसनीय अशा लेखकांकडून लिहिले गेले आहेत, हें दर्शविण्यासाठींच कीं काय, पत्राच्या संपादकांनीं सदर लेखांना अशी एक टीप जोडली कीं, लेखक पूर्वींचे कम्युनिस्ट असून ते या विषयाचे तज्ज्ञहि आहेत व त्यांना कित्येक वर्षांपासून रॉय यांची चांगली माहिती आहे. खरोखर, खोटे व निंदाप्रचुर असे लेख लिहिणारे हे सभ्य लेखक कोण हें समजण्याची वाचकांना उत्कंठा लागली असेल म्हणून सांगतों कीं हे लेखक दुसरे-तिसरे कोणी नसून, हिंदुस्थानांतून तुर्कस्थानांत गेलेले व रॉय यांच्या हाताखालीं ताशकंद येथें राजकीय व लष्करी शिक्षण घेऊन शेवटीं मॉस्कोहून पळ काढून, लंडन युनिव्हर्सिटींत 'पुस्तु' भाषेचे लेक्चरर म्हणून नोकरी करणारे अबदुल कादर नांवाचे मुसलमान गृहस्थ होत. असो.

केवळ रॉय यांची निंदा करणें हाच या लेखांच्या पाठीशीं हेतु होता असें नव्हे, तर या लेखांतून लेनिन व स्टॅलिन यांचीहि अत्यंत गलिच्छ शब्दांतून

निंदा केली होती. लेनिन हे आधुनिक रशियाचे जनक आहेत, हें एकीकडे कबूल करून, स्टॅलिन यांना मात्र हिंदी स्वातंत्र्याच्या लढ्याबद्दल कांहींहि आस्था नाहीं अशा अर्थाचा सदर लेखाचा शेवट करण्यांत आला होता. हेतु हा कीं, हिंदुस्थानांतील जनता व कॉ. रॉय यांच्यामध्यें कायमची दुही पडावी. मि. अया तेंडूलकर यांच्या नांवानें याच वेळीं हिंदी वर्तमानपत्रांतूनहि रॉय यांच्यासंबंधानें लेख येऊं लागले.

हिंदी वर्तमानपत्रांत येणारे लेख व लंडन टाइम्समधील लेख हीं जुळीं भावंडेंच होतीं. तेंडूलकर यांच्या लेखांची तर लंडन टाइम्समधील लेखांच्याहि पलीकडे मजल जाऊन, रॉय यांच्यावर वाटेल ते आरोप करण्यास या बहाद्दरांनीं कमी केलें नाहीं. मॉस्कोमधील बराचसा पैसा गिळंकृत करून, तो रॉय यांनीं स्वित्झर्लंडमधील एका बँकेंत ठेव म्हणून ठेवला व या कारणास्तव त्यांची रशियांतून हकालपट्टी झाली, राजकीय कारणाकरितां त्यांना इंटरनॅशनलमधून काढून टाकलें नाहीं, अशा तऱ्हेचीं धडधडीत खोटीं विधानें करून रॉय यांची बदनामी करण्याचा त्या लेखांत प्रयत्न केला होता. या सर्व लेखकांचा एक कंपूच होता असें मानण्यास भरपूर जागा आहे. आपल्या लेखांना महत्त्व यावें, आपले लेख विश्वसनीय व माहितीपूर्ण वाटावे व रॉय यांच्यासारख्या जगप्रसिद्ध क्रांतिकारांविरुद्ध हिंदी जनतेचीं मनें कलुषित करण्याच्या कामांत हिंदी जनतेनें आपल्या लेखांवर विश्वास ठेवावा म्हणून, तेंडूलकर यांनीं 'पॉल शॉफर' नांवाच्या लेखकाचे उतारेहि आपल्या लेखांत आधारादाखल दिले. 'पॉल-शॉफर' व मी एकाच वर्तमानपत्राचे प्रतिनिधि म्हणून काम करीत होतों अशी एक त्यांनीं लोणकढी थाप ठोकून दिली.

पॉल शॉफर हे जर्मनीमधील एका दैनिकाचे, मॉस्को येथील बातमीदार होते ही गोष्ट अक्षरशः खरी आहे. पण जो आधार मोठा विश्वसनीय वाटावा म्हणून तेंडूलकर निर्धास्तपणें पॉल शॉफर यांच्यावर विसंबून होते, तोच आपल्याला असा दगा देईल याची बिचाऱ्या तेंडूलकरांना कशी बरें कल्पना येणार ? पॉल शॉफर हे ब्रिटिश पोलीस खात्याचे गुप्त हेर असून त्यांनीं जर्मन पत्राच्या बातमीदाराचें केवळ पांघरूण घेतलें होतें, असें थोड्याच दिवसांत रशियन गुप्त पोलीस खात्याकडून उघडकीस आलें. इतकेंच काय, पण गुप्त पोलीस खात्याचे

आगर जें स्कॉटलंड यार्ड, तेथील पोलिसांशीं पॉल शॉफर यांचा दाट परिचय असल्याचें दिसून आल्याबरोबर, रशियांतून पॉल शॉफर यांची तात्काळ हकाल-पट्टी करण्यांत आली. तेंडुलकर यांनीं पॉल शॉफरच्या आधारावर स्वतःचें हसें मात्र करून घेतलें व आपलें अंतरंग जनतेला उघडें करून दाखविलें.

कलकत्त्याचें 'ॲडव्हान्स' पत्र आणि अलाहाबाद येथील 'लीडर' पत्र यांतूनहि मि. तेंडुलकर यांच्या लेखांना स्थान मिळालें होतें. बर्लिनमधील जपानी पत्राचे बातमीदार म्हणून हे राजश्री १९३०-३१ च्या असहकारितेच्या चळवळीच्या ऐन अमदानींत हिंदुस्थानांत आले व त्यांनीं जर्मन पत्रांतून काँग्रेसची निंदा करणारीं अशीं बरींच पत्रें लिहिलीं होतीं. तेंडुलकरांनीं राष्ट्रीय चळवळीबद्दल आपलेपणानें इतर पत्रांत लेख लिहावेत असें हिंदी राष्ट्रीय पुढाऱ्यांना वाटणें साहजिकच होतें. परंतु मि. तेंडूलकर यांचा पेशाच पहिल्या-पासून निराळा असल्याकारणानें त्यांच्याकडून तशी अपेक्षा करणें अगदींच अस्थानीं होतें.

रॉय यांची जेवढी निंदा, नालस्ती करावयाची तेवढी करण्याचा साम्राज्य-वाद्यांनीं प्रयत्न केला. भांडवलदारांनीं आपला हेतु साधून घेतला. पोलीस खात्यांतील गुप्त पोलिसांनीं व त्यांच्या सहकाऱ्यांनीं करावयाचे तेवढे प्रयत्न केले. अद्यापहि रॉय यांची नालस्ती करण्याचे प्रयत्न पद्धतशीर रीतीनें चालू आहेत, परंतु रॉय यांच्यासंबंधीं उठविलेल्या खोट्यानाट्या अफवांवर विश्वास ठेवण्यास हिंदी जनता तयार नाहीं. रॉय यांची विचारसरणी व मतें इतकीं स्पष्ट व शास्त्रशुद्ध आहेत, कीं साम्राज्यवाद्यांच्या हस्तकांनीं व नतद्रष्ट कुटाळ लोकांनीं किती जरी त्यांची निंदा करण्याचा प्रयत्न केला तरी त्याला यश येणें अशक्य आहे.

## १७ पुन्हा कार्यास सुरुवात

थर्ड इंटरनॅशनलमधून निघाल्यानंतर कॉ. रॉय यांच्यावर कामगारक्रांतिविरोधी असणाऱ्या व व्यक्तिद्वेषानें चिडून बेभान झालेल्या लोकांनीं बरेच हल्ले केले. परंतु रॉय यांच्या मनावर त्याचा यत्किंचितहि परिणाम झाला नाहीं. आपलीं मतें सूर्यप्रकाशाइतकीं स्पष्ट व निष्कलंक असतांना त्यांचा जाणूनबुजून केलेला विपर्यास, आपल्यासंबंधीं पसरविण्यांत येणाऱ्या खोट्या गोष्टी, दुष्ट हेतूनें प्रेरित होऊन केली जाणारी चळवळ, यांमुळें रॉय यांच्या मनाची मुळींच चलबिचल झाली नाहीं. शांत, गंभीर, विचारी अशा एखाद्या स्थितप्रज्ञाप्रमाणें त्यांची कालक्रमणा चालली होती. एकदां एका मित्रानें कॉ. रॉय यांना प्रश्न केला, कीं तुम्ही तुमची चाललेली निंदा, नालस्ती, हेतुविपर्यास हें सर्व मुकाट्यानें सहन कसें करतां हें मला समजत नाहीं. त्यावर रॉय यांनीं उत्तर दिलें, कीं 'त्यांना काय करावयाचें असेल तें करूं द्या, मला त्याची मुळींच पर्वा नाहीं.' आतां रॉय यांचें धोरण काय असणार? थर्ड इंटरनॅशनलमधून रॉय निघाले, आतां ते रशियाविरुद्ध चळवळ करतील अशी पुष्कळांना खात्री वाटत होती. कारण इतका थोर मनुष्य अपमान सहन करणें कधींच शक्य नाहीं. अभिमानी मनुष्य विषारी सर्पाप्रमाणें असतो. अशा मनुष्याच्या अभिमानाला का धक्का लागला म्हणजे तो लहान-थोर, विद्वान्-अविद्वान्, स्त्री-पुरुष, कांहींहि न ओळखतां आपणास दुखविणाऱ्या मनुष्यास डसल्याखेरीज कधींहि राहणें शक्य नाहीं; असा सर्वसाधारण अभिमानी मनुष्याचा स्वभाव असल्यामुळें, रॉय यांचें धोरण काय राहणार याविषयीं जगांत साहजिकच कुतूहल उत्पन्न झालें होतें व हा हेतु मनांत धरून एका वर्तमानपत्राच्या प्रतिनिधीनें रॉय यांना कांहीं प्रश्न विचारले. त्या प्रसंगीं रॉय यांनीं दिलेलें उत्तर अत्यंत मननीय असें आहे. रॉय

म्हणाले, "मी आज थर्ड इंटरनॅशनलमधून निघालों हें खरें; पण आंतरराष्ट्रीय कामगारक्रांतीची कम्युनिस्ट चळवळ करण्यास तर माझा कोणी हात धरला नाहीं ना! अहो! आतां जी परिस्थिति आली आहे ती या चळवळीच्या अवाढव्य विस्ताराचा परिणाम आहे. आणि तो परिणाम कांहीं काळच टिकणार. लेनिन यांचें खरें धोरण काय व आपले डावपेच आपण कसे बदलावयास पाहिजेत, हें आज नाहीं उद्यां या पुढाऱ्यांच्या लक्षांत आल्याखेरीज खास राहणार नाहीं, याबद्दल मला खात्री आहे. मला इंटरनॅशनलमधून काढण्याचीं कांहीं जरीं कारणें असलीं, अगर कोणी जरी माझ्याविषयीं कांहीं म्हणत असलें, तरी जनतेनें हें पक्कें लक्षांत ठेवावें, कीं जर उद्यां रशियांतील सोव्हिएट यूनियनवर भांडवलदारी राष्ट्रांचा हल्ला झाला तर एखाद्या सैनिका-प्रमाणें मी कामगारांच्या पितृभूमीकरितां हातावर शिर घेऊन लढेन." रॉय यांच्या सडेतोड व स्पष्ट अशा उत्तरानें संशयग्रस्त असलेल्या अशा लोकांच्या डोळ्यांत झणझणीत अंजन पडलें.

आतांपर्यंत रॉय यांना गुरु मानणारे, त्यांचे जीवश्चकंठश्च स्नेही म्हणविणारे बरेच कार्यकर्ते, विशेषतः हिंदुस्थांतील बरेचसे तरुण, हे रॉय यांना थर्ड इंटर-नॅशनलमधून काढून टाकल्यावर त्यांना सोडून जाऊं लागले. रॉय यांच्याशीं सहकार्य करून व थर्ड इंटरनॅशनलशीं विरोध पत्करून काम करणें, म्हणजे त्या वेळीं कांहीं सोपी गोष्ट नव्हती. त्याला मनाचा खंबीरपणा व आपल्या तात्त्विक भूमिकेबद्दल आत्मविश्वास असावा लागतो. अधिकारारूढ पक्षा-कडून होणारी अवहेलना व निर्भर्त्सना सहन करण्याची मनाची तयारीहि तितकीच दांडगी असावी लागते, अर्थात् सर्वच अनुयायांकडून इतकी अपेक्षा करणें चुकीचें आहे. अशा परस्थितींत सुद्धां रॉय यांच्याशीं सहमत असणारे व त्यांच्या विचारसरणीला पाठिंबा देणारे असे कांहीं सहकारी त्यांनी लाभले. सहाव्या परिषदेनें जो आत्मघातकी असा मार्ग स्वीकारला होता त्या धोरणाला या लोकांचा मनापासून विरोध होता.

### नवी दिटी, नवें राज्य

रॉय यांच्या प्रकृतींत थोडी सुधारणा झाल्याबरोबर त्यांनीं आपल्याशीं सह-मत असणाऱ्या प्रख्यात व्यक्तींशीं व राष्ट्रीय चळवळींतील पुढाऱ्यांशीं विचार-

विनिमय करून पुनश्च हरिः ॐ म्हणून चळवळीची मुहूर्तमेढ रोविली. या वेळीं त्यांना जे सहकारी मिळाले, त्यांत ब्रॅंडलर, ऑगस्ट, थॉलहीमर, जे ल्व्हस्टोन हे प्रमुख होत. या लोकांच्या साहाय्यानें कम्युनिस्ट चळवळींतील विरोधी पक्ष म्हणून त्यांनीं कामास सुरुवात केली. ह्या पक्षाचा हेतु जगांतील कम्युनिस्ट चळवळीच्या विरुद्ध होता, असे जे आक्षेप आहेत ते केवळ खोटे व विपर्यस्त असे आहेत. सहाव्या परिषदेनें जें चुकीचें धोरण आंखलें त्या धोरणाविरुद्ध चळवळ करणाऱ्या अशा, जगांतील क्रांतिवादी पुढाऱ्यांचा हा पक्ष होता. केवळ विरोध करणें एवढेंच या पक्षाचें ध्येय नव्हतें, तर कम्युनिस्ट इंटरनॅशनलनें ऐतिहासिक परिस्थितीचा विचार करून, लेनिनच्या खऱ्या शास्त्रशुद्ध मार्गांनें आपलें धोरण आंखावें व त्या धोरणावर परत इंटरनॅशनलचें काम चालावें, या हेतूनें हा विरोधी पक्ष स्थापन करण्यांत आला. कोणी रॉय यांच्या पक्षाला चौथी इंटरनॅशनल म्हणून संबोधतात. खरोखर रॉय यांचा पक्ष म्हणजे चौथी इंटरनॅशनल अशी संस्था तर नाहींच; परंतु अशी एखादी स्वतंत्र संस्था स्थापन करण्याचा विचारहि त्यांच्या मनाला कधीं शिवलेला नाहीं.

थर्ड इंटरनॅशनलनें, आपलें धोरण बदललें व योग्य अशा मार्गांनें थर्ड इंटरनॅशनलचें काम चालू लागलें, तर या नवीन पक्षाची जरूरी तरी काय उरली? ताबडतोब या पक्षाचें विसर्जन करून पूर्ववत् सर्व एकाच ध्येयानें, एक दिलानें काम करावयास लागतील. जोंपर्यंत थर्ड इंटरनॅशनलमध्यें योग्य धोरण आंखलें जात नाहीं, तोंपर्यंतच या पक्षाची जरूरी आहे, एरव्हीं नाहीं.

रॉय यांनीं आपल्या सहकाऱ्यांबरोबर विचारविनिमय करून आपल्या कार्याचा मार्ग आंखला, व त्याप्रमाणें ते कामाला लागले. रॉय यांनीं स्थापन केलेल्या पक्षाच्या मुख्य मागण्या खालीलप्रमाणें आहेत—

(१) कम्युनिस्ट इंटरनॅशनल या संस्थेच्या पुढाऱ्यांनीं कोणत्याहि रीतीनें एखाद्या राष्ट्रांतील गटाला आर्थिक मदत देतां कामा नये. अत्यंत आणीबाणीच्या वेळीं फार तर तशी मदत देण्यांत यावी.

(२) सर्व परिस्थितीचा विचार करून कोणतें धोरण ठेवावयाचें हें त्या त्या देशांतील स्थानिक अशा पुढाऱ्यांच्या व कार्यकर्त्यांच्या विचारानें ठरवावें,

अर्थात् कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या मूलभूत अशा तत्त्वांना व कार्यक्रमाला त्यामुळें बाधा येतां कामा नये.

(३) ज्यांना कम्युनिस्ट इंटरनॅशनलमधून काढून टाकण्यांत आलें आहे त्यांना परत त्या संस्थेंत घेण्यांत आलें पाहिजे.

वरील धोरणानुसार रॉय यांच्या या विरोधी पक्षाचें कार्य सुरू झालें आहे. प्रत्येक देशांत या पक्षाचीं वर्तमानपत्रें प्रसिद्ध होत आहेत, व रॉय यांच्या लेखांना या पत्रांमधून प्रमुख स्थान देण्यांत येतें. सर्व प्रश्नांची पूर्वग्रहविरहित व निर्भीड चर्चा करून त्यांच्या अनुरोधानें जगांतील कामगार-चळवळीचा पाया मजबूत करणें व या चळवळीचा शास्त्रशुद्ध रीतीनें फैलाव करणें हें ध्येय या विरोधी पक्षापुढें आहे.

इंटरनॅशनलशीं जरी रॉय यांचा संबंध तुटला तरी इतर राष्ट्रांतून त्यांच्यावर असलेली बंदी कायम होतीच. थर्ड इंटरनॅशनलमधून निघाल्यानंतरहि रॉय हे बरेच दिवस जर्मनींत होते; परंतु तेथील कामगारांत त्यांनीं चालविलेली चळवळ जर्मन भांडवलदारांना पाहवली नाहीं. लोखंड आणि पोलाद कारखान्यांचे मालक 'लोकल ॲन् झीगर' नांवाचें एक वर्तमानपत्र जर्मनींत चालवीत असत. त्या वर्तमानपत्रांत जर्मनींतील भांडवलदारांनीं एक अग्रलेख लिहून रॉय यांची तावडतोब हकालपट्टी करण्याची मागणी केली. देशांतील शांतता व सुव्यवस्था, बिघडविण्यास हाच मनुष्य कारणीभूत होत आहे असें या पत्रानें ध्वनित केलें होतें. जर्मनींत एक राजकीय कैदी म्हणून राहूं नये येथपर्यंत जर्मन भांडवलदारांची मजल गेली होती. कोठें तरी जगभर भटकत भटकत आपल्या तत्त्वपालनार्थ व ध्येयसिद्ध्यर्थ दिवस कंठावेत असेंच कॉ. रॉय यांच्या नशिबीं लिहिलें होतें. किती जरी अडचणी आल्या व निरुत्साह होण्याचे किती जरी प्रसंग आले, तरी रॉय यांचा धीर खचला नाहीं अगर आपल्या चळवळीला रामराम ठोकण्याचा विचारहि त्यांच्या मनाला शिवला नाहीं. युरोपांत कालक्रमणा करण्याचा रॉय यांचा हा दुसरा प्रसंग होता.

---

# १८ रॉय यांचे हिंदुस्थानविषयक विचार : भाग १ ला

महायुद्धाच्या कालपर्यंत ब्रिटिश साम्राज्यशाहीला हिंदुस्थानांत आव्हानपूर्वक विरोध असा झालेला नव्हता. सुरुवातीस हिंदी राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांनीं जर कांहीं केलें असेल, तर हिंदी भांडवलवाल्यांची चाललेली गळचेपी व राजकीय पराधीनता, यांबद्दल मिळमिळीत निषेध करणें येवढेंच ! ब्रिटिश साम्राज्यशाही नष्ट करण्याची कल्पना त्यांच्या मनाला शिवलीसुद्धां नाहीं. केवळ सनदशीर चळवळ करून कांहीं किरकोळ सुधारणा मिळाल्या तर पाहाव्यात इतकी आकुंचित दृष्टि त्या वेळीं काँग्रेसची होती. नाहीं म्हणावयास बंगाल व महाराष्ट्र वगैरे भागांत ज्या कांहीं क्रांतिकारक गुप्त संस्था त्या वेळीं निघाल्या, त्या संस्थांच्या कार्यकर्त्यांच्या डोक्यांत ब्रिटिश साम्राज्यशाही उलथून पाडण्याची कल्पना घोळत होती. पण या कल्पनेच्या मागें असावी लागणारी जनतेची संघटना व त्यांना क्रांतिकारक मार्गावर यशस्वी रीतीनें पुढें खेचून नेईल असा बहुजन समाजाचा कार्यक्रम त्यांच्याजवळ नव्हता. तसेंच आधुनिक काळाला अनुरूप अशी स्पष्ट विचारसरणीहि क्रांतिकारक पुढाऱ्यांची नव्हती. अर्धवट धार्मिक व अर्धवट सामाजिक अशा कल्पनेंतच ते गुरफटून राहिले होते.

**ब्रिटिशांचें हिंदुस्थानांत आगमन**

हिंदुस्थान हा मुख्यतः शेतकीप्रधान देश असून शेंकडा ७१, म्हणजे अंदाजें २८ कोटी लोक शेतीवर अवलंबून आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. कांहीं प्रांतांत जमीनदारी पद्धति, कांहीं ठिकाणीं पूर्ण रयतवारी पद्धति, कांहीं ठिकाणीं वेठबिगारीचे व प्रत्यक्ष गुलामगिरीचे अवशेष अशी जरी हिंदुस्थानची सामाजिक स्थिति दिसत असली तरी आजची हिंदुस्थानची समाजपद्धति कोणती हें सांगावयाचें असेल, तर ती समाजपद्धति भांडवलदारी समाजपद्धति आहे असें म्हणण्यास कोणताच प्रत्यवाय नाहीं.

युरोपांतील देशांत ज्याप्रमाणें जुनी समाजपद्धति मोडून, त्या ठिकाणीं नवीन पद्धति आली तशी स्थिति मात्र हिंदुस्तानांत झाली नाहीं. परंतु ऐतिहासिक क्रमानें हिंदी भांडवलदारांची वाढ होत होत जुनी सरंजामदारी पद्धति हिंदुस्थानांतून नष्ट झाली असें नसून, परकीय सत्तेच्या आक्रमणामुळें या सरंजामशाहीस खो मिळाला ही फार महत्त्वाची गोष्ट आहे. ब्रिटिशांच्या आगमनाच्या वेळीं हिंदुस्थानांत हिंदी भांडवलदारवर्गाचा नैसर्गिक रीतीनें विकास होत होता. पूर्वी खेडेगांवांतून हस्तव्यवसाय करून राहणारे लोक आतां मोठमोठ्या शहरांत वस्ती करून मोठ्या प्रमाणावर व्यापाराकरितां माल तयार करूं लागले होते. याचा परिणाम म्हणजे श्रीमान् व्यापारीवर्ग त्या वेळीं हिंदुस्थानांत निर्माण झाला. अशा परिस्थितींत खरोखर श्रीमान् व्यापारी वर्गाकडून हिंदुस्थानांतील भांडवलशाही समाजपद्धतीला सुरुवात व्हावयाची ही निसर्गप्राप्त अशीच गोष्ट होती. इतर देशांतील इतिहासहि हेंच आपणास दाखवितो. परंतु अगदीं याच संधिकालाच्या सुमारास परकीय लोकांच्या आक्रमणानें हिंदी समाजोत्क्रांतीच्या नैसर्गिक मार्गांत अडथळा आला. जुनी सरंजामदारी पद्धति नष्ट होणें हें जें भांडवलशाही समाजपद्धति सुरू झाल्याचें एक लक्षण असतें ती गोष्ट ब्रिटिशांच्या आगमनानें हिंदुस्थानांत घडून आली; मात्र हिंदी भांडवलदारवर्ग हिंदुस्थानांत अधिष्ठित होण्याऐवजीं ब्रिटिश साम्राज्यशाही येथें ठाणें देऊन बसली हा काय तो महत्त्वाचा फरक झाला.

## साम्राज्यशाहीचे हिंदुस्थानवर झालेले परिणाम

ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं येथें आल्याबरोबर आपलें राजकीय वर्चस्व टिकविण्यासाठीं निरनिराळ्या युक्त्या योजण्यास प्रारंभ केला. पूर्वीचा सरंजामदारी-पद्धतींतील सरदारवर्ग नाहींसा करून जमीनमहसूल वसूल करणारा असा एक नवीनच जमीनदारांचा वर्ग त्यांनीं निर्माण केला. हिंदी समाजपद्धतीला जरी भांडवलशाहीपद्धतीचें नवीन वळण लागलें नव्हतें, तरी राजकीय सत्ता टिकवून धरण्यासाठीं जुन्या अवशेषांना ब्रिटिश साम्राज्यशाहीनें टिकवून धरलें व येथूनच पुढें हिंदी समाजाच्या भांडवलशाही पिळणुकीस खरी सुरुवात झाली. आतां हिंदुस्थानांत तयार होणाऱ्या मालानें, मग तो कोठेंहि

कोनाकोपऱ्यांत अगर कसल्याहि जुनाट साधनानें तयार होवो, स्थानिक मर्यादांचें उल्लंघन केलें व तो जगाच्या बाजारांत विक्रीकरितां मांडण्यांत येऊं लागला. जुन्या पद्धतीनें तयार केलेल्या मालाला आधुनिक साधनांनीं तयार केलेल्या मालाशीं टक्कर देणें अवघड जाऊं लागलें. माल बनविणारे कारागीर दारिद्र्यावस्थेंतून आपलें डोकें वर काढूं लागतील असें चिन्ह दिसेना. शेतीच्या जुन्या अवजारांत आधुनिक सुधारणा होणें अशक्य होऊन गेलें होतें व आधुनिक कालाला अनुरूप अशी औद्योगिक प्रगति हिंदुस्थानांत होणें अशक्य होऊन बसलें होतें.

इकडे प्रत्यक्ष शेतीसंबंधीं म्हणाल तर, शेतकरीवर्ग दिवसेंदिवस भुकेकंगाल बनत चालला. जवळ जवळ पिकणारी निम्मी जमीन हीं जमीनदारांच्या आणि संस्थानिकांच्या ताब्यांत व बाकीची जमीन परकीय सरकारच्या ताब्यांत अशी स्थिति झाली. थोडक्यांत म्हणजे, जो शेत कसणार तो शेतीचा मालक न राहतां एका व्यापारी पेठेचा गुलाम होऊन राहिला. सावकारांचें देणें, शेतसारा, जमीनदारांची लांचलुचपत वगैरे देणीं देऊन शिल्लक राहिलेलें उत्पन्न म्हणजे शेतीवर काम करणाऱ्या शेतकऱ्यांची 'मजुरी' होती. स्वतंत्र रीतीनें आपल्या हिकमतीनें मिळविलेला तो नफा नव्हता.

हस्तव्यवसाय करून पोट भरणाऱ्या लोकांच्या स्थितींत फारसा फरक पडणें शक्य नव्हतें. त्यांचीं तीं जुनाट अशीं साधनें जरी त्यांच्या मालकीचीं होतीं, तरी त्यांनीं तयार केलेला माल, बाजारांत आणून विकल्याखेरीज गत्यंतर नसल्याकारणानें व देवघेवीचे सर्व व्यवहार भांडवलदारी समाजरचनेवर अवलंबून असल्याकारणानें, उत्पादनाचीं साधनें मालकीचीं असूनसुद्धां हस्त-व्यवसायी वर्गाला त्या मालापासून व्हावा तसा फायदा होत नव्हता. लहान-लहान धंदे चालविण्यास सावकारांकडे तोंड वेंगाडण्याची त्यांच्यावर हरहमेष पाळी येई व पहिल्यापासून कर्जांत रुतून बसलेल्या या छोटेखानी वर्गाला आपल्या मालाची किंमत जितकी यावी असें वाटे, तितकी ती येईनाशी झाली. याचा परिणाम असा झाला, कीं स्वतः हस्तव्यवसाय करणारे लोक व त्यांचीं व्यवसायाचीं साधनें, हीं सावकारांच्या आणि व्यापाराचा मक्ता मिळालेल्या अशा बड्या व्यापारीवर्गाकडे गहाण जाऊन पडूं लागलीं. शेतीच्या मालाची

पैदास होण्याच्या अगोदरच, व्यापाराच्या देवघेवीनें मालाची किंमत ठरूं लागली. एकीकडे जमीनदार आणि दुसरीकडे सावकार व व्यापारी अशा या त्रिकुटाच्या हातीं देशांतील मालाच्या देवघेवीचे सर्व व्यवहार गेले व साम्राज्यशाहीच्या यंत्राचा एक महत्त्वाचा भाग असा हा जमीनदार, सावकार आणि व्यापारी यांचा वर्ग हिंदी राजकीय क्षितिजावर हळूहळू वर येऊं लागला.

दुसराहि एक महत्त्वाचा परिणाम, या हस्तव्यवसायी वर्गाच्या जीवनक्रमावर घडून येत होता. परदेशांतून यंत्रांच्या साहाय्यानें तयार होणाऱ्या मालाचे गठ्ठेच्या गठ्ठे व्यापारी पेठेंत ठाणें देऊन बसले. त्या मालाशीं स्पर्धा करून टिकाव धरावयाचा म्हटलें तर, मजुरी कमी करण्याशिवाय दुसरा मार्गच शिल्लक राहिला नव्हता. सरंजामशाहीनंतर ज्या वेळीं भांडवलशाही समाजरचना अस्तित्वांत येते, त्या वेळीं हस्तव्यवसाय करणाऱ्या वर्गाला औद्योगिक कारखान्यांतून मोठ्या प्रमाणावर काम मिळतें व पूर्वीचा हरहुन्नर करणारा इसम हा 'कामगार' या सदरांत येऊन पडतो. परंतु ब्रिटिशांच्या आगमनामुळें हिंदुस्थानांत हा स्वाभाविक बदल होणें शक्यच नव्हतें. जगांतील बाजारपेठेंत आपला माल विकावयास ठेवावयाचा, आणि परदेशी लोक औद्योगिक प्रगतीच्या मार्गावर झपाझप पावलें टाकीत असतांना आपण मात्र जुन्या हस्त-व्यवसायांना व साधनांना चिकटून राहावयाचें, हें धोरण ठेवून कसें चालेल?

या परिस्थितीचें चित्र कॉ. रॉय यांनीं खालीलप्रमाणें रेखाटलें आहे. कॉ. रॉय म्हणतात, "हिंदी समाजाच्या स्वतंत्र व अनियंत्रित अशा प्रगतीला जी पूर्वकालीन सरंजामदारशाही पद्धति आडवी येत होती, ती टिकविण्यांतच वसाहतींतील भांडवलशाहीचा फायदा होता. कारण वसाहतींतील भांडवलशाही ही साम्राज्यशाहीच्या नियंत्रणाखालीं असल्याकारणानें, साम्राज्यशाहीच्या राजकीय वर्चस्वासाठीं जुने अवशेष टिकविणें हें अत्यंत जरूर होतें. भांडवलशाहीची वाढ ज्या औद्योगिक प्रगतीवर अवलंबून असते, तशी औद्योगिक प्रगति, हिंदुस्थानांत ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या धोरणामुळें होऊं शकली नाहीं. तेव्हां आपल्या देशांतील संस्थानिक व जमीनदार यांची सरंजामदारी नष्ट करून, आतां आपण भांडवलशाहीच्या युगास प्रारंभ करूं या, असें ज्यांना वाटत असेल त्यांची ती चूक आहे. कारण ब्रिटिश साम्राज्यशाहीनें हिंदी सरंजामदारवर्ग मुद्दाम

आपल्या राजकीय वर्चस्वासाठीं टिकवून धरलेला आहे. म्हणून सरंजामशाही नष्ट करतांना, आपल्याला साम्राज्यशाहीशीं लढा द्यावा लागेल व 'इंद्राय तक्षकाय स्वाहा' या न्यायानें, सरंजामशाहीबरोबर साम्राज्यशाही नष्ट होईल त्या वेळीं, भांडवलशाही हिंदुस्थानांत राहणें शक्य नाहीं.

महायुद्धाच्या कालात हिंदी लोकांची जी मनस्वी पिळवणूक झाली त्या योगानें एकंदर राजकीय परिस्थितीचा नूरच पालटून गेला. बहुजन समाजांत असंतोषाचा वारा पूर्वींपेक्षां जोरानें वाहूं लागला होता. तसें म्हटलें तर ही परिस्थिति एक प्रकारें पथ्यावरच पडली. कारण त्या योगानें बहुजन समाजांत अभूतपूर्व अशी जागृति तरी झाली. त्या वेळेस हिंदुस्थानांत शेतकऱ्यांच्या असंतोषाबरोबर कामगारांचे संप हा नेहमींचा कार्यक्रम होऊन बसला होता.

### शेतकरी-क्रांतीचें रहस्य

शेतकरीक्रांतीसंबंधानें रॉय लिहितातः—हिंदुस्थानांत इतर देशांप्रमाणें औद्योगिक प्रगति व्हावी असें वाटत असेल तर, शेतकरीसमाजाचा प्रश्न हा अगोदर सोडविला पाहिजे. हिंदी समाजपद्धतींत आमूलाग्र क्रांति घडून आली पाहिजे. उत्पादनाचीं जुनीं साधनें फेकून देऊन, त्या ठिकाणीं आधुनिक साधनें उपयोगांत आणलीं पाहिजेत. पण हें सर्व केव्हां शक्य होईल? जेव्हां आपण जुने समाजसंबंध, जुनी सरंजामपद्धति व तिचे कांहीं अर्धवट टिकून राहिलेले अवशेष उचलून फेकून देऊं तेव्हां! जमिनीच्या मालकीहक्काचे संबंध अशा रीतीनें बनले गेले आहेत, कीं जमिनीच्या उत्पन्नाचा बराच मोठा भाग हा शेत कसणाऱ्याच्या हातींच कधीं लागत नाहीं. शेती सुधारण्यासाठीं उत्पादनाचीं साधनेंच नुसतीं आपण बदलूं म्हटलें, तर ती गोष्ट अशक्य आहे. कारण साधनांबरोबर मालमत्ता व जमीनजुमला यांच्या मालकीहक्काचे संबंधहि बदलावयास पाहिजेत. शेतकरी लोकांच्या हातांत ज्या वेळीं जमिनींत पिकलेला बराचसा माल राहील त्याच वेळीं शेतीचीं साधनें बदलतील व उत्पादनाचे नवीन नवीन प्रकार समाजांत अमलांत येतील.

### खऱ्या राजकीय लढ्यास सुरुवात

महायुद्धानंतर जगांतील सर्व राष्ट्रांची आर्थिक घडी बिघडून गेली, मग त्याला हिंदुस्थान तरी एकटाच अपवाद कसा राहणार! महायुद्धानंतर

हिंदुस्थानांत कामगारवर्ग झपाट्यानें वाढत होता. व्यापारी व कारखाने यांवर अवलंबून राहणाऱ्या लोकांची संख्या ५ कोटी ६० लक्षांपर्यंत गेली होती. वारंवार कामगारांचे प्रचंड संप होणें व कारखानदारांनीं कारखाने बंद ठेवणें हा त्या काळीं एक शिरस्ताच पडून गेला होता. आपल्या मागण्यांसाठीं स्वतंत्र रीतीनें झगडणारा असा कामगारवर्ग प्रामुख्यानें हिंदुस्थानांत पुढें येऊं लागला. या प्रकारानें ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या हृदयांतहि धडकी भरली. जनतेंतील असंतोषाचें प्रमाण वाढूं लागलेलें पाहून, साम्राज्यशाहीनें जनतेला झुलविण्यासाठीं १९१९ च्या मॅंटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणांच्या रूपानें राजकीय सुधारणांचा एक तुकडा हिंदी जनतेपुढें फेकून दिला. यामध्यें मात्र हिंदी भांडवलवाल्यांना थोड्या सवलती मिळाल्या; नाहीं असें नाहीं. महायुद्धासारख्या आणीबाणीच्या प्रसंगीं हिंदी भांडवलदारवर्ग इमानें-इतबारें साम्राज्यशाहीला मदत करीत होता. ब्रिटनला त्या वेळीं युद्ध यशस्वी रीतीनें चालविण्याकरितां हिंदुस्थानांतील मनुष्यबळ, व द्रव्यबळ यांची फार जरूर होती. प्रत्यक्ष म. गांधींनींहि त्या वेळीं ब्रिटिश सरकारला मदत केलेली असून त्या वेळच्या सरकारी रिपोर्टांतून म. गांधींचें नांव मोठ्या गौरवानें उल्लेखिलें गेलेलें आहे.

१९१९ सालीं मात्र अमृतसर येथें जालियनवाला बागेंत निरपराधी हिंदी स्त्री-पुरुषांची कत्तल करून, हिंदी लोकांच्या मदतीची फेड हिंदी लोकांच्याच रक्तपातानें करण्यांत आली. शिवाय रौलेट कायद्यानें लोकांचे साधे हक्कहि हिरावून घेण्यांत आले. या दडपशाहीनें लोकांत नवचैतन्य उत्पन्न झालें व त्यांच्या सरकारविरोधी भावना अधिकच प्रक्षुब्ध झाल्या; आणि याचा परिणाम म्हणून कॉंग्रेसच्या चळवळीला अधिकाधिक भरतें येऊं लागलें. या नवीन सुधारणा टाकाऊ व असमाधानकारक आहेत म्हणून त्यांवर बहिष्कार टाकण्याचा निश्चय कॉंग्रेसनें जाहीर केला. म. गांधींच्या नेतृत्वाखालीं बार्डोली येथील इतिहासप्रसिद्ध सत्याग्रहास सुरुवात झाली. खरोखर बार्डोली तालुक्यांतील असंतुष्ट झालेल्या अशा शेतकऱ्यांच्या एकजुटीनें या लढ्याला तीव्र स्वरूप आलें. आतांपर्यंत समाजांतील वरिष्ठ व श्रीमंत वर्गांचे प्रस्थ हिंदी राजकारणांत फार माजलें होतें. त्यांच्याच हातीं कॉंग्रेसचीं सूत्रें होतीं असें म्हणण्यास हरकत नाहीं. व्यापारी वर्गानें असेंब्लीमधून कॉंग्रेसच्या या सुधारणा-

बहिष्काराला विरोध केला. इतकेंच : नव्हे, तर हिंदी स्वातंत्र्याचा हा लढा नेस्तनाबूत करण्यासाठीं त्यांनीं प्रत्यक्ष साम्राज्यशाहीच्या हाताला हात मिळविण्यास कमी केलें नाहीं. महात्माजींच्या नेतृत्वाखालीं सत्याग्रह संग्रामास सुरुवात झाली. तथापि हा लढा शेवटपर्यंत लढावा, संपूर्ण स्वातंत्र्य मिळेतों हा लढा नेटानें पुढें चालवावा, अशी पुढाऱ्यांची मनापासून इच्छा नव्हती. 'अनत्याचारी असहकारितेचें' पर्यवसान अत्याचारी दंगे व जाळ-पोळीमध्यें होऊं लागले. चौरीचुरा व इतर भागांत दंग्याची लाट उसळली. सत्यासत्य, हिंसा-अहिंसा या नीति-कल्पनांचे बांध फोडून राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्याचा ओघ हां-हां म्हणतां पुढें जाऊं लागला. महात्माजींनीं सुरू केलेली ही चळवळ त्यांना शेवटीं सोडून देणें भाग पडलें.

### राजकारणांतील आंधळ्या कोशिंबिरीचा खेळ

जनतेसमोर स्पष्ट असा राजकीय कार्यक्रम नसल्यामुळें, राष्ट्रीय स्वातंत्र्याची ही चळवळ पुढें जाऊं शकली नाहीं. तसेंच या चळवळीचा पायाच मुळीं, कांहीं अंशीं धार्मिक व कांहीं अंशीं नैतिक, अशा चुकीच्या कल्पनेवर रचला गेल्यामुळें चळवळ खचण्यास फारसा वेळ लागला नाहीं. खिलाफत चळवळीच्या भूमिकेवर हिंदु-मुसलमानांची एकी किती वेळ टिकून राहणार! हिंदु व मुसलमान समाजाच्या आर्थिक व राजकीय मागण्यांवर जर या चळवळीचा भर देण्यांत आला असता तर या राष्ट्रीय लढ्याचें खात्रीनें निराळेंच स्वरूप दिसलें असतें. ८५ टक्के लोकसंख्येच्या मागण्या या साम्राज्यविरोधी राजकीय चळवळींत समाविष्ट करावयास पाहिजे होत्या. परिस्थिति अनुकूल असतांनाहि जनतेला राजकीय लढ्याची स्पष्ट कल्पना आली नाहीं. राजकीय चळवळीचा जरी हा गाडा अडखळत अडखळत चालला होता, तरी या नाहीं त्या रीतीनें योग्य मार्ग दाखविण्याचे प्रयत्न निरनिराळ्या दिशांनीं चालू होते. कॉंग्रेस-मध्यें काम करणारा असा तरुण बुद्धिमान् वर्ग याच सुमारास कामगारचळवळी-कडे ओढला जात होता.

हिंदुस्थानांतील कामगार-चळवळ योग्य मार्गानें चालावी, या गोष्टीकडे कॉ. रॉय यांचें १९१९ पासून लक्ष होतें. कामगारांच्या आर्थिक मागण्यांवर भर देऊन त्यांची प्रथम संघटना करा, या मागण्या मालकांकडून मान्य करून घेण्यासाठीं

कामगारांना लढे करण्याचें शिक्षण द्या, व अशा रीतीनें हळूहळू कामगारवर्गाला वर्गयुद्धाच्या भूमिकेवर राजकीय लढ्याची तयारी करण्यास त्यांना सांगा, असा कॉ. रॉय यांचा त्या वेळीं हिंदुस्थानांतील कार्यकर्त्यांना इशारा होता. कामगारवर्गाला आपल्या वर्गसंस्थांचें महत्त्व कळलें व सामुदायिक लढ्याचें शस्त्र म्हणून आपल्या वर्गसंस्थेकडे कामगार पाहूं लागले, म्हणजेच कामगारसंघ हे साम्यवादी चळवळीचीं केंद्रें बनतात व त्यांतूनच पुढें कामगारांना राजकीय पक्षाची आवश्यकता भासते, असें रॉय यांचें म्हणणें होतें. कामगारवर्गाचा राजकीय पक्ष स्थापावा म्हणून १९२१ सालीं लाहोर येथें कामगारकार्यकर्त्यांची एक बैठक बोलावण्यांत आली होती. त्या वेळीं कामगारांच्या राजकीय चळवळीबद्दल कॉ. रॉय यांनीं एक पत्रक पाठविलें होतें त्यांत ते म्हणतात—

**राष्ट्रीय क्रांति व कामगारचळवळ**

"ज्या कार्यक्रमाच्या आधारावर साम्राज्यविरोधी लढ्यांत कामगारवर्ग आपलेपणानें भाग घेईल असा कार्यक्रम आपण आंखला पाहिजे व पुढील लढ्याची तयारी केली पाहिजे. हा कार्यक्रम आंखतांना आपण कोणत्या हेतूनें व कोणत्या ध्येयानें कार्यक्रम आंखतों याची स्पष्ट कल्पना पाहिजे. थोडक्यांत म्हणजे कामगार व शेतकरी वर्ग यांच्या मागण्यांसंबंधीं विचार करीत असतांना, महत्त्वाच्या राजकीय अशा प्रश्नांकडे कानाडोळा करून चालणार नाहीं. कामगारवर्गाचा स्वतंत्र राजकीय पक्ष असावा अशी कांहीं तरुणांची कल्पना आहे. हिंदुस्थानांतील कोणत्याहि राजकीय पक्षापुढें अत्यंत निकडीचा असा कोणता प्रश्न असेल, तर तो राष्ट्रीय स्वातंत्र्याचा. हिंदी राष्ट्रीय स्वातंत्र्याचा प्रश्न आपण कसा सोडवूं शकूं, या प्रश्नाचें समाधानकारक उत्तर देण्यावरच कोणत्याहि राजकीय पक्षाचें भवितव्य अवलंबून आहे. कामगारांच्या केवळ आर्थिक मागण्या पुढें ठेवणें हें एखाद्या राजकीय पक्षाचें ध्येय होऊं शकत नाहीं. कारण हें ध्येय साम्राज्यशाहीच्या चौकटींत साध्य होणें शक्य नसतें, म्हणून आपल्या राजकीय ध्येयांत परकीय सत्तेशीं झगडा करणें याचा अंतर्भाव केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. कामगारपक्ष हा कोणत्याहि पिळणुकीविरुद्ध बंड करण्यास उभा ठाकलेला आहे. देशांतील उत्पादनाचीं साधनें आपल्या हातांत येणें हीच राष्ट्रीय स्वातंत्र्याची खरीखुरी व्याख्या कोणीहि करील.

वर्गवर्चस्वविरहित अशी समाजरचना हें आपलें अंतिम ध्येय; परंतु तें साध्य होण्याच्या मार्गांतील कांटेकुटे व खाचखळगे नाहींसे करावयाचे असतील; तर राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्यासच आपण प्रथम हात घातला पाहिजे. आमच्या कांहीं मित्रांचें असें म्हणणें आहे, कीं आपल्याला राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्याशीं काय करावयाचें आहे ? कामगारवर्गाच्या दैनंदिन मागण्यांशीं राष्ट्रीय स्वातंत्र्याचा फारसा संबंध येत नाहीं. शिवाय आपण जर या राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या चळवळींत अडकलों तर सरकारचा आपल्यावर निष्कारण रोष होईल, तो निराळाच. मला वाटतें राजकीय परिस्थितीचा अशा रीतीनें विचार करणें म्हणजे गांवढळपणाची कमाल आहे. जर कामगारवर्गाला राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या प्रश्नाबद्दल फारशी आस्था वाटत नाहीं असें आपल्यास वाटत असेल, तर या प्रश्नाचें महत्त्व त्यांच्या मनावर ठसविण्यासाठीं एक क्षणाचाहि विलंब न करतां आपण कामाला लागलें पाहिजे. दुसरी गोष्ट म्हणजे सरकारी अवकृपेची. आपल्या ध्येयाप्रमाणें आपण मनःपूर्वक कामास हात घातला म्हणजे सरकारी अवकृपा थांबेल ही गोष्ट कोणी स्वप्नांत सुद्धां आणूं नये. वरिष्ठ व ऐतखाऊ अशा वर्गाशीं लढा करण्याची तयारी केल्याखेरीज, तुम्ही कामगारांच्या आर्थिक मागण्या मिळवून देऊं शकाल हें कधीं तरी शक्य झालें आहे काय ? व मग या वरिष्ठ वर्गाशीं दोन हात करण्याची तुम्ही तयारी करूं लागलांत म्हणजे सरकारी राज्ययंत्र तुम्हांला स्वस्थ बसूं देईल असें तरी तुम्हांस वाटतें काय ? सरकारी रोषच टाळावयाचा असेल व सरकारी अवकृपेस पात्र न होतां कामगारांच्या मागण्या मिळवून देण्याची खटपट करावयाची असेल, तर त्याला एकच मार्ग मोकळा आहे, आणि तो म्हणजे सुधारणावाद हा होय. भांडवलशाहीशीं सहमत करून व तिच्या सहकार्यानें जर कामगारांच्या कांहीं आर्थिक मागण्या पूर्ण करून घेणें हा आपला उद्देश असेल तर मात्र आपणांला भिण्याचें मुळींच कारण नाहीं. पण हा उद्देश पुढें ठेवून आपल्याला कोणताहि राजकीय पक्ष स्थापन करतां येणार नाहीं. कारण राजकीय पक्ष म्हटला म्हटजे साम्राज्यशाहीशीं व भांडवलशाहीशीं विरोध हा ठरलेलाच आहे. तसा जर सुधारणावादी मवाळ पक्ष स्थापन केला, तर त्याचा परिणाम इतकाच होईल, कीं कामगारवर्गाच्या गळ्याभोंवतीं असलेल्या शृंखला अधिक आवळून टाकण्याचें पाप आपल्या हातून घडेल. व त्या शृंखला तोडून कामगार-

वर्गाला अजीबात स्वतंत्र करण्याचें तर आपलें ध्येय आहे. तेव्हां आपल्याला अगदीं शेवटपर्यंत क्रांतिकारक लढा चालविण्यावेरीज आपल्यापुढें दुसरा कोणताच मार्ग मोकळा नाहीं."

रॉय यांचें पहिल्यापासूनच असें म्हणणें होतें कीं, देशांतील क्रांतिकारक विचाराच्या तरुणांनीं राष्ट्रीय क्रांतीचा कार्यक्रम देशापुढें ठेवण्यासाठीं कॉंग्रेसमधून चळवळ करावी. १९२१ सालींच अहमदाबाद येथील कॉंग्रेसमध्यें हजरत मोहानी यांनीं संपूर्ण स्वातंत्र्याचा ठराव आणला होता. ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या बऱ्याचशा सभासदांशीं रॉय यांचा या सुमारास परिचय होत चालला होता. प्रत्यक्ष कै. देशबंधु दास यांच्याशींहि रॉय यांनीं निकट परिचय करून घेतला. १९२२ सालीं गया कॉंग्रेसचें अधिवेशन कै. देशबंधु दास यांच्याच अध्यक्षतेखालीं झालें त्या वेळीं दे. बं. दास यांनीं जें भाषण केलें, त्यांतील महत्त्वाचा व अर्थपूर्ण भाग अद्याप हिंदी जनतेच्या कानांत घुमत असेलहि. "गोऱ्या नोकरशाहीऐवजीं काळ्या नोकर-शाहीचें राज्य हिंदुस्थानांत झालें म्हणजे हिंदुस्थानला स्वराज्य मिळालें असें नसून, शेंकडा ९० लोकांच्या हातांत जेव्हां सत्ता येईल त्या वेळीं हिंदी लोकांना स्वातंत्र्य मिळालें असें म्हणतां येईल." अशा अर्थाचे उद्गार त्या वेळीं कॉंग्रेसच्या अध्यक्षपदावरून कै. दे. बं. दास यांनीं काढले होते. या भाषणावर टीका करतांना साम्राज्यवादी वर्तमानपत्रांनीं दे. बं. दास यांच्यावर बोल्शेव्हिक झाल्याचा आरोप करण्यास कमी केलें नाहीं.

**स्वराज्यपक्षाची स्थापना**

म. गांधींच्या चळवळीमुळें हिंदी बहुजन समाजांत राजकीय ज्ञानाचा प्रसार झपाट्यानें होऊं लागला हें कबूल केलेंच पाहिजे. परंतु बहुजन समाजापुढें जसा कार्यक्रम ठेवावयास पाहिजे तसा ठेवला न गेल्यामुळें, कॉंग्रेसमधून क्रांति-कारक चळवळीचा उगम होण्याऐवजीं, असहकारितेची चळवळ थंडावल्यावर कॉंग्रेस पुन्हा पूर्वपदावर गेली व याच सुमारास म्हणजे १९२३ सालीं स्वराज्य-पक्षाचा जन्म झाला.

कौन्सिल-बहिष्कार हा कॉ. रॉय यांना पहिल्यापासूनच मान्य नव्हता. कौन्सिलांत जाऊन त्यांचा उपयोग साम्राज्यविरोधी चळवळीकडे कसा करून

घेतां येईल हें कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांनीं पाहिलें नाहीं. कौन्सिलांतूनहि लोकांच्या मागण्यांवर भर देण्याचें कार्य जास्त जोरानें करतां आलें असतें असें रॉय यांचें म्हणणें होतें. इकडे हा जो स्वराज्य पक्ष कॉंग्रेसमध्यें उत्पन्न झाला, तो हिंदी भांडवलदारवर्गाचा पक्षपाती होता यांत मुळींच शंका नाहीं. देशी भांडवलदार व जमीनदार यांच्या हिताला आम्ही धक्का लावणार नाहीं असें स्वराज्य पक्षांतील प्रमुख पुढाऱ्यांनीं जाहीर रीतीनें जनतेला सांगितलेलें आहे. स्वराज्य पक्षांतील लोकांची कौन्सिलांतील कामगिरी पाहिली म्हणजेहि हेंच दिसून येतें. बंगाल कौन्सिलांत जमीनदारांच्या आक्रमणापासून कुळांचें संरक्षण करणारा असा एक कायदा सरकारनें आणला होता, त्याला स्वराज्य पक्षाच्या लोकांनीं विरोध केला व पंजाब कौन्सिलांतहि सावकारनियंत्रण बिलाला पाठिंबा न दिल्यामुळें तें बिल नापास झालें. स्वराज्य पक्षाच्या या सनदशीर व सुधारणावादी मवाळ धोरणामुळें देशाचें पाऊल स्वराज्याच्या मार्गावर पुढें पडावयाचें तें बाजूलाच राहिलें. उलट लोकाच्या चळवळीचा जोर अंशाअंशानें कमी होत गेला. अनत्याचारी असहकारितेच्या चळवळीनें लोकक्षोभाला बरोबर मार्ग न सांपडल्यामुळें, जनतेच्या शक्तीचा अपव्यय झाला व स्वराज्यपक्षाच्या सुधारणावादी धोरणामुळें राष्ट्रीय चळवळींतील कार्यकर्त्यांत दोन पक्ष पडले. १९२३ सालीं डॉ. रॉय यांनीं त्या वेळच्या एकंदर परिस्थिति-संबंधीं लिहितांना खालीलप्रमाणें उद्गार काढले आहेत.

**सत्यासत्य आणि हिंसा-अहिंसा यासंबंधीं विचार**

"वैयक्तिक अत्याचार हा कांहीं प्रसंगीं योग्य असेल, पण कांहीं प्रसंगीं तो अस्थानींहि होतो. काळ वेळ न पाहतां अत्याचार करीत सुटणें यामुळें जनतेमधील क्रांतिकारक शक्ति कमी होते; परंतु याचा अर्थ मात्र असा नव्हे, कीं राजकीय चळवळींत अत्याचाराचा अवलंब करणें हा नैतिक आचरणाच्या दृष्टीनें मोठा गुन्हा आहे. हिंसा हें पाप आहे असें या क्रांतिकारक तरुणांवर बिंबविण्याऐवजीं त्यांना सामाजिक क्रांतीचा योग्य मार्ग दाखवा म्हणजे त्यांचा राजकीय चळवळींत किती उपयोग होतो तें समजेल. या तरुणांपैकीं कांहींजणांनीं असहकारितेच्या चळवळींत भाग घेण्याची इच्छा दर्शवितांच त्यांना जणूं काय वाळींत टाकण्यांत आलें. या क्रांतिकारक विचारसरणीच्या

तरुणांमध्यें किती शक्ति आहे याची आमच्या राजकीय पुढाऱ्यांना कल्पना करतां आली नाहीं.

"अवेळीं केलेली हिंसा ही अहिंसेपेक्षां जास्त घातुक असते. अहिंसेच्या तत्त्वज्ञानानें क्रांतिकारक तरुणांच्या मनांत सुरुवातीसच शंका-कुशंका येऊं लागतात. तसेंच अवेळीं हिंसेचा जयघोष केल्यानें चळवळीची हानि होते. राष्ट्रीय स्वातंत्र्याचा लढा व अहिंसेचें तत्त्वज्ञान हीं परस्परांना पूरक नाहींत हें जनतेला समजावून सांगतांना, वेळीं-अवेळीं मागचा पुढचा विचार न करतां रक्तपात व अत्याचार करीत सुटा असें जनतेला सांगितलेंच पाहिजे असें नाहीं. अहिंसा असो किंवा दुसरा कोणताहि मार्ग असो, तो मार्ग म्हणजे राष्ट्राचें अंतिम ध्येय नसून, स्वातंत्र्याच्या ध्येयपूर्तीचें तें एक साधन असतें. राजकीय कार्यकर्त्यांनीं ज्याप्रमाणें रक्तपात व अत्याचार यावरच सारखा भर देत राहणें वेडेपणाचें आहे, तसेंच सत्य व अहिंसा यांची रात्रंदिवस जपमाळ ओढीत बसणें तितकेंच घातुक आहे."

कॉ. रॉय यांच्या लिखाणांतून हिंदी राजकीय लढ्यासंबंधीं स्पष्ट असे विचार बाहेर येऊं लागले व त्यांच्या विचारांचा पगडा हिंदी तरुणांच्या मनावर जास्त जास्त बसूं लागला. म. गांधींच्या असहकारितेच्या चळवळीचा बोजवारा उडाल्यानंतर, साहजिकच तरुणांचीं मनें दुसरे मार्ग शोधूं लागलीं व रॉय यांच्या स्पष्ट विचारसरणीनें त्या वेळच्या बऱ्याचशा कॉंग्रेस कार्यकर्त्यांचें व क्रांतिकारक तरुणवर्गाचें लक्ष रॉय यांच्याकडे लागून राहिलें.

**कानपूर कटाचा खटला**

या सुमारास मॉस्कोहून कांहीं तरुण परत हिंदुस्थानात आले होते. रशियन कामगारक्रांतीचा परिणाम त्यांच्या मनावर झालेला होता व हिंदुस्थानांत परत आल्यावर या तरुणांनीं कामगारवर्गाच्या संघटनेकडे विशेष लक्ष देऊन कार्यास सुरुवात केली.

महायुद्धाच्या कालापर्यंत हिंदुस्थानांत संप किंवा कामगारसंघ यांचें नांवहि कोठें ऐकूं येत नसे. महायुद्धानंतर मात्र ही स्थिति पालटली. कामगारांचे संप होणें हा नेहमींचा शिरस्ताच होऊन राहिला. कामगारसंघाची स्थापना ठिकठिकाणीं होऊं लागली. १९१९ ते १९२४ सालापर्यंत कापडाच्या

व तागाच्या गिरण्या, लोखंडी व पोलाद कारखाने, कोळशाच्या खाणी, रेल्वे या ठिकाणीं मोठमोठाले संप घडून आले. कामगारांनीं संघस्थापनेस सुरुवात केली. कामगारांच्या या संघटनेच्या अगदीं सुरुवातीसच ब्रिटिश साम्राज्यशाहीनें दडपशाहीचें हत्यार उपसलें. १९२४ सालांत कित्येक कॉंग्रेस कार्यकर्त्यांस, त्यांनीं कामगार-चळवळींत भाग घेतल्याच्या आरोपावरून, पकडण्यांत येऊन त्यांस तुरुंगांत डांबण्यांत आलें व हिंदुस्थानांतील ब्रिटिश राजसत्ता नष्ट करण्यासाठीं कॉ. रॉय यांच्या सहकार्यानें कट केल्याच्या आरोपावरून इं. पि. कोड १२१ कलमाप्रमाणें भाई डांगे, भाई उस्मानी, भाई मुझफर अहमद, भाई गुप्त व इतर कांहीं तरुण कार्यकर्ते यांच्यावर खटला भरण्यांत आला. हा खटला कानपूर कटाचा खटला या नांवानें प्रसिद्ध आहे. या खटल्यांतून हे आरोपी निर्दोषी सुटतील अशी आशा नव्हतीच व अपेक्षेप्रमाणें सर्व कार्यकर्त्यांना निरनिराळ्या मुदतीच्या शिक्षा देण्यांत आल्या. या खटल्यांत जो महत्त्वाचा म्हणून पुरावा कोर्टापुढें सादर करण्यांत आला, त्यांत मुख्यतः कॉ. रॉय यांचे लेख, पत्रें, जाहीरनामे यांचाच विशेष भरणा होता. खालच्या कोर्टानें आरोपींना शिक्षा फर्माविल्या व या शिक्षेविरुद्ध हायकोर्टाकडे अपील करण्यांत आलें. अलाहाबाद हायकोर्टानें अपील फेटाळून देऊन खालील कोर्टानें दिलेल्या शिक्षा कायम केल्या.

### जागतिक आर्थिक अरिष्ट व हिंदी स्वातंत्र्याचा लढा

या वेळच्या हिंदी राजकीय परिस्थितीसंबंधानें कॉ. रॉय म्हणतात—

“ परकीय साम्राज्यशाहीच्या छत्राखालीं असणाऱ्या वसाहतींची आर्थिक रचनाच अशी बनत जाते कीं, देशी भांडवलदारांना आपल्या धंद्यांना संरक्षण मिळणें हेंच मोठें भाग्याचें लक्षण आहे असें वाटतें. हिंदुस्तानांतील सध्यांच्या परिस्थितींत ‘संरक्षणाचें तत्त्व’ हें हिंदी भांडवलदारांना उलट घातुकच आहे, हें त्यांच्या लक्षांत येत नाहीं. धंद्यांना संरक्षण मिळाल्यामुळें फार तर तात्पुरता फायदा हिंदी भांडवलवाल्यांना मिळेल. परंतु संरक्षणाच्या तत्त्वानें वस्तूंच्या किंमती वाढल्या म्हणजे, वाढलेली किंमत देण्याची ताकद हिंदी जनतेंत विशिष्ट मर्यादेपलीकडे नाहीं, हें त्यांच्या ध्यानांत येत नाहीं.

उद्योगधंद्यांची खरीखुरी वाढ ही संरक्षणाच्या तत्त्वानें होत नसून, देशांतील बहुजन समाजाची क्रयशक्ति वाढल्यानें होते, हें मूलभूत आर्थिक तत्त्व हिंदी भांडवलवाल्यांच्या संकुचित स्वार्थी दृष्टीला कसें दिसणार !

महायुद्धानें हिंदी जनतेच्या डोक्यावर कराचा अधिक बोजा बसला. महायुद्धापूर्वीचें वसाहतींतील साम्राज्यशाहीचें धोरण आतां हळूहळू बदलूं लागलें. हिंदी जनता कंगाल झालेली होती. महायुद्धाच्या काळांत थोडीं सुबत्तेचीं लक्षणें दिसूं लागलीं. परंतु हीं कृत्रिम सुबत्ता फार वेळ तर टिकली नाहींच, उलट थोड्याच अवकाशांत हिंदी जनतेच्या दारिद्र्यांत गणितश्रेढीनें भर पडत चालली. इंग्लंडचें देणें देण्यासाठीं आतांपर्यंत हिंदी मालाची निर्यात आयातीपेक्षां अधिक होत होती, ती महायुद्धानंतर थांबली व देणें तर आपल्याला सुटत नाहीं, अशा स्थितींत इंग्लंडची आयात कमी करणें हाच एक मार्ग मोकळा होता. इंग्लंडची आयात थांबविणें म्हणजे इंग्लंडची हिंदी बाजारपेठ बंद करण्यासारखें होतें. साम्राज्यशाहीच्या आर्थिक रचनेंत हा मोठा पेचप्रसंग उत्पन्न झाला होता व तो सोडविण्याचें कार्य ब्रिटिश साम्राज्यशाहीनें मोठ्या कौशल्यानें केलें. वसाहतींतील आर्थिक धोरणाला महायुद्धानंतर अगदीं निराळें असें वळण मिळालें. "लढाईला सुरुवात झाली म्हणजे जो माल राष्ट्राच्या जीवनास आवश्यक असतो, तो उत्पन्न करण्याचे असे धंदे हिंदुस्थानांत सुरू करावेत." अशा अर्थाचा स्पष्ट अभिप्राय १९१६ सालीं नेमलेल्या सरकारी औद्योगिक कमिशननें दिलेला आहे. महायुद्धानें युरोपांतील सर्वच राष्ट्रांची आर्थिक स्थिति बिघडून गेली. जनतेंत मुळींच त्राण उरलें नाहीं. युद्धाच्या काळांत ब्रिटिश जहाजें संरक्षणाच्या व युद्धाच्या कामीं गुंतलीं होतीं. तेव्हां अमेरिका व जपान या राष्ट्रांनीं ही संधि साधून जगांतील बाजारांत आपलें वर्चस्व स्थापन केलें. जर्मनी, बेल्जम या राष्ट्रांनीं चलनविषयक धोरण बदलल्यामुळें मालाच्या किंमती उतरविल्या व बाजारपेठेंत आपला माल स्वस्त दरानें विकण्याचा सपाटा चालविला. यामुळें ब्रिटनच्या व्यापाराला सारखी ओहोटी लागली. हिंदुस्थानसारख्या अफाट क्षेत्रांत आपला माल खपविण्यासाठीं प्रयत्न करावा, तर तेथील जनतेंत तितकें त्राण उरलें नव्हतें. हिंदी जनतेची क्रयशक्ति वाढल्याखेरीज आपल्या मालाला दुसरी बाजारपेठ मिळणें शक्य नाहीं हें ब्रिटिश

व्यापाऱ्यांना कळून चुकलें. हिंदी लोकांची क्रयशक्ति वाढविणें म्हणजे हिंदी लोकांना अधिक माल तयार करण्याची संधि देणें. अशा या विलक्षण परिस्थितींत ब्रिटिश साम्राज्यशाहीला आपलें वसाहतींतील आर्थिक धोरण बदलणें भाग पडलें; व हिंदी उद्योगधंद्यांच्या वाढीला उत्तेजन देणें हा एकच मार्ग त्यांना त्या वेळीं पटला. ब्रिटिश भांडवलाच्या सहायानें हिंदुस्थानांत नवीन नवीन उद्योगधंदे उभारावेत, तर ब्रिटिश भांडवलाची तितकी तयारी नव्हती. महायुद्धापूर्वी, ब्रिटिशांचें शेंकडा तीस टक्के भांडवल इंग्लंडमध्येंच राहत असे व बाकीचें दुसऱ्या देशांतून गुंतविलें जाई. महायुद्धानंतर बरोबर याच्या उलट स्थिति झाली. देशांतील उद्योगधंद्यांना अधिक भांडवलाची जरूर लागूं लागली व परदेशांत गुंतविण्यासाठीं ब्रिटिश भांडवलवाल्यांजवळ अधिक पैसा शिल्लक राहीना. एक काळ तर असा आला, कीं इंग्लंडच्या बाहेर ब्रिटिश भांडवल पाठविण्याची कायद्यानें बंदी करण्यांत आली. ब्रिटिशांचें भांडवल हिंदुस्थानांत येण्याचें १९२३ सालीं अजीबात थांबलें. हिंदुस्थानांत सोन्याच्या रूपानें अगणित पैसा गुंतविला गेला होता तिकडे, ब्रिटिशांची दृष्टि वळली व हिंदुस्थानांत सुवर्णचलन सुरू करण्याची पद्धति अमलांत आणून हिंदी लोकांच्या जवळ सोडून राहिलेल्या या सोन्याचा औद्योगिक प्रगतीकरितां कांहीं उपयोग करतां येईल कीं काय, याचा विचार ब्रिटिश अधिकारी करूं लागले व शेवटीं चलनविषयक धोरण आंखण्यासाठीं एक बादशाही कमिशन नेमण्यांत आलें. त्यांतून मध्यवर्ती अशी रिझर्व बँक काढण्याची कल्पना प्रसवली. या बँकेवर हिंदी लोकांचाच ताबा पाहिजे, ही हिंदी भांडवलवाल्यांची मुख्य मागणी पुढें आल्याकारणानें रिझर्व बँकेचा प्रश्न कांहीं काळ तसाच भिजत पडला.

शेतीच्या उत्पादनाची वाढ होऊन शेतकऱ्यांची क्रयशक्ति वाढली, तर ब्रिटिश मालाला हिंदुस्थानांत हक्काचें गिऱ्हाईक मिळेल, हा हेतु मनांत धरून १९२६ सालीं 'बादशाही शेतकी कमिशन' नेमण्यांत आलें. हिंदुस्थानांतील शेतकऱ्यांची क्रयशक्ति वाढावी व आपल्या मालाला कायमचें गिऱ्हाईक मिळावें ही कल्पना कांहीं वावगी नव्हती. पण पूर्वकालीन सरंजामदार पद्धतीनें गांजलेला, सावकारीपाशांत अडकलेला, जमीनदारांच्या व राजेरजवाड्यांच्या पिळणुकीनें रंजीस आलेला, असा हिंदी शेतकरीवर्ग, चार-दोन पैसे गांठीशीं

बांधू म्हणेल तर, त्याला अगोदर सावकार, जमीनदार, संस्थानिक यांच्या चरकांतून मुक्त झालें पाहिजे. त्याशिवाय दुसरा मार्ग नव्हता व तें एकंदर समाजपद्धति बदलल्याशिवाय घडून येणें शक्य नव्हतें. अशा स्थितींत बादशाही शेतकी कमिशनच्या सूचना नुसत्या कागदावरच पडून राहिल्या तर त्यांत आश्चर्य तें कसलें!"

कॉ. रॉय यांच्या लेखणींतून उतरलेलें युद्धोत्तरकालीन ब्रिटिश साम्राज्यशाहीचें वसाहतींतील धोरण किती मुद्देसूद व शास्त्रशुद्ध आहे याची वाचकांना नीट कल्पना येईल.

**कामगार-चळवळीचा वाढता जोर**

ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या पिळणुकीनें दिवसेंदिवस हिंदुस्थानांतील जनता त्रस्त झाली होती व कामगार, शेतकरी, हरहुन्नर करून पोट भरणारे लोक, लहान लहान दुकानदार, कारागीर व मध्यमवर्गीय सुशिक्षित तरुण, या सर्वांना आर्थिक अरिष्टांच्या झंझावातानें ग्रासून टाकलें होतें. विशेषतः मोठमोठ्या कारखान्यांत राबणाऱ्या कामगारांची स्थिति फारच अनुकंपनीय झाली होती. याचे दृश्य परिणाम म्हणजे १९२५ सालापासून पुन्हा ठिकठिकाणीं संपाचा वणवा भडकूं लागला हें होय. १९२५ सालांत १३३, १९२६ सालांत १२७, १९२७ सालीं १२९ व १९२८ सालीं २०० असे निरनिराळ्या कारखान्यांतून संप झाले. १९२८ सालीं मुंबईचा गिरणी-कामगारांचा प्रचंड संप, हा हिंदुस्थानांतील जनतेच्या स्मरणांतून कधींहि जाणें शक्य नाहीं. या वेळीं मुंबईतील गिरणी-कामगारांची प्रचंड संघटना होऊन, या लढाऊ यूनियनच्या निशाणाखालीं ७० हजार कामगार एकत्रित झाले होते.

१९२४ सालीं जरी कांहीं तरुण कम्युनिस्टांना तुरुंगांत डांबून टाकण्यांत आलें, तरी ताज्या दमाचे क्रांतिकारक तरुण, राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्याचें निशाण हातीं घेण्यास पुढें सरसावले व राजकीय चळवळीवर या घडामोडीचा परिणाम झाल्याखेरीज राहिला नाहीं. रॉय यांच्या विचारसरणीचा व कार्यक्रमाचा फैलाव या नाहीं त्या रीतीनें या कार्यकर्त्यांमधून होत होता. १९२७ सालीं मद्रास येथें भरलेल्या कॉंग्रेसच्या अधिवेशनांत मवाळ गटाच्या विरोधास न जुमानतांहि

स्वातंत्र्याचा ठराव पास करण्यांत आला. ठराव पास झाला, पण त्याला अनुसरून जो कार्यक्रम व जी दिशा आंखून घ्यावयास पाहिजे होती, ती दाखविली गेली नाहीं. हिंदी स्वातंत्र्याचा लढा, हा खरोखर शेतकरीक्रांतीचा लढा आहे. कामगार-वर्गाची वाढ झालेली असली तरीहि या वर्गाचें जीवित थोडें-फार शेतीवर अवलंबून आहे. शेतकरीवर्ग हा अनेक मार्गांनीं व अनेकांकडून पिळला जातो. गिरणींतील कामगारवर्गाला सावकार व पठाण यांच्या पाशांतून मोकळें होतां होतां नाकीं नव येतात. गिरणींत संप झाला, अगर मालकांनीं कारखाना बंद केला, तर गिरणीकामगार परत आपल्या नातेवाइकांच्या घरीं जो जमिनीचा तुकडा असेल त्यावर पोट भरण्यास खेडेगांवांतच जाणार. दुसरा मार्ग काय? परत आपल्या शेतीकडे गेल्यानें पोट भरत असतें, तर शेत सोडून शेतकरी शहरांत येतोच कशाला! अशा रीतीनें हिंदुस्थानांतील कामगारवर्ग हा सुद्धां पर्यायानें शेतीकडेच उदरनिर्वाहासाठीं बघत असतो व शेती हा त्याला मोठा आधार वाटत असतो. बरें, कामगारवर्गाचें प्रमाण तरी असें हिंदुस्थानांत किती आहे? ८० टक्के जनता ही ७ लक्ष खेड्यांत पसरलेली आहे व या जनतेच्या आर्थिक सुस्थितीवरच हिंदी राष्ट्रीय लढ्याचा प्रश्न अवलंबून आहे. हिंदी स्वातंत्र्याच्या लढा हा शेतकरीक्रांतीचा भाग आहे हें कॉ. रॉय पहिल्या-पासून जनतेच्या मनावर बिंबवीत होते; आणि शेतकरीक्रांतीचा कार्यक्रमहि अगदीं स्पष्ट रीतीनें व खुलासेवार त्यांनीं हिंदी जनतेपुढें ठेवून दिला होता.

### सायमन कमिशनची नेमणूक व त्यावरील बहिष्कार

१९१९ सालापासून हिंदुस्थानांत शेतकऱ्यांच्या अस्वस्थतेचीं चिन्हें दृग्गोचर होत होतीं. मारवाडांत १९२६ सालीं दुष्काळ पडला. १९२७ सालीं बलुचिस्थान, वायव्य सरहद्द प्रांत, मध्यप्रांत, मुंबई व मद्रास येथील कांहीं जिल्ह्यांत दुष्काळानें कहर केला. १९२८ सालीं ब्रह्मदेशांत शेतकऱ्यांनीं बंडच उभारलें व कांहीं प्रांतांतून खंडबंदीची चळवळ सुरू झाली. बार्डोली तालुक्यां-तील ८८ हजार शेतकऱ्यांनीं खंडबंदीचा निश्चय जाहीर करून, सत्याग्रह-संग्रामासहि हात घातला. चार-पांच वर्षांच्या अवधींत अखिल हिंदुस्थानभर शेतकऱ्यांच्या चळवळीला नवीन चालना मिळाली व शेतकरी समाजाचें पाऊल क्रांतिकारक मार्गाच्या वाटेवर सहजगत्या पडूं लागलें.

कामगारवर्गांतील अस्वस्थता, शेतकऱ्यांचीं बंडें, खंडबंदीची चळवळ व कॉंग्रेसची संपूर्ण स्वातंत्र्याची मागणी, अशा एकामागून एक गोष्टी घडत गेल्या व हिंदुस्थानच्या राजकीय चळवळीचें पाऊल झपाझप पुढें पडूं लागले. ब्रिटिश साम्राज्यशाही मोठी पेचांत पडलेली होती. औद्योगिक प्रगति, हुंडणावळ, सरकारी तिजोरीची व्यवस्था, शेतकी, बँका वगैरे बाबतींत चौकशी करून त्या त्या विषयासंबंधींचे अहवाल सरकारनें याच काळांत मागविले. देशांतील लोकांना आपण कोठपर्यंत अधिकार देऊं शकूं, आपल्या अडचणी कोठें आहेत, आपले खरे मित्र हिंदुस्थानांत कोणत्या वर्गांत मिळतील, हें पाहण्या-साठीं व एकंदर परिस्थितीची चांचणी करण्यासाठीं या चौकशी-मंडळाचा खटाटोप ब्रिटिश साम्राज्यशाहीनें केला होता. परिस्थितीचें बरोबर आकलन केल्यावर, १९२८ सालांत हिंदी जनतेला राजकीय हक्क देण्यासंबंधीं चौकशी करण्यासाठीं सरकार एक कमिशन नेमीत आहे असें सरकारतर्फे जाहीर करण्यांत आलें. ज्याला सायमन कमिशन असें म्हणतात तें हेंच कमिशन होय.

या कमिशनचा सत्कार, कमिशनचा रिपोर्ट, नंतरचा कायदा व त्या कायद्याची सध्यां होत असलेली अंमलबजावणी, या गोष्टी अगदीं ताज्या आहेत. सरकारनें सायमन कमिशन नेमिलें, पण त्यांत एकाहि हिंदी गृहस्थाचा समावेश त्यांत करण्यांत आला नाहीं; अगर हिंदी भांडवलवाल्यांचा प्रतिनिधि नव्हता. कांहीं हांजी हांजी करणारे जात्यंध पुढारी यांच्याशिवाय या कमिशनशीं सहकारिता करण्यास कोणीहि पुढें आलें नाहीं. हिंदी भांडवलदारवर्गहि कमिशनशीं सहकार्य करण्यास तयार होईना. हिंदी जनतेच्या स्वयंनिर्णयाच्या हक्काला लाथाडून हें कमिशन नेमण्यांत आलें आहे, तेव्हां या बादशाही कमिशनचें आम्हांला सोयरसुतक नाहीं असें राष्ट्रीय सभेनें स्पष्टपणें जाहीर केलें.

प्रत्येक ठिकाणीं कमिशनविरोधी हरताळ पडले. निषेधार्थ मिरवणुकी निघाल्या व सभा झाल्या. चळवळीचे जेवढे म्हणून प्रकार व्हावयाचे तेवढे झाले; परंतु राजकीय स्वातंत्र्याची मोहीम यशस्वी करण्यासाठीं जो व्यापक व लढाऊ असा कार्यक्रम जनतेसमोर ठेवावा लागतो तें कार्य मात्र कॉंग्रेस-कडून न झाल्याकारणानें जनक्षोभाचा जितका फायदा घ्यावयास हवा होता तितका राष्ट्रीय पुढाऱ्यांना घेतां आला नाहीं.

ज्या वेळीं ब्रिटिश साम्राज्यशाही आपलाच हेका चालवून, सायमन कमिशन-वर एकाहि हिंदी मनुष्याची नेमणूक न करतां हिंदुस्थानचें राजकीय भवितव्य हें पार्लमेंटच्या हातीं आहे असें जगजाहीर करीत होती, त्याच वेळीं उत्तरास प्रत्युत्तर म्हणून आम्ही आमच्या देशाचे मालक आहोंत, आमच्या देशाची राज्यघटना ठरविण्यास आम्ही जबाबदार आहोंत व हा आमचा हक्क आहे, असें काँग्रेसनें जाहीर करावयास पाहिजे होतें व सार्वत्रिक मतदाना-च्या आधारावर लोकप्रातिनिधिसभेची–कॉन्स्टिटयुअंट असेंब्लीची–मागणी जनतेसमोर ठेवा असें या वेळीं कॉ. रॉय यांचें म्हणणें होतें. परंतु त्या वेळीं राष्ट्रीय सभेचे पुढारी हे हिंदी भांडवलदारांच्या ओंजळीनें पाणी पीत असल्या-मुळें कोणताहि लढाऊ कार्यक्रम सायमन कमिशनला उत्तर म्हणून जनतेसमोर ठेवण्यांत आला नाहीं. त्या वेळची परिस्थिति राजकीय लढ्याला अत्यंत अनु-कूल होती. जनतेच्या क्रांतिकारक विचारसरणीचा फायदा घेऊन, जर व्यापक कार्यक्रम कांग्रेसनें आंखला असता, तर सायमन कमिशनच्या बहिष्कारांतून अवाढव्य अशी राष्ट्रीय चळवळ आपल्याला खात्रीनें उभारतां आली असती.

**हिंदुस्थानांतील कम्युनिस्ट पक्ष**

सायमन कमिशन, त्यावरील बहिष्कार व ब्रिटिश साम्राज्यशाहीनें केलेला अपमान, या सर्व गोष्टींचा परिणाम कांग्रेसमधील तरुणांच्या मनावर हळूहळू होत होता. कांग्रेसमध्यें अद्याप जहाल गट म्हणून जरी स्वतंत्र पक्ष निर्माण झालेला नसला तरी त्याचीं पूर्वचिन्हें दृग्गोचर होत होतीं. हिंदुस्थानां-तील कम्युनिस्ट पक्ष त्या वेळीं अत्यंत बाल्यावस्थेंत होता. कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या स्थापनेनंतर कॉ. रॉय यांच्या नेतृत्वाखालीं हिंदुस्थानां-तील कम्युनिस्ट पक्षाची चळवळ नुकतीच मूळ धरूं लागली होती. इकडे दोन, तिकडे दोन, असे कम्युनिस्ट पक्षांतील कार्यकर्ते हिंदुस्थानांत विखुरलेले होते. सुसंघटित पक्ष अशा नांवास तो अद्याप पात्र झालेला नव्हता. जर हिंदुस्थानांत त्या वेळीं बलवान् कम्युनिस्ट पक्ष असता, तर हिंदी राजकीय लढ्याला अगदीं निराळेंच वळण लागलें असतें, यांत मुळींसुद्धा शंका नाहीं.

हिंदुस्थानांत बलाढ्य असा कम्युनिस्ट पक्ष नव्हता हा कांहीं कॉ. रॉय अगर कॉ. स्टॅलिन यांचा दोष नाहीं. याचें खरें कारण निराळेंच होतें; कामगारवर्ग काय

अगर इतर समाज काय, हिंदुस्थानांतील सर्वच वर्गांची स्थिति मागासलेली होती. कामगारवर्गांत वर्गयुद्धाचें तत्त्वज्ञान तितकें भिनलें गेलें नव्हतें. कम्युनिस्टांच्या पुढारीपणाखालीं कामगारवर्गानें अनेक संप चिकाटीनें लढविले व साम्राज्यशाहीच्या दडपशाहीला तोंड दिलें हें सर्व खरें; परंतु हें सर्व करीत असतांना कामगारांच्या डोळ्यांसमोर त्यांच्या आर्थिक मागण्या होत्या. कोणत्याहि राजकीय चळवळीचा अगर सामाजिक क्रांतीचा लढा करण्याइतकी हिंदुस्थानांतील कामगावर्गाची त्या वेळीं तयारी झालेली नव्हती हें खास.

मग प्रश्न असा उत्पन्न होतो कीं, हिंदुस्थानांत कम्युनिस्ट पक्ष कसा सुसंघटित करतां येईल ! प्राप्त परिस्थितींत कम्युनिस्ट पक्षाचें बळ वाढवावयाचें असेल, तर कामगारवर्गानें राष्ट्रीय क्रांतीच्या लढ्यांत स्वतः भाग घेणें हाच एक त्याला मार्ग आहे. कॉंग्रेस ही एक क्रांतिकारक संस्था आहे व राष्ट्रीय कॉंग्रेसकडून साम्राज्यविरोधी लढा यशस्वी रीतीनें लढला जावा असें ज्या तरुणांना वाटतें, त्यांनीं कामगारवर्गाला या लढ्यामध्यें भाग घ्यावयास लावूनच तें कार्य साधतां येईल; राष्ट्रीय कॉंग्रेसपासून दूर राहून साधतां येणार नाहीं. साम्राज्यविरोधी लढ्यांतून जेव्हां कामगारवर्ग मोठ्या प्रमाणांत भाग घेऊं लागेल, त्या वेळीं कामगारवर्गाचा क्रांतिकारक पक्ष या लढ्यांतून निर्माण होईल व या अवस्थेंतूनच कम्युनिस्ट पक्षाच्या संघटनेला व वाढीला वाव मिळेल. जगप्रसिद्ध अशा सहाव्या कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या परिषदेपर्यंत हिंदुस्थानांतील कम्युनिस्ट पक्षाचें धोरण योग्य दिशेनें आंखलें गेलें होतें. सहाव्या परिषदेनंतर कम्युनिस्ट इंटरनॅशनलकडून ज्या कांहीं घोडचुका होऊं लागल्या व ज्यांचे परिणाम जगांतील एकंदर कामगार चळवळीवर झाले, त्यांची हकीकत मागें आलीच आहे. सहाव्या परिषदेपर्यंत वसाहतीच्या प्रश्नाबद्दल रॉय यांचें धोरण व कार्यक्रम कम्युनिस्ट इंटरनॅशनलला सर्वस्वीं मान्य असे होते. मात्र १९२९ नंतर जेव्हां रॉय यांना थर्ड इंटरनॅशनलमधून काढून टाकण्यांत आलें तेव्हां हिंदी प्रश्नाबद्दल रॉय यांचे काय विचार होते याचें त्रोटक विवेचन पुढील भागांत केलेलें आहे.

---

# १९ हिंदुस्थानविषयक विचार

## भाग २ रा

थर्ड इंटरनॅशनलमधून कॉ. रॉय यांना त्यांच्या मतभेदामुळें काढून टाकण्यांत आल्यानंतर, रॉय यांनीं आपल्याशीं ज्यांचीं मतें जुळतात अशा सहकाऱ्यां-बरोबर विचारविनिमय करून, आपली कार्याची दिशा स्वतंत्र रीतीनें आंखली व त्याप्रमाणें ते कार्य करूं लागले, वगैरे हकीकत मागील एका प्रकरणांत आलेली आहेच. १९२९ सालनंतरहि रॉय यांनीं आपलें कार्य हिंदुस्थानांत चालू ठेविलें होतें. मात्र या वेळीं थर्ड इंटरनॅशनलशीं त्यांचा मतभेद झाल्यामुळें रॉय यांचें धोरण व कार्यक्रम हे, थर्ड इंटरनॅशनलचें अधिकृत धोरण असें मानिलें जात नव्हतें. असो.

**राष्ट्रीय स्वातंत्र्याचा जाहीरनामा**

१९२९ सालीं लाहोर कॉंग्रेसनें पं. जवाहरलाल नेहरू यांच्या अध्यक्षतेखालीं संपूर्ण स्वातंत्र्याचा ठराव पास करून, राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या मार्गावरील बरीच मोठी मजल मारली होती असें म्हणण्यास हरकत नाहीं. अशा या महत्त्वाचे प्रसंगीं हिंदी तरुणांना योग्य व स्पष्ट असा मार्ग दाखविला पाहिजे असा विचार करून कॉ. रॉय यांनीं 'लाहोर कॉंग्रेसचें रहस्य' या नांवाचें जें एक चोपडें प्रसिद्ध केलें त्यांत कॉ. रॉय म्हणतात—"एक गोष्ट फारच चांगली झाली ती ही कीं, हिंदुस्थानचें अंतिम ध्येय काय हें राष्ट्रीय सभेच्या मुखांतून स्पष्ट रीतीनें एकदांचें बाहेर पडलें. लाहोर कॉंग्रेसमधील संपूर्ण स्वातंत्र्याचा ठराव हा हिंदुस्थानच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहिण्याइतका महत्त्वाचा भाग आहे. स्वातंत्र्याचा ठराव पास होऊन ध्येय निश्चित झालें हें खरें, पण तें ध्येय गांठण्यासाठीं आतां जनतेपुढें स्पष्ट असा कार्यक्रम ठेवण्याची जरूरी आहे. आपल्या संपूर्ण स्वातंत्र्याच्या खालील मागण्या राष्ट्रीय सभेनें जाहीर करून त्यांच्या आधारावर राष्ट्राची संघटना करावी असें माझें मत आहे.

(१) सार्वत्रिक मतदानपद्धतीनें निवडून आलेल्या प्रतिनिधि-मंडळाच्या हातांत सर्व सत्ता असावी, कार्यकारी मंडळ कायदेमंडळाला जबाबदार राहावें व संपूर्ण लोकसत्तात्मक राज्यपद्धति अमलांत आणावी. (२) निरनिराळ्या प्रांतांना स्वायत्तता देण्यांत यावी. (३) संस्थानें व जमीनदार यांना नुकसान-भरपाई न देतां त्यांचे अधिकार काढून घ्यावेत. (४) सर्व जमीन राष्ट्राच्या मालकीची करावी व एकंदर उत्पन्नाच्या शें. १५ टक्क्यांपेक्षां जास्त नाहीं, इतकी रक्कम सरकारनें घेऊन, बाकीच्या मालावर शेतकऱ्यांचा पूर्ण मालकी हक्क असावा. (५) शेतकऱ्यांवरील अप्रत्यक्ष कर नाहींसे करावेत. (६) लहान लहान शेतकऱ्यांवर अजीबात कर बसवूं नयेत. (७) जे शेतकरी अगदीं खालावलेले असतील त्यांचें कर्ज माफ करण्यांत यावें. (८) सावकारीवर नियंत्रण घालणें. (९) शेतकऱ्यांसाठीं स्वस्त व्याजाच्या दरानें बँका उघडणें. (१०) सार्वजनिक हिताचे सर्व कारखाने व धंदे राष्ट्राच्या मालकीचे करणें. (११) कामगारांना ८ तासांचा दिवस करणें. (१२) कमींत कमी पगाराचें प्रमाण कायद्यानें ठरविणें. (१३) कामगारांकरितां आजारीपण, वृद्धपण, बाळंतपण यांकरितां विम्याची सोय करणें. (१४) कामगारांनीं संघ बनविण्याचा व राजकीय पक्ष स्थापन करण्याचा त्यांना हक्क देणें. (१५) भाषण व मुद्रण-स्वातंत्र्य देणें (१६) धार्मिक बाबतींत पूर्ण स्वातंत्र्य असणें. (१७) अल्पसंख्याकांचें संरक्षण करण्याची हमी. (१८) मोफत सक्तीचें प्राथमिक शिक्षण नागरिकांना देणें. (१९) शस्त्र धारण करण्याचा प्रत्येक नागरिकाचा हक्क मान्य करणें, वगैरे महत्त्वाच्या गोष्टी जनतेच्या मागण्या म्हणून राष्ट्रीय सभेनें लोकांसमोर ठेवणें जरूर होतें. सर्वसाधारण प्रत्येक व्यक्तीला राष्ट्रीय लढ्यांत आपलेपणा वाटेल व राष्ट्रीय लढ्याची धुरा आपल्या खांद्यावर घेण्यास प्रत्येक व्यक्ति पुढें येईल अशा तऱ्हेचा व्यापक कार्यक्रम वर आंखण्यांत आलेला आहे.

### हिंदु-मुसलमानांचा प्रश्न

अल्पसंख्याकांना पूर्ण संरक्षण दिल्यानें जातिविषयक द्वेषाचें मूळच खुडल्यासारखें होतें. तसें पाहिलें तर, जातीय प्रश्नांत असें महत्त्वाचें आहे तरी काय? बहुजन समाजाला जातिविषयक भांडणें समजत देखील नाहींत. मुसल-मान भांडवलवाल्यांना ते मुसलमान आहेत म्हणून ब्रिटिश लोक संरक्षण देतात

अगर हिंदु, शीख, ब्राह्मणेतर यांच्यावर ब्रिटिश सरकार कराचा अधिक बोजा बसवितें असें थोडेंच आहे ! हिंदु कारखानदार हिंदु कामगाराला जास्त पगार देतो व मुसलमानाला कमी देतो असें कधींच होत नाहीं. अनेक धर्मांचे व अनेक जातींचे लोक परकीय सत्तेखालीं सारखेच पिळले जात आहेत, याची कोणाला दाद देखील नाहीं ! मुसलमान जमीनदार मुसलमान शेतकऱ्यांकडून कांहीं कमी वसूल घेत नाहीं; किंवा हिंदूकडून जास्त घेत नाहीं. या सर्व गोष्टींचा प्रामाणिकपणें विचार केला, तर जातिविषयक प्रश्न हे वरवरचे आहेत हें दिसून येतें. जनतेचें लक्ष सामाजिक क्रांतीपासून परावृत्त व्हावें म्हणून पंडित व मुल्ला, जमीनदार व धर्मोपदेश, मध्यमवर्गीय सुखवस्तु लोक व कांहीं साम्राज्यशाहीचे हस्तक यांनीं जातीय चळवळीचा बागुलबोवा उभा केलेला आहे हें जरा बारकाईनें विचार केला म्हणजे चांगलें लक्षांत येतें. अल्पसंख्याकांची मनांतील भीति घालवावयाची असेल, तर त्यांच्या संरक्षणाची हमी राष्ट्रीय सरकारनें जाहीर रीतीनें आपल्या अंगावर घ्यावी म्हणजे आपोआपच जाति-विषयक प्रश्न सुटतील.”

**‘ औद्योगिक प्रगति व संरक्षणाचें तत्त्व ’**

हिंदी राष्ट्राची औद्योगिक प्रगति व्हावी असें केवळ म्हणत राहण्यानें ती होणार नाहीं. औद्योगिक प्रगतीला कोणत्या अडचणी आहेत व त्या नाहींशा करण्यासाठीं काय काय उपाययोजना केली पाहिजे याचा विचार झाला पाहिजे. देशांतील धंद्यांना ‘संरक्षण’ मिळालें म्हणजे औद्योगिक प्रगति होते असें म्हणणें हें अज्ञानाचें द्योतक आहे. जनतेची क्रय-विक्रय-शक्ति वाढवून व शेतीवर कसबसा जीव धरून राहिलेल्या शेतकरीवर्गाला, अधिक उत्पादन करणाऱ्या धंद्याकडे वळवून, राष्ट्रीय संपत्तीची वाढ करणें हें औद्योगिक प्रगतीचें पहिलें लक्षण आहे. देशांतील सर्वच वर्गांची स्थिति सुधारली, तर औद्योगिक प्रगति व्हावयास वेळ लागणार नाहीं. ‘संरक्षण’ ही केवळ बाह्य उपाययोजना आहे. आपल्या देशाच्या सध्यांच्या परिस्थितींत देशी धंद्यांना केवळ संरक्षण देण्यानें देशी धंद्यांची वाढ खुंटते हें आमच्या भांडवलवाल्यांच्या लक्षांत येत नाहीं. ‘संरक्षणा’नें जर वस्तूंच्या किंमती वाढल्या, तर ती महाग वस्तु घेण्यास शेतकरी समाजाजवळ अधिक पैसा नको

काय ? जोंपर्यंत शेतकऱ्याजवळील मालाला अधिक किंमत येत नाहीं व कामगाराजवळ चार पैसे जास्त शिल्लक राहत नाहींत, तोंपर्यंत संरक्षणानें महाग झालेला माल खपावा कसा व मालाला अधिक मागणी यावी कोठून ? तात्पर्य, संरक्षणानें देशांतील गिऱ्हाईक वाढत तर नाहींच, उलट कमी कमी होत जातें व शेवटीं कांहीं काळ तात्पुरता नफा मिळत गेला तरी, देशाच्या औद्योगिक प्रगतीच्या दृष्टीनें संरक्षणाचें हें तत्त्व घातुक ठरतें. म्हणून वर जो राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्याचा कार्यक्रम जनतेपुढें ठेवला आहे, त्यांत शेतकरीवर्गाच्या हातांत अधिक पैसा खेळत राहून, देशाची सर्वांगीण औद्योगिक वाढ कशी होईल तें स्पष्ट रीतीनें दाखविलें आहे.

**संस्थानिक व जमीनदार**

संस्थानिकांचे व जमीनदारांचे हक्क अजीबात नष्ट करा असें सांगण्यांत, कांहीं सुखवस्तु संस्थानिकांचें व लक्षाधीश अशा जमीनदारांचें सुख, आम्हांस पाहवत नाहीं असें नव्हे. व्यक्ति म्हणून त्यांचा हेवादावा करण्याचें आम्हांस कांहींच कारण नाहीं. 'पुष्कळांचें पुष्कळ सुख' या न्यायानें जनतेच्या सुखाकरितां कांहीं लोकांचे पिढीजात हक्क हिरावून घेण्याची पाळी आली तरी त्याला भितां कामा नये. देशांतील संपत्तीचा बराच मोठा भाग औद्योगिक प्रगतीला पोषक न होतां, मूठभर संस्थानिक व जमीनदार लोकांच्या चैनींत, दागदागिन्यांत, व विलासांत खर्च व्हावा हें योग्य दिसतें काय ? हाच जर पैसा खेड्यापाड्यांतील शेतकऱ्यांत खेळला, तर तो देशांतील औद्योगिक प्रगतीला अधिक पोषक होईल यांत काडीइतकीसुद्धां शंका नाहीं. तात्पर्य इतकेंच कीं, देशाची औद्योगिक प्रगति ही भक्कम पायावर उभारली जावी असें आमच्या राष्ट्रीय पुढाऱ्यांस वाटत असेल तर, पहिल्या प्रथम हिंदुस्थानांतील शेतकऱ्याला सामाजिक व आर्थिक पेचांतून मोकळा केला पाहिजे व त्याच्या खिशांत अधिक पैसा खेळला पाहिजे, तरच ही प्रगति टिकाऊ अशी होईल, एरव्हीं नाहीं.

**पिढीजात हक्क व नुकसानभरपाईचें तत्त्व**

तात्त्विक दृष्टया वरील विचारसरणी योग्य व आवश्यक आहे असें जरी वाटलें, तरी तसा कार्यक्रम अमलांत आणतांना जमीनदार व संस्थानिक यांचा

विरोध आपल्याला झाल्याखेरीज राहणार नाहीं; पण आपण या विरोधालाहि धीरानें व नेटानें तोंड दिलें पाहिजे. परंतु इतका धीटपणा व निश्चितपणा आमच्या राजकीय पुढाऱ्यांच्या कार्यक्रमांत दिसून आला नाहीं. जमीनदारांचे हक्क नष्ट करावे लागले तरी आम्ही तसें करूं, असें एकीकडे म्हणावयाचें व दुसरीकडे जमीनदारांना नुकसानभरपाई देऊं अशीं वचनें द्यावयाचीं यांत किती तरी विसंगति आहे! पं. जवाहरलाल नेहरूंसारख्या सुप्रसिद्ध पुढाऱ्यांच्या तोंडूनच अशा अर्थाचे उद्गार त्या वेळीं निघाले होते. जमीनदारांचे हक्क नष्ट करून, शेतकऱ्यांना खरोखरीच सुखी करावयाचें असेल, तर त्यांच्यावरील कर्जाचा बोजा प्रथम नाहींसा केला पाहिजे. जमीनदारांना राष्ट्रानें नुकसानभरपाई द्यावयाची ठरविली, तर पुन्हा ह्या राष्ट्रीय कर्जाचा बोजा शेतकऱ्यांवरच बसणार नाहीं काय? तेव्हां संस्थानिक व जमीनदार यांचे हक्क नष्ट करणें हें देशाच्या औद्योगिक व राजकीय प्रगतीच्या दृष्टीनें आवश्यक आहे, असें जर आपल्याला खरोखर वाटत असेल, तर परत नुकसानभरपाई देण्याचा प्रश्नच उरतां कामा नये. नाहीं तर एका हातानें द्यावें व दुसऱ्या हातानें काढून घ्यावें असा प्रकार व्हावयाचा. जगांतील प्रत्येक राष्ट्राच्या इतिहासांत शेतकरी-क्रांतीची घटना कशी घडून आली याचा इतिहास पाहिल्यास आपणांस हेंच दिसून येतें कीं, शेतकरीवर्गाची स्थिति सुधारावयाची, तर त्याजवरील सर्वच कर्जाचा बोजा नाहींसा करणें आवश्यक असतें.

### सार्वत्रिक संपाचें हत्यार

लाहोर काँग्रेसच्या अध्यक्षांनीं, करबंदीची चळवळ व सार्वत्रिक संप हीं साम्राज्यविरोधी लढ्यांतील आपलीं हत्यारें आहेत असें जाहीर करून टाकलें. गोष्ट खरी आहे. आज नाहीं उद्यां आपल्याला याच मार्गाचा अवलंब करावा लागेल. परंतु हीं शस्त्रें पाजळून हातीं घेण्याच्या अगोदर बरीचशी पूर्वतयारी करावी लागते हें ध्यानांत घेणें जरूर आहे. नुसतें संपूर्ण स्वातंत्र्य-ध्येय जाहीर केलें म्हणजे ज्याप्रमाणें राष्ट्रीय लढा पुढें जाऊं शकत नाहीं, त्याचप्रमाणें सार्वत्रिक संप व करबंदीची चळवळ करणें आवश्यक आहे असें म्हणण्यानें या संपांची अगर करबंदीची तयारी होत नाहीं. ठिकठिकाणचे कामगार हे आपापल्या आर्थिक मागण्यांसाठींच संपास प्रवृत्त होतात. तेव्हां कामाचे

तास, पगारकाट, मालकांची छळणूक. या गाऱ्हाण्यांकरितां लढतां लढतां कामगारांना जेव्हां असें वाटेल कीं, शेवटीं आपल्याला राजकीय स्वातंत्र्याचा झगडा केल्याखेरीज आपल्या मागण्या पूर्णपणें मिळणार नाहींत तेव्हांच, कामगारवर्ग हा राजकीय लढयासाठीं सार्वत्रिक संपाचें हत्यार उपशील. तोंपर्यंत त्याला नुसतें सार्वत्रिक संप म्हणून त्याचें महत्त्व कळणार नाहीं. सार्वत्रिक संप ही कांहीं अशी गोष्ट नाहीं, कीं एके दिवशीं सकाळीं कॉंग्रेसनें जाहीरपत्रकें काढल्याबरोबर कामगारवर्ग राजकीय लढ्यासाठीं भराभर संपावर येईल! युरोपियन देशांतील सुशिक्षित व सुसंघटित अशा कामगारवर्गांतसुद्धां सार्वत्रिक संप असे तडकाफडकी होत नाहींत, मग हिंदुस्थानची गोष्ट तर बाजूलाच राहूं द्या. हिंदुस्थानांत सार्वत्रिक संपाला सुरुवात म्हणजे स्थानिक लहान लहान संपांतून होणार. समजा, जमशेटपूर येथें कामगारांच्या दैनंदिन अशा मागण्यांकरितां एक लहानसा संप झाला, या संपाचा वणवा रेल्वे व खाणींतील कामगारांत पसरला व अशा रीतीनें निरनिराळ्या कारखान्यांत संप सुरू झाले; तरीसुद्धां यांतून हिंदी स्वातंत्र्याच्या लढ्याला सहाय म्हणून एकदम राजकीय संप उत्पन्न होतील असें नाहीं. कामगारांच्या गाऱ्हाण्यांकरितां झालेल्या स्थानिक संपांचें पर्यवसान, सार्वत्रिक अशा राजकीय संपांत होईल व तसें होतेंहि. १९२६ सालीं झालेला इंग्लंडमधील कोळशाच्या खाणींतील कामगारांचा संप, हें अशा राजकीय संपाचें मोठें उदाहरण आहे. संप सुरू झाल्यानंतर नऊ दिवसांच्या आंतच इंग्लंडमधील या संपानें इतकें उग्र स्वरूप धारण केलें, कीं कामगारसंघांनीं राजकीय सत्तेकरितां प्रत्यक्ष पार्लमेंटलाहि आव्हान केलें. अशा परिस्थितींत संप पुढें चालविण्यानें पहिल्या प्रतीचा राजकीय लढा उत्पन्न होतो हें अगदीं खरें आहे. हिंदुस्थानांत राजकीय लढ्याची इतकी तयारी झालेली नाहीं. कॉंग्रेसच्या हुकुमाबरोबर, सर्व कामगार एका दिवशीं सार्वत्रिक संपांवर आले आहेत असें जरी घटकाभर आपण धरून चाललों, तरीसुद्धां राष्ट्रीय लढ्याची देशांत पूर्ण तयारी नसतांना एकाएकी झालेल्या सार्वत्रिक संपानें स्वातंत्र्याचा लढा फारसा पुढें जाणार तर नाहींच उलट आपल्यापेक्षां बलाढ्य आणि श्रेष्ठ अशा साम्राज्यशाहीच्या शक्तीपुढें आपली वाताहत झाल्याखेरीज राहणार नाहीं. हिंदुस्थानांत अशा संपाची कल्पना आज तरी करतां येत नाहीं. जेव्हां राष्ट्रीय लढ्यानें आपली शक्ति

बरीच वाढेल व आपण शेवटचा निकाराचा लढा करण्याइतके बलवान् होऊं, अशाच वेळीं सार्वत्रिक संपाचें हत्यार राजकीय क्षेत्रांत यशस्वी रीतीनें वापरतां येईल.

**सार्वत्रिक करबंदीची चळवळ**

आतां आपण करबंदीच्या चळवळीकडे वळूं या 'सरकारला कर देऊं नका' असें एकाएकी अनपेक्षित रीतीनें जनतेला सांगितल्यानें, सर्व जनता करबंदीच्या चळवळीला प्रवृत्त होतें असें मुळींच नाहीं. शेतकऱ्यांच्या खऱ्या अडचणी कोणत्या आहेत, कोणत्या कार्यक्रमावर त्यांस एकत्रित आणतां येईल याचा विचार करून, व त्या त्या भागांतील शेतकऱ्यांचे लढे लढवूनच, आपल्याला सार्वत्रिक करबंदीच्या चळवळीला हात घालतां येईल. कायद्याच्या कक्षेंत राहून सुद्धां शेतकऱ्यांच्या अनेक चळवळी करतां येतात त्यांवर अगोदर भर दिला पाहिजे. सावकारांची पिळणूक, जमीनदारांचा जुल्म, सरकारी दडपशाही यांविरुद्ध लढतां लढतां जेव्हां शेतकरीवर्गाला सार्वत्रिक क्रांतीची आवश्यकता पटूं लागेल, त्याच वेळीं सार्वत्रिक संप व सामुदायिक करबंदीची चळवळ यांचा राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्यांत परिणामकारक रीतीनें उपयोग होतो हें प्रत्येक कार्यकर्त्यानें ध्यानांत बाळगलें पाहिजे. असो.

महायुद्धाच्या कालानंतर ब्रिटिश साम्राज्यशाही अगदीं खिळखिळी झालेली होती. ब्रिटिश भांडवल हिंदुस्थानांत येण्याचें १९२३ सालापासून बंद पडलें. जगांतील इतर राष्ट्रांप्रमाणें हिंदुस्थानांतहि भांडवलशाहीला अगदीं पडता काळ येऊन ठेपला. औद्योगिक प्रगति थांबली. याचा परिणाम कच्च्या मालावरहि झाला. कच्च्या मालाच्या किंमतींना घसरगुंडी लागली. १९३० सालीं कच्च्या मालाच्या किंमती इतक्या उतरल्या, कीं हिंदी शेतकऱ्यांचें दरसाल ८०० कोटी रुपयांचें नुकसान होऊं लागलें. कच्च्या मालाच्या निर्गतीवर तर हिंदुस्थानच्या सर्व व्यापाराची मदार! १९२९ सालीं ५७८ कोटी रुपयांचा माल परदेशांत गेला; तर १९३० सालीं तो आंकडा ४४२ कोटी रुपयांवर येऊन ठेपला. मालाच्या किंमती भरमसाट उतरल्यामुळें शेतकऱ्याला आपलें देणें देतां येईना. सरकारी तिजोरीचीहि तीच रड होती, म्हणून आयात मालावर सरकारला कर बसविणें भाग पडलें. आयात मालावर कर बसविल्यामुळें वस्तूंच्या किंमती

महागल्या व शेतकऱ्यांजवळ तर पैसा नाहीं, अशा विलक्षण आर्थिक भोंवऱ्यांत हिंदुस्थान सांपडल्यामुळें साम्राज्यशाहीला मोठा पेच येऊन पडला होता. हिंदी लोकांच्या क्रांतिकारक चळवळीला या परिस्थितीनें एक प्रकारें मदतच केली. संपूर्ण स्वातत्र्यांच्या ध्येयाप्रत कॉंग्रेस येऊन ठेपली होती. बिकट अशा आर्थिक व राजकीय परिस्थितींतून साम्राज्यशाहीला कांहीं तरी मार्ग काढणें भाग होतें व त्यांनीं आपल्या नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें हिंदी भांडवलवाल्यांशीं सहकार्य करून आलेलें संकट कसें तरी टाळण्यासाठीं गोलमेज परिषदेची ही एक युक्ति काढली व आमचे राजकारणी मुत्सद्दी त्यांत गुरफटले गेले."

**गोलमेज परिषदेचा डाव**

हिंदी भांडवलदार, जमीनदार व संस्थानिक यांच्याशीं सहमत करण्यासाठीं ब्रिटिश साम्राज्यशाहीनें राउंड टेबल परिषदेचा डाव टाकला व कॉंग्रेसनें संपूर्ण स्वातंत्र्याचें ध्येय जाहीर करून, गोलमेज परिषदेवर बहिष्कार घातला. या आणीबाणीच्या प्रसंगीं राष्ट्रीय चळवळीनें आंधळ्या-कोशिंबरीचा खेळ खेळण्यापेक्षां राउंड टेबल परिषदेला उत्तर म्हणून, लोकप्रतिनिधींच्या सभेची (Constituent Assembly) मागणी देशापुढें ठेवावयास हवी होती असें कॉ. रॉय यांनीं सुचविलें; परंतु त्या वेळीं तसें केलें गेलें नाहीं. देशाची राजकीय घटना बनविणें हा हिंदी लोकांचा हक्क आहे, परकीयांचा नाहीं, हें तत्त्व या घोषणेनें जनतेच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न करा असें रॉय यांचें त्या वेळीं म्हणणें होतें.

**सत्याग्रहसंग्राम**

म. गांधींनीं १९३२ सालीं मिठाच्या कायदेभंगानें सार्वत्रिक चळवळीस सुरुवात केली. मिठाचा कायदेभंग हा कार्यक्रम योग्य असाच होता; पण या कायदेभंगाला इतर सार्वजनिक मागण्यांची जोड मिळावयास हवी होती, तशी ती मिळूं शकली नाहीं व बहुजनसमाज संघटित करण्याचें काम बाजूस राहिलें. ब्रिटिश साम्राज्यशाहीनें एकंदर चळवळीचा रागरंग पाहून दडपशाहीचें हत्यार उपसलें. अखिल हिंदुस्थानांतील ही कायदेभंगाची चळवळ म. गांधींचें पुढारीपण झुगारून देऊन, केव्हां कसें अकालाविकाळ स्वरूप धारण करील याचा नियम नाहीं, हें ब्रिटिश साम्राज्यशाहीनें ओळखलें व भराभर

कॉंग्रेसचे पुढारी व इतर कार्यकर्ते यांना तुरुंगांत डांबून ठेवून, सोटेशाही कायदे अमलांत आणून, अनियंत्रित राज्यकारभारास सुरुवात केली. कायदेभंगाच्या चळवळींत एकंदर १ लक्ष लोक तुरुंगांत गेले व हें सर्व इंग्लंडमध्यें मजूर मांत्रिमंडळ अधिकारपदावर असतांना झालें हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

**हिंदी स्वातंत्र्याच्या लढ्यास जर्मन कामगारांची सहानुभूति**

कॉ. रॉय हे या वेळीं जर्मनीमध्यें होते. कोणत्या ना कोणत्या तरी मार्गानें युरोपांत असलेल्या हिंदी तरुणांची गांठभेट घेऊन त्यांच्याबरोबर विचार-विनिमय करीत असत. १९३० च्या मे महिन्याच्या १२ तारखेस सेकंड इंटरनॅशनलच्या कार्यकारी मंडळाची सभा जर्मनींत भरणार होती व त्या वेळीं ब्रिटिश मंत्रिमंडळांतील मजूरमंत्रीहि त्या सभेला हजर राहणार असल्या-कारणानें ही संधि बरी आहे असें पाहून, कॉ. रॉय यांनीं या कार्यकारी मंडळाला उद्देशून एक अनावृत पत्र प्रसिद्ध केलें. महायुद्धानंतर जगांतील सनदशीर मार्गावर विश्वास असणाऱ्या मवाळ अशा कामगारसंस्थांनीं जी आपली आंतरराष्ट्रीय कामगारसंस्था स्थापली तीच ही सेकंड इंटरनॅशनल संस्था होय. या अनावृत पत्रांत हिंदी प्रश्नाबद्दल ऊहापोह करून ब्रिटिश मजूरमंत्रिमंडळ पूर्वीच्या वचनांना कसा हरताळ फाशीत आहे याचें सविस्तर विवेचन केलें होतें. तसेंच हिंदुस्थानचे लोक आपल्या हक्कांसाठीं झगडत असतांना त्यांच्यावर मंत्रिमंडळाकडून कसे अत्याचार करण्यांत येत आहेत याचीहि माहिती देण्यांत येऊन, शेवटीं दडपशाहीचे कायदे रद्द करा, राजकीय कैद्यांना बंधमुक्त करा व हिंदी लोकांना भाषण-मुद्रण-स्वातंत्र्याचे हक्क द्या अशी मागणी करण्यांत आली होती. या अनावृत पत्रकावर कॉ. रॉय व इतर कांहीं हिंदी तरुण यांच्या सह्या होत्या. या पत्रकाच्या हजारों प्रती वाटण्यांत आल्या. निषेधप्रदर्शक म्हणून जी मिरवणूक काढण्यांत आली होती तींत जवळ जवळ ८० हजार जर्मन कामगार सामील झाले होते. या पत्रकाचा जर्मन कामगारांवर फारच चांगला परिणाम झाला. सभेंत झालेलीं हिंदी पुढाऱ्यांचीं भाषणें जर्मन कामगार शेवटपर्यंत शांत चित्तानें ऐकून घेत होते.

बर्लिनमध्यें त्या वेळीं राहणाऱ्या एका नंबियार नांवाच्या गृहस्थानें व

त्याच्या सहकारी मंडळींनीं या पत्रकावर 'भांडवलशाही काँग्रेसच्या बगलबच्यांचें पत्रक' अशी टीका केली. कारण ती मंडळी आत्यंतिक जहाल अशा कम्युनिस्ट मताची होती. तेव्हां त्यांना या मिरवणुकींत भाग घेणें कमीपणाचें वाटावें यांत नवल तें कसलें? जर्मन परराष्ट्रीय खात्याच्या कांहीं हितचिंतकांनींहि या मिरवणुकीस व पत्रकासहि विरोध केला. परंतु त्याचा कामगार वर्गावर कांहींहि परिणाम झाला नाहीं.

हिंदी प्रश्नाबद्दल आस्थापूर्वक अभ्यास करून चळवळ करणारी अशी मध्यवर्ती संस्था वेळीं युरोपांत असणें आवश्यक होतें, याची जाणीव हिंदी पुढाऱ्यांना झाल्यामुळें हिंदी तरुणांनीं पं. जवाहरलाल नेहरू यांच्याशीं विचारविनियम केला, व कॉ. रॉय यांनीं अशा संस्थेच्या स्थापनेला ताबडतोब संमति दिली. शेवटीं काँग्रेसची एक शाखा जर्मनींत स्थापन करण्यांत आली. बर्लिन शहरीं कॉ. रॉय यांनीं या नवीन संस्थेचें कार्यकारी मंडळ व जर्मनींतलि कामगार-संस्थेचे कांहीं प्रतिनिधि यांची एक संयुक्त बैठक बोलाविली. या बैठकींत बराच विचारविनियम झाल्यावर हिंदी राजकीय प्रश्नाबद्दल चळवळ करण्यासाठीं व हिंदुस्थानविरोधी चळवळीला उत्तर देण्यासाठीं एक कमिटी स्थापन करण्यांत आली. या कमिटीतर्फे सर्व युरोपभर चळवळीच्या कार्यास सुरुवात झाली. मिरवणुकी, सभा, पत्रकें यांच्या द्वारें ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या दडपशाहीचा निषेध ठिकठिकाणीं करण्यांत आला. ही चळवळ येथेंच थांबली नाहीं तर अमेरिकेंत सुद्धां या निषेधाचे प्रतिध्वनि जोरजोरानें उमटूं लागले.

**सोलापूर सोव्हिएट**

कॉ. रॉय हे हिंदी स्वातंत्र्याच्या लढ्याला पोषक होईल अशी चळवळ युरोपांत करण्याच्या कामीं गुंतले होते. इतक्यांत सोलापूर शहरांत 'कामगारांचें बंड', 'सोलापूर शहरीं सोव्हिएट सत्तेची स्थापना' अशा, खळबळ उडवून देणाऱ्या बातम्या हिंदुस्थानांतून युरोपांत प्रसृत होऊं लागल्या. अशाच अर्थाच्या बातम्या, युरोपांतील कम्युनिस्ट पक्षाच्या वर्तमानपत्रांतून सगळीकडे प्रसिद्ध करण्यांत आल्या व या बातम्यांना त्या वर्तमानपत्रांनीं मोठमोठे मथळे देऊन, जेवढा प्रचार करावयाचा तेवढा केला. परंतु कॉ. रॉय यांना हिंदुस्थानांतील परिस्थितीचें बरोबर आकलन झालेलें असल्यामुळें त्यांनीं या भरमसाट व विपर्यस्त बातम्यांवर मुळींच विश्वास ठेवला नाहीं. खरोखर

सोलापुरांत काय झालें होतें याची कल्पना त्या वेळीं कोणासच आली नाहीं. सोलापुरांत दंगा होऊन कांहीं काळपर्यंत शहराचा ताबा कॉंग्रेस स्वयंसेवकांच्या हातीं होता व मि. मल्लप्पा धनशेट्टी, मि. कुरबानहुसेन, मि. सारडा व मि. शिंदे ही जी चार तरुण मंडळी खुनाच्या आरोपावरून पुढें फासावर लटकली गेली, त्यांपैकीं एकहि इसम कम्युनिस्ट नव्हता. सर्वजण कॉंग्रेस कार्यकर्ते होते. परिस्थितीचें बरोबर आकलन न झाल्याकारणानें, भरमसाट व विपर्यस्त अशा बातम्यांच्या योगानें कांहीं काळ लोकांची दिशाभूल झाली हें खरें परंतु सोलापुरांत सोव्हिएटही नाहीं व कांहींच नाहीं. सर्वसाधारण राजकीय चळवळींतील एक मोठ्या स्वरूपाचा दंगा येवढेंच काय तें सोलापुरांत घडलें होतें हें पुढें जनतेला कळून आलें.

## कम्युनिस्टांचें चुकीचें धोरण

राजकीय चळवळ अशा रीतीनें वाढत होती तर सरकारचें गोलमेज परिषदेचें काम चालू होतें. गोलमेज परिषदेला उत्तर म्हणून हिंदुस्थानांत सोव्हिएटघोषणा आमच्या जहाल कम्युनिस्टांनीं सुरू केली. कॉंग्रेसच्या निशाणाखालीं प्रत्यक्ष साम्राज्यविरोधी लढा सुरू झालेला आहे; लोकांवर लाठीमार होत आहे, हजारों तरुण स्त्रिया व पुरुष तुरुंगांत डांबले जात आहेत; अशा वेळीं कॉंग्रेस ही भांडवलवाल्यांची संस्था आहे असें म्हणून हिंदुस्थानांत सोव्हिएटची स्थापन करण्याची घोषणा करीत राहणें म्हणजे स्वतःच्या अकलेचें प्रदर्शनच करण्यासारखें होतें दुसरें काय! त्या वेळचा सोलापूरच्या जनतेचा क्रांतिकारक उठाव व ठिकठिकाणीं शेतकऱ्यांचे चाललेले लढे हीं कामगार क्रांतीचीं चिन्हें आहेत अशी चुकीची समजूत कम्युनिस्टांनीं करून घेतलेली होती.

आमच्या या तरुण कम्युनिस्ट क्रांतिकारकांनीं परिस्थितीचा थोडा जरी विचार केला असता, तरी त्यांना हें कळून चुकलें असतें कीं, हिंदी राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्याला 'सोव्हिएट' ही घोषणा त्या वेळीं पूरक नसून उलट मारक होती. वसाहतींतील लोकांना 'सोव्हिएट'ची खरी कल्पना त्या वेळीं येणें शक्यच नव्हतें. संपाच्या प्रसंगीं संतापातिरेकानें कामगार दगडफेक करूं लागले, म्हणजे कामगारवर्ग जागृत झाला असें म्हणणें, हें राजकीय अज्ञानाचें लक्षण आहे.

तसेंच केवळ संपाला कामगारांनीं तयार होणें म्हणजे त्यांची वर्गयुद्धाची तयारी झाली असें नव्हे. कॉ. रॉय यांनीं एकंदर राजकीय परिस्थितीचा आढावा घेऊन, कामगारवर्गाचा क्रांतिकारक उठाव म्हणजे काय व कम्युनिस्टांनीं आपलें धोरण कसें ठेवावयास पाहिजे याचें साग्र विवेचन एका जाहीरनाम्यांत विशद रीतीनें केलें असून त्यांत कॉ. रॉय म्हणतात—

**कम्युनिस्ट पक्ष बलवान् करण्याचा मार्ग**

"साम्राज्यशाहीच्या मगरमिठींतून हिंदी लोकांची सोडवणूक करणें हें कामगारवर्गाचें पहिलें काम आहे. कम्युनिस्टांचें अंतिम ध्येय काय आहे हें सर्वांस माहीत आहे. उत्पादनाच्या व विनिमयाच्या साधनांवरील खाजगी मालकी हक्क नष्ट करून तीं राष्ट्राच्या मालकीची करणें, वरिष्ठ वर्गांचे राजकीय हक्क नाहींसे करून त्या ठिकाणीं कांहीं काळ कामगारांची अनियंत्रित सत्ता स्थापन करणें, सामुदायिक सुखाकरितां समाजाची पुनर्घटना करणें, हें जें कम्युनिस्टांचें अंतिम ध्येय त्याला आज हिंदुस्थानांतील बहुजन समाजाचा पाठिंबा मिळणें शक्य आहे काय? तसें जर नाहीं, तर कम्युनिस्टांचें अंतिम ध्येय व कार्यक्रम जनतेसमोर ठेविल्यानें असा कोणता मोठा कार्यभाग साधणार आहे? अर्थात् अंतिम ध्येय डोळयांपुढें ठेवणाऱ्या पक्षानेंसुद्धां कमींत कमी कोणत्या कार्यक्रमावर अखिल जनता एकत्रित होऊं शकेल हें नीट पाहून तसा कार्यक्रम जनतेसमोर ठेवला पाहिजे. सर्व जनतेला एकत्रित आणितां येईल असा कार्यक्रम आंखून, त्या रोखानें पुढें पाऊल टाकणें म्हणजे आपलें अंतिम ध्येय सोडून देणें असा मुळींच अर्थ होत नाहीं. देशाच्या औद्योगिक प्रगतीला म्हणजेच पर्यायानें अखिल समाजाच्या प्रगतीला हरघडी अडथळा करणारी परकीय साम्राज्यशाही आपण सामुदायिक रीतीनें नष्ट करूं शकलों, तर कम्युनिस्टांचा पुढील मार्ग सुलभ होईल का अधिक बिकट होऊन बसेल! तात्पर्य काय, कीं आपलें ध्येय गांठण्यासाठीं कोणत्या मार्गानें जाणें इष्ट आहे, हें कम्युनिस्टांनीं अगोदर विचार करून ठरविलें पाहिजे. बहुजन समाजाच्या चळवळीपासून अलिप्त राहून जहाल घोषणा करीत राहण्यानें कोणताच कार्यभाग साधणार नाहीं. हिंदुस्थानांत बलाढ्य अशी कम्युनिस्टपार्टी कां नाहीं? याचें उत्तर हेंच कीं, जे कोणी कम्युनिस्ट म्हणून स्वतःला म्हणवितात त्यांनीं, बहुजन समाज गुरफटला जाईल असा

व्यापक कार्यक्रम आंखलेला नाहीं व या कार्यक्रमाच्या बाबतींत त्यांच्या-त्यांच्यांतच मतैक्य नाहीं.

कम्युनिस्टांचें अंतिम ध्येय डोळयांसमोर ठेवून, त्याच तत्त्वानुसार कार्यक्रम आंखणें हें आज हिंदुस्थानांतील कामगारवर्गाचें निकडीचें काम नाहीं. राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्यांत कामगारवर्गाव्यतिरिक्त दुसरे वर्गहि सामील झालेले आहेत व ते वर्ग तर कम्युनिस्टांचा सर्वच्या सर्व कार्यक्रम मान्य करणें शक्य नाहीं. निरनिराळ्या वर्गांच्या अनेकविध मागण्यांचा आपल्या कार्यक्रमांत समावेश करून घेतला पाहिजे व त्या मागण्यांच्या जोरावर राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या प्रचंड झगड्यांत कम्युनिस्टांनीं पुढाकार घेतला पाहिजे." १९२९ सालीं लाहोर कॉंग्रेस पार पडल्यानंतर कॉ. रॉय यांनीं 'लाहोर कॉंग्रेसचे धडे' या नांवाचें जें चोपडें प्रसिद्ध केलें होतें त्याचा सारांश या प्रकरणांत सुरुवातीस दिला आहे. त्यांतील १९ मागण्यांचा मसुदा कॉ. रॉय यांनीं तयार केला होता व याच मागण्यांच्या अनुरोधानें बहुजन समाज राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या चळवळींत आपलेपणानें भाग घेण्यास तयार होईल असें रॉय यांचें म्हणणें असे.

अशा तऱ्हेचा सर्वव्यापी कार्यक्रम जनतेसमोर ठेवल्यानंतर दुसरें महत्त्वाचें कार्य म्हणजे या कार्यक्रमानुसार चालणारी जनतेची संघटना निर्माण करणें हें होय. साम्राज्यविरोधी लढा करण्यासाठीं बहुजन समाजाची लढाऊ संघटना असणें हें अत्यंत आवश्यक काम आहे व हें ध्येय डोळयांसमोर ठेवून हिंदुस्थानांतील कम्युनिस्टांनीं सुद्धां साम्राज्यशाहीला प्रतिस्पर्धी अशी कॉन्स्टिटयुअंट असेंब्ली म्हणजे 'लोकप्रतिनिधींची सभा' निर्माण करण्यासाठीं जनतेंत चळवळ केली पाहिजे. हिंदी स्वातंत्र्याचा प्रश्न सोडवल्याखेरीज हिंदी समाजरचनेचे पश्न आपल्याला सोडवितां येणार नाहींत हें कम्युनिस्टांनीं पक्कें ध्यानांत ठेवावें.

कार्यक्रम व संघटना यांची स्पष्ट कल्पना आल्यानंतर प्रत्यक्ष कार्यास सुरुवात करावयाची. कोणताहि पक्ष बळकट करावयाचा म्हणजे, त्याला खालच्या वर्गाकडूनच सक्रिय पाठिंबा मिळाला, तरच तो पक्ष बलवान् होतो; एरव्हीं नाहीं. ज्यांना कम्युनिस्टांचीं तत्त्वें १०० टक्के मान्य असतील त्यांनींच आमच्या

पक्षांत यावें, असा हट्ट धरला तर, हिंदुस्थानांत कम्युनिस्ट पक्ष कधींच बलवान् होणार नाहीं. ज्या व्यक्तींचा कम्युनिस्ट तत्त्वज्ञानावर व कम्युनिस्टांच्या अंतिम तत्त्वज्ञानावर विश्वास असेल, ते कम्युनिस्ट पक्षांत येऊन सामील होतीलच परंतु देशांतील इतर वर्गांतील लोकांनाहि आपल्या पक्षांत सामील करून घेणें हें आपलें काम आहे. त्याकरितां ठिकठिकाणीं परिषदा बोलावून त्यांच्यातर्फे आपला व्यापक असा कार्यक्रम जनतेला समजावून दिला पाहिजे. कामगार संघ, कारखाने, गोद्या, खाणी हीं जरी कम्युनिस्टांच्या कार्याचीं मुख्य केंद्रें असलीं तरी राष्ट्रीय सभा, युवकसंघ, विद्यार्थिसंघ, स्वयंसेवक-संघ या संस्थांमधूनहि कम्युनिस्टांनीं अंग मोडून काम केलें पाहिजे. ठिकठिकाणच्या काँग्रेस कमिट्यांमधून आपल्या कार्याला चांगला वाव मिळण्यासारखा आहे. अशा रीतीनें देशांतील अत्यंत मागासलेल्या व वरिष्ठ समाजाकडून पिळल्या जाणाऱ्या वर्गाच्या सहानुभूतीनें आपली संघटना बलिष्ठ झाली, तरच आपण देशांतील स्वातंत्र्याच्या लढ्यांत यशस्वी रीतीनें कार्य करूं शकूं व राष्ट्रीय सभेसारख्या संस्थांतून भांडवलदारांच्या पुढारीपणामुळें जी स्वातंत्र्याच्या लढ्याची वाताहत होत चालली आहे तिला पायबंद घालूं शकूं. हिंदुस्थानांत कम्युनिस्ट पक्षाची संघटना जोरदार व्हावी अशी इच्छा असेल तर त्याला हाच एक मार्ग आहे व स्वातंत्र्यप्राप्तीच्या प्रश्नानंतरच कम्युनिस्ट-समाजरचनेचाहि प्रश्न सुटणार आहे.

---

## २० चीनच्या राजकीय परिस्थितीचें विवेचन : चीनमधील सोव्हिएट

हिंदी प्रश्नाचा विशेष आस्थापूर्वक अभ्यास, रॉय जरी करीत होते, तरी त्यांचें लक्ष इतर देशांतील चळवळीकडे नव्हतें असें नाहीं. विशेषतः चीन वगैरे पौर्वात्य देशांतील स्वातंत्र्याच्या चळवळीकडे त्यांचें फार बारीक लक्ष होतें. बरोबरच आहे. चीन देशांत व तेथील क्रांतियुद्धांत कॉ. रॉय यांनीं आठ-दहा महिने घालविले असून, तेथील चळवळीची त्यांना प्रत्यक्ष माहिती होती. चीनमधील प्रश्नाबाबतच त्यांच्यांत व बोरोडिन यांच्यांत मतभेद होऊन, शेवटीं त्याचा परिणाम म्हणून रॉय यांना इंटरनॅशनलपासून दूर व्हावें लागलें. इतका चीनचा व त्यांचा पहिल्यापासून संबंध आला होता. चीनमधील ती हकीकत मागील प्रकरणांत आलेली आहेच. कम्युनिस्टांनीं तेथेंहि चुकीचें धोरण स्वीकारल्यामुळें क्रांतिविरोधी लोकांनीं थोड्याच अवकाशांत कम्युनिस्टांची वाताहत केली. नाहीं म्हणावयास येथें चार, तेथें चार, असे कांहीं कम्युनिस्ट शेवटीं चीनमध्यें उरले. ज्या वेळीं जी गोष्ट करावयास पाहिजे ती न केल्यामुळें कम्युनिस्टांची चीनमध्यें वाताहत झाली. ज्या वेळीं शेतकरीक्रांतीची घोषणा करून को-मिंग-टांगमधील मवाळ गट व चँग-कै-शेक यांचा पाडाव करावयाचा त्या वेळीं मित्रपणाचें धोरण स्वीकारलें व शेतकरी-क्रांतीचा घात केला. जेव्हां चँग-कै शेक यांनीं कम्युनिस्टांना अगदीं नामोहरम करून टाकलें त्या वेळीं जनतेची तयारी नसतांना राष्ट्रीय सरकारविरुद्ध सशस्त्र बंडाची उभारणी केली. यामुळें झालें काय, तर सर्व चीनमध्यें कम्युनिस्ट-क्रांतीचा उठाव तर झाला नाहींच, उलट चीन देश पण चँग-कै-शेक यांच्या आक्रमणाखालीं गेला व डोंगराळ मुलुखांतून चीन सोव्हिएटची आमच्या कम्युनिस्टांनीं स्थापना केली. चीनमधील डोंगराळ मुलुखांतून कांहीं भागांत

कम्युनिस्टांनीं आपलें आसन स्थिर केलें, असें कळल्याबरोबर १९२८ ते १९२९ च्या काळांत जिकडे तिकडे 'चीनमधील सोव्हिएट रिपब्लिकची स्थापना' 'लाल सैन्याचा अपूर्व विजय' अशा भडक रंगांत रंगविलेल्या बातम्या प्रसृत होऊं लागल्या. खरोखरच तेथें काय चाललें होतें याची खरी कल्पनाहि कोणाला करतां आली नाहीं. चीनमधील शेतकरीलोकांच्या उठावानें त्या वेळीं जोर केला होता व या चळवळीचें पुढारीपण कम्युनिस्टानीं आपल्याकडे घेतलें होतें. चळवळीचें पुढारीपण आलें म्हणजे चळवळीचा सामाजिक पाया व धोरण बदललें असें होत नाहीं, हें तत्त्व समजून घेण्यास चीनमधील कम्युनिस्टांना बराच काळ लागला हें मात्र आतां खरें ठरूं पाहत आहे.

### सोव्हिएट सत्ता व लाल सैन्य यांचे अर्थ

'सोव्हिएट सत्ता' अगर 'लाल सैन्य' या शब्दांच्या पोटीं कामगारवर्गाच्या सत्तेचे निदर्शक असे सामाजिक अर्थ आहेत. हें लाल सैन्य सोव्हिएट सत्ता केव्हां स्थापन करतें? तर सत्ता काबीज करण्यासाठीं झगडा करीत असतांना जेव्हां कामगारवर्ग सर्व सत्ता आपल्या ताब्यांत घेतो, त्याच वेळीं त्याला 'सोव्हिएट सत्ता' व ती टिकविणारें 'लाल सैन्य' असें नामाभिधान प्राप्त होतें. एरव्हीं नाहीं. भांडवलशाही समाजपद्धति अस्तित्वांत नाहीं, जुन्या राजवटींत शेतकरी समाज गुरफटून गेलेला आहे, व ज्या बंडाला औद्योगिक क्षेत्रांत वावरणाऱ्या कामगारांचें साहाय्य व पुढारीपण लाभलेलें नाहीं अशा शेतकऱ्यांच्या एखाद्या बंडाला 'सोव्हिएट सत्ता' अगर 'लाल सैन्य' हीं नांवें देणें म्हणजे त्या शब्दांच्या मूलभूत अर्थाचें अज्ञान प्रकट करण्यासारखें आहे. कांहीं प्रसंगीं कम्युनिस्टांकडे जरी पुढारीपण आलें, तरी लोकशाही सत्तेची चळवळ करतांना अचूक कार्यक्रम व योग्य ध्येयें बहुजन समाजापुढें ठेवूनच ती चळवळ करावयास पाहिजे. नुसतें तोंडानें आकर्षक व जहाल घोषणा करून लोकांवर व्हावा तसा परिणाम तर व्हावयाचा नाहींच, उलट अशा घोषणा ऐनवेळीं चळवळीचा नाश मात्र करतील व राष्ट्रीय लोकसत्तेच्या चळवळींत ईर्षेनें पुढें आलेल्या लोकांच्या मनांत संशय उत्पन्न करण्यासहि अशा घोषणा कारणीभूत होतील. केवळ जहाल पण अप्रस्तुत घोषणांचा वेळीं अवेळीं उपयोग करण्यानें चळवळीचा सामाजिक पाया बदलत

नसतो. लोकांपुढें ठेवावयाची घोषणाहि त्यांच्या ध्येयाला अनुरूप अशीच असली पाहिजे. क्रांतिविरोधी गटांनीं कम्युनिस्टांवर हल्ला चढवून शहरांतील कामगारवर्गाला जसें दडपून टाकलें, तसें चिनी शेतकऱ्यांना त्या वेळीं दडपून टाकणें शक्य नव्हतें. चीनसारख्या अफाट प्रदेशांतील इतस्ततः विखुरलेल्या, व दारिद्र्यानें गांजून चवताळलेल्या, शेतकरीवर्गाला चिरडून टाकणें ही गोष्ट शक्य कोटींतील नव्हतीच. येवढ्या अफाट प्रदेशांत वाहतुकीचीं साधनें नसतांना शेतकरीवर्गाचे उठाव दडपून टाकण्यास सैनिक तरी कसे पाठविणार ! मोठा बिकट प्रश्न होता ! शिवाय बंडखोर शेतकरीवर्गाला चिरडून टाकण्यासाठीं पाठविलेले सैनिक, कुठें त्यांच्याच बाजूला जाऊन मिळतात कीं काय, ही भीतीहि क्रांतिविरोधी पुढाऱ्यांच्या मनांत होती. १९२५ ते २७ या दोन सालांत चिनी जनतेंत राष्ट्रीय क्रांतिकारक चळवळीनें भयंकर जागृति केली होती. चिनी जनतेला राजकीय दृष्टि आलेली होती आणि त्यांच्या आर्थिक मागण्यांवर भर देऊन, सबंध चिनी जनतेला सामुदायिक रीतीनें उठाव करावयास लावणें अगदीं सोपें काम होतें. १९२९–३० सालांत तर चीनमध्यें शेतकरी चळवळ अत्यंत वेगानें फोंफावत चालली होती. असें असतांना सुद्धां त्या चळवळीला दडपून टाकण्यांत आलें. लोकशाही समाज-क्रांतीचा जो आघाडीचा कामगारवर्ग होता त्याला क्रांतिविरोधी गटांनीं केव्हांच चेंचून टाकलें होतें आणि मध्यमवर्ग मात्र क्रांतिकारक पुढारी-पणाच्या अभावीं त्रिशंकूप्रमाणें लोंबत राहिला होता.

### चीनमधील कम्युनिस्ट पक्षाची घटना

बरें, ज्याला आपण चीनमधील कम्युनिस्ट पक्ष असें म्हणतों, तो तरी काय होता ? चीनमधील कम्युनिस्ट पक्ष ह्या नांवाचाच एक पक्ष होता. या पक्षाचे बहुतेक सभासद शेतकरीवर्गांतून आलेले होते. कामगार असे त्यांत फार थोडे होते. चीनमधील, कम्युनिस्ट पार्टीला कम्युनिस्ट पार्टी म्हणण्यापेक्षां शेतकरीपक्ष हेंच नांव कां देण्यांत आलें नाहीं, हें मला समजत नाहीं. वर्गजागृत असे जे शेतकरी झाले असतील, त्यांनीं वैयक्तिक रीत्या कम्युनिस्ट पक्षांत सामील होणें मुळींच गैर नाहीं. मात्र कम्युनिस्ट पक्षांतील सभासदांची संख्या जर केवळ शेतकरीवर्गानेंच भरून गेली, तर त्यांत कामगारवर्गाची कल्पना राहिली कोठें ?

व असा हा बहुसंख्य शेतकरीवर्गाचा पक्ष, कामगारक्रांति तरी कशी यशस्वी करूं शकणार! अर्थातच चीनमधील कम्युनिस्ट पक्ष हा कामगारक्रांति घडवून आणणारा कामगारपक्ष राहिला नाहीं यांत आश्चर्य तें कसलें? तेव्हां चीनमध्यें स्थापन झालेली सोव्हिएट-सत्ताही खरी कामगार-सत्ता या अर्थानें स्थापन झालेली नव्हती, तर कामगारपक्षाच्या पुढारीपणाखालीं शेतकऱ्यांनीं आपलें स्वतंत्र राज्य स्थापन केलें होतें, इतकेंच! सोव्हिएट सत्तेची खऱ्या अर्थाप्रमाणें चीनमध्यें कामगार-सत्ता उत्पन्न झाली नव्हती हें खास.

ज्यांना चीनमधील परिस्थितीची बरोबर कल्पना आलेली होती, अशा विचारी व दूरदर्शी पुढाऱ्यांच्या मनांवर 'चीनमधील जनतेची क्रांतिकारक लढ्याची तयारी' वगैरेसारख्या दिशाभूल करणाऱ्या बातम्यांनीं कांहीं परिणाम होणें शक्य नव्हतें. त्यांचे आचारविचार, त्यांची राजकीय व सामाजिक स्थिति या विषयांसंबंधीं माहिती असलेल्या परप्रांतीय पुढाऱ्यांत, रॉय यांना प्रमुख स्थान दिलें पाहिजे. रॉय हे चीनमध्यें दोनदां जाऊन आले होते. तेथील चिनी लोकांच्या स्वातंत्र्याच्या लढ्यांत प्रत्यक्षपणें भाग घेतल्यामुळें, रॉय यांना चिनी जनतेच्या गुणदोषांची संपूर्ण माहिती झाली होती आणि म्हणूनच चीनच्या प्रश्नासंबंधानें रॉय हे अधिकारवाणीनें बोलूं शकत. रॉय यांच्या टीकेकडे व बोलण्याकडे एकंदर जनतेचें फार बारीक लक्ष असे.

या सुमारास रॉय यांनीं आपल्या पत्रांतून चीनमधील राजकीय उलाढालींचा ऊहापोह विस्तृतपणें केला. कम्युनिस्ट पार्टीच्या चुकीच्या व फाजील जहाल धोरणामुळें जी त्या पक्षाची वाताहत झाली ती न होऊं देतां, योग्य मार्गानें चीनमधील जनतेची चळवळ कशी यशस्वी करतां येईल या धोरणानें हे लेख लिहिण्यांत आले होते.

कांहीं लेखकांनीं चीनमधील आत्यंतिक जहाल अशा धोरणाचा उदोउदो करून, चीनमधील कम्युनिस्ट राज्यासंबंधीं अतिशयोक्तीचीं व मन मानेल तशीं वर्णनें केलीं. क्रांतिविरोधी गटांचा चीनमध्यें विजय कां झाला आहे व त्याचीं खरीं कारणें काय आहेत याच्या बुडाशीं जाऊन तीं शोधून काढण्याचा कोणींच प्रयत्न केला नाहीं. तसेंच जुनाट व मोडकळीस आलेल्या चीनची भरभराट होण्यास व चीनला पाश्चात्य राष्ट्रांच्या तोडीचें राष्ट्र बनविण्यास काय काय करावयास पाहिजे याबद्दल प्रत्यक्ष उपाययोजनाहि कोणी सुचवूं शकलें

नाहीं. क्रांति यशस्वी झाल्यानंतर चीनमध्यें कोणतें राज्ययंत्र अगर कोणतें सरकार उभारलें जाईल, त्याची रचना काय असेल, त्या सरकारचें सामाजिक धोरण काय राहील, या व अशाच अनेक कोड्यांचा उलगडा कोणासच करतां आला नाहीं. चीनमध्यें शेतकरीक्रांतीनंतर भांडवलशाही लोकसत्ताक राज्य-पद्धति अमलांत येईल असें एका बाजूला कांहींनीं म्हणावें, तर दुसऱ्या बाजूला चीनमध्यें 'सोव्हिएट' सत्ता स्थापन होऊन सोव्हिएट राज्ययंत्र चीनमध्यें स्थापन होणार असें कांहींनीं भविष्यकथन करावें. कित्येक वर्षें या प्रश्नावर रणें माजून राहिलीं होतीं. कोणालाहि या चीनमधील प्रश्नाबद्दल बरोबर कल्पना करतां आली नाहीं; अगर कोणी अचूक मार्गहि दाखवूं शकला नाहीं.

**रॉय यांचा चीनसंबंधीं सुप्रसिद्ध ग्रंथ**

कॉ. रॉय हे मात्र, या वरील प्रकारच्या लेखकांस व विचारवंतांस अपवाद होते, असें म्हणण्यास हरकत नाहीं. आतांपर्यंत अनेक लेखक व राजकारणी लोक ज्या पद्धतीनें व विचारसरणीनें चीनच्या राजकीय प्रश्नाचा विचार करीत होते तो धोपट मार्ग सोडून देऊन, मार्क्सवादाच्या ऐतिहासिक तत्त्वज्ञानाच्या आधारें व चीनमधील प्रत्यक्ष चळवळीच्या अनुभवानें, या प्रश्नाचें कोडें उलगडण्याचा रॉय यांनीं प्रयत्न केला. मार्क्सवादाच्या शस्त्रागारांतील प्रात्यक्षिक तत्त्वज्ञानाचें शस्त्र रॉय यांनीं चांगलेंच हस्तगत करून घेतलें होतें व त्याचा उपयोग करण्यांत रॉय यांच्यासारखा कुशल सेनानी मिळणेंहि तितकेंच कठीण होतें.

१९३० सालच्या मध्याच्या सुमारास 'चीनमधील क्रांति आणि प्रतिक्रांति' या नांवाचा विस्तृत ग्रंथ रॉय यांनीं प्रसिद्ध केला. चीनचा खरा प्रश्न काय, चीनमधील लोकसत्ताक समाजक्रांति म्हणजे काय, ही समाजक्रांति होत असतांना चीनमध्यें जें राज्ययंत्र निर्माण होईल त्याची रचना, घटना व सामाजिक अवस्था काय असेल, वसाहतींतील दलित जनतेच्या स्वातंत्र्याच्या लढ्याचें खरें स्वरूप काय आहे व विशेषतः चीनमधील या लढ्याचें राजकीय स्वरूप काय राहील? इत्यादि अनेक राजकीय व सामाजिक प्रश्नांचें साधार व विस्तृत असें विवेचन या ग्रंथांत केलें असून, चीनच्या प्रश्नासंबंधीं खडान् खडा माहिती देणारें व अचूक निदान करणारें असें हें एक पुस्तक आतांपर्यंतच्या इतिहासग्रंथांत प्रमुख स्थान

पटकावील इतकें या ग्रंथाला युरोपांतील राष्ट्रांत महत्त्व आलें आहे. रॉय यांचा हा ग्रंथ बर्लिन शहरीं जर्मन भाषेंत प्रथम प्रसिद्ध झाला. युरोपांतील बहुतेक सर्व देशांत या पुस्तकाचा कल्पनेच्या बाहेर खप झाला. आंतरराष्ट्रीय महत्त्व प्राप्त झालेल्या सर्व वर्तमानपत्रांनीं या पुस्तकावर अभिप्राय लिहिले. मुंबईस मि. बी. जी. हॉर्निमन यांच्या संपादकत्वाखालीं निघत असलेल्या 'बुद्दकूली हेरल्ड' नांवाच्या पत्रांतहि या पुस्तकावर परीक्षणात्मक लेख आले. जर्मन वर्तमानपत्रांचे चीनमधील प्रमुख व सुप्रसिद्ध बातमीदार 'हर-निझ-मुलर' यांनीं तर या पुस्तकावर 'अलीकडील राजकीय वाङ्मयांतील अत्युत्कृष्ट पुस्तक' असा अभिप्राय दिलेला आहे. रॉय यांच्या या पुस्तकानें त्यांची कीर्ति जी जगभर पसरली होती, त्यांत अधिक भर पडली. रॉय यांनीं आपल्या पुस्तकांत चीन व तत्सम वसाहतींतील जनता यांच्या साम्राज्यविरोधी लढ्यांत कोणतें राज्ययंत्र निर्माण होणें शक्य आहे यासंबंधींचें जें विवेचन केलें आहे, त्या योगानें जगांतील राजकीय पुढारी व राजकारणी मुत्सद्दी यांच्या मनांवर रॉय यांची विशाल बुद्धिमत्ता व राज्यशास्त्राचें सम्यक्‌ज्ञान यांची चांगलीच छाप बसली व हेंच विवेचन या पुस्तकाचा आत्मा आहे.

**वसाहतींतील क्रांतीनंतर राज्ययंत्र कोणतें राहील ?**

रॉय यांचें म्हणणें असें कीं, चीनच्या साम्राज्यशाही लढ्यांतून जें सरकार येथें उत्पन्न होईल तें निर्भेळ 'भांडवलशाही लोकसत्ताक पद्धतीचेंहि राहणार नाहीं.' त्याचप्रमाणें सर्वस्वीं कामगारसत्ताधारीहि तें सरकार असूं शकणार नाहीं. तर पिळणुकीनें गांजलेल्या अशा अखिल चिनी जनतेचें अनियंत्रित सत्ता असलेलें असें तें सरकार राहील. भांडवलशाही लोकसत्ताक राज्य-पद्धतीची अशी रचना असते, कीं त्या राज्यव्यवस्थेंत प्रत्येक व्यक्तीला समाजांत स्वातंत्र्य असतें, परंतु हें स्वातंत्र्य भांडवलशाहीवाढीला पूरक कसें राहील, येवढीच त्यांत खबरदारी घेण्यांत आलेली असते. उलट कामगार-सत्तेंत, केवळ कारखान्यांत राबणारा कामगारवर्ग सर्व सत्ता आपल्या हातांत ठेवून कांहीं काळ इतर वर्गांचे सर्व हक्क हिरावून घेतो व समाजघटनेची नवीन रचना करीत असतां, त्याला तसें करणें अपरिहार्य असतें. अशा या दोन्ही राज्ययंत्रांपैकीं एकहि राज्यघटना चीनमध्यें अस्तित्वांत येणें

शक्य नाहीं असें रॉय यांचें म्हणणें असून, चीन व इतर वसाहती यांतून साम्राज्यविरोधी स्वातंत्र्याच्या लढ्यानंतर जर कोणती राज्यघटना अगर राज्य-यंत्र निर्माण होणार असेल तर तें त्या देशांतील कामगार, शेतकरी वगैरे दलित व पिळल्या गेलेल्या अशा वर्गांच्या अनियंत्रित सत्तेचें राज्ययंत्र निर्माण होणें शक्य आहे. दुसऱ्या कसल्याहि राज्यंत्राची कल्पना करतां येणें शक्य नाहीं असा कॉ. रॉय यांचा अभिप्राय आहे.

चीनला अद्याप राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या अवस्थेंतून जावयाचें आहे. तोंपर्यंत 'सोव्हियट सत्ता' स्थापण्याच्या वल्गना करूं नका. चीनमधील बहुजन समाज या क्रांतियुद्धांत कसा येईल व कामगारांच्या पुढारीपणाखालीं साम्राज्यविरोधी लढा पुढें कसा जाईल याचा विचार करून आपले कार्यक्रम व मार्ग आंखा असें कॉ. रॉय यांचें कम्युनिस्टांना आग्रहाचें सांगणें असे. देशांतील औद्योगिक विभागांतून जे कामगार पसरलेले आहेत व ज्या ठिकाणीं राजकीय चळवळी हरहमेष होत आहेत, तेथें आपलें बळ एकत्र करा व शेतकरीवर्गाला क्रांतीचें आव्हान द्या. मग बघा अफाट असा चिनी शेतकरीवर्ग तुमच्या पाठीशीं उभा राहतो कीं नाहीं तो ! क्रांतिकारक चळवळीला शेतकरीवर्गाचीच फार मोठी मदत होते. मात्र त्या वर्गाला क्रांतियुद्धांत खेचण्यास कामगारवर्गानें पुढाकार घेतला पाहिजे. चीन देशांतील शेतकरी लोकांचा प्रश्न सोडविण्यासाठीं लागणारी शक्ति चिनी कामगारवर्गांत आहे हें ओळखून, कामगारवर्गाच्या केंद्रांत व राजकीय लढ्याच्या मुख्य मुख्य ठिकाणीं आपल्या शक्ति कम्युनिस्टांनीं खर्च करून साम्राज्यविरोधी लढा पुढें नण्याच्या ऐवजीं दुर्गम अशा डोंगराळ मुलुखांत कम्युनिस्ट राज्याची स्थापना करून आनंद मानण्यांत काय बरें फायदा आहे ? जनसमूहाला ज्या समाजरचनेचें आकलन होत नाहीं व ज्याच्याकरितां झगडा करण्यास तो उत्साहानें पुढें येत नाहीं अशा सोव्हिएट राजसत्तेची स्थापना करण्याच्या कार्यापेक्षां 'लोकसत्ताक क्रांतीचा साम्राज्यविरोधी लढा' हें अधिक महत्त्वाचें कार्य नव्हे काय ? या गोष्टी लक्षांत घेऊन कम्युनिस्टांनीं आपलें धोरण बदलून चिनी जनतेचा लढा योग्य मार्गानें पुढें न्यावा असें कॉ. रॉय यांनीं जनतेला वारंवार बजावून सांगितलें आहे.

**हिंदुस्थानांत येण्याची तयारी**

कॉ. रॉय यांनीं लिहिलेल्या या महत्त्वाच्या पुस्तकाचें अद्याप इंग्रजींत भाषांतर झालेलें नाहीं ही मोठी उणीव राहिलेली आहे. चीनमध्यें कॉ. रॉय यांना आलेला अनुभवहि या पुस्तकांत ग्रथित केला असल्यामुळें, आणि चीन व हिंदुस्थान या देशांतील राजकीय स्वातंत्र्याचें प्रश्न जवळजवळ सारखेच असल्याकारणानें, या पुस्तकाचा हिंदी तरुण कार्यकर्त्यांना फार मोठा उपयोग होईल यांत तिळमात्र शंका नाहीं. या पुस्तकाच्या प्रकाशनानंतर कॉ. रॉय यांची कीर्ति हां-हां म्हणतां चोहींकडे पसरली. हें पुस्तक प्रसिद्ध झाल्याबरोबर कॉ. रॉय यांना अमेरिकेंतील कम्युनिस्ट पक्षाच्या लोकांकडून तिकडे येण्याबद्दल विनंति करण्यांत आली. अमेरिकेंतील कामगारचळवळीशीं त्यांचा प्रत्यक्ष संबंध पूर्वी आलेला होताच. त्यांनीं अमेरिकेंत अज्ञातवासांत कांहीं दिवस घालविले होते. अमेरिकेंतील चळवळीची व एकंदर परिस्थितीची कॉ. रॉय यांना चांगली माहिती झालेली होती. अमेरिकेंतील कामगारवर्गहि रॉय यांच्या आगमनाची उत्सुकतेनें वाट पाहत होता. परंतु त्या वेळीं रॉय यांचें लक्ष दुसरीकडे गुंतलें होतें. ज्या ठिकाणीं आपण जन्मास आलों व जेथील राजकीय परिस्थितीसंबंधानें आपण इतका विचार केला, त्या आपल्या मातृभूमीकडे त्यांचा या वेळीं ओढा लागला असल्यास नवल नाहीं. हिंदी राजकीय चळवळीकरितां जेवढे म्हणून श्रम करणें शक्य होते तेवढे रॉय यांनीं अज्ञातवासांत राहून केले. परंतु आतां यापुढें केवळ अज्ञातवासांत राहून काम करण्यानें मनाचें समाधान होण्यासारखें नव्हतें. हिंदुस्थानांतील राजकीय परिस्थिति कॉ. रॉय यांना परत हिंदुस्थानला खेचीत होती. कोणत्याहि संकटाची पर्वा न करतां रॉय हे हिंदुस्थानांत यावयास निघाले. आपलीं मतें, कार्यक्रम व तत्त्वज्ञान हें परिस्थितीच्या मुशीमध्यें घालून, त्याचा यथार्थपणा जनतेसमोर व लोकांसमोर मांडण्याचें महत्तम कार्य करण्याची रॉय यांची मनीषा होती. शेवटीं अमेरिकेला न जातां, मातृभूमीला जाण्याचा कॉ. रॉय यांनीं निश्चय केला व आपल्या निश्चयाप्रमाणें १९३० सालांत ते हिंदुस्थानांत येण्यास निघाले.